# BRIEF SURVEY OF HISTORY.

## BY JOHN C. MARSHMAN.

---

**PART II.**

FROM THE ORIGIN OF ROME TO THE BIRTH OF CHRIST.

---

Translated into Marathi

BY

HARI RAGHUNÁTH GÁDGIL,

REVISED AND CARRIED THROUGH THE PRESS,

BY

NÁNÁ SHÁSTRÍ APTE,

REVISER TO THE DUKSHINA PRIZE COMMITTEE,

AND


[P]RINTED FOR THE " DUKSHINA PRIZE COMMITTEE.

BY THOMAS GRAHAM, BOMBAY.

1857

# जगाचा संक्षिप्त इतिहास.

जान सि. मार्शमन् साहेब

ह्यांचे इंग्रेजी ग्रंथावरून

भाग २.

रूम शहरचे स्थापनेपासून एसू क्रिस्ताचे

जन्मापर्यंत.

हरी रघुनाथ गाडगीळ ह्यांनीं

मराठीं भाषेंत केला.

तो

नाना शास्त्री आपटे दक्षिणाप्रैज कामिटीचे रिवैजर

ह्यांनां तपासून शुद्ध केला आणि मेहरबान

दक्षिणाप्रैज कामिटीनें

मुंबईमध्यें

टामस ग्रेहाम ह्यांचे छापखान्यांत छापविला.

सन १८५७.

# अनुक्रमणिका.

प्रकरण.

# जगाचा संक्षिप्त इतिहास.

## भाग दुसरा.

---

### रूमचे राज्याविषयीं.

**रूम** शहराची उत्पत्ति— **राम्युलस** आणि **रीमस**— राज्याची प्रथम रचना— **राम्युलसाचा** मृत्यु— **न्युमा**— ह्याचे धर्मसंबंधी नियम— **तलसहास्तिल्यस**— **अंकसमार्शस**— **तार्किन**— **सर व्यस्तल्यस**— राज्यरचनेची सुधारणा— दुसरा **तार्किन**— **ल्युक्रीशिया**— **ब्रूतस**— एकसत्तात्मक राज्याचा उच्छेद.

मागील भागाचे अंतीं आह्मीं लिहिलें आहे, कीं **शिकंदर** बादशाहाच्या चार सेनापतींचीं चार राज्यें एका मागून एक **रूमचे** राज्याखालीं आलीं; आतां त्या राज्याचा इतिहास लिहितों. **एशिया** खंडांत पूर्वीं सांगितलेल्या धामधुमी चालू असतां **युरोप** खंडांत **रोमन** लोकांचा उदय होऊन ते बलाढ्य होत चालले होते. त्या लोकांनीं पृथ्वीवरील त्या वेळचीं विद्याचारसंपन्न राज्यें हस्तगत करून पूर्वीं जीं राज्यें होऊन गेलीं, त्यांपेक्षां विस्तीर्ण व टिकाऊ राज्य स्थापावें असें ईश्वरानें नेमलें होतें. त्यांचें राज्य प्राचीन कालामध्यें सुरू होऊन अर्वाचीन कालपर्यंत चालत आलें; ह्मणजे, **ग्रीस** देशामध्यें **लैकर्गस** ह्मणून जो प्रख्यात पुरुष होऊन गेला, त्याच्या वेळेच्या सुमारास **रोमन** लो-

कांचे राज्यास आरंभ झाला, आणि इसवी सनाचे पंधरावे शतकांत तुर्क लोकांनीं इस्तंबोल (कांनस्तांतीनोपल) शहर घेऊन त्या राज्याची पूर्वेकडील गादी नष्ट केल्यामुळें तें अगदीं बुडालें.

रोमन लोक पृथ्वीवरील बहुतेक लोकांस आपल्या अमलांत आणीत तोंपर्यंत त्यांचा इतिहास कोणी लिहिला नव्हता, ह्यास्तव पुढें ज्यांनीं त्यांचा इतिहास लिहिला त्यांनीं रूम शहराच्या उत्पत्तीचा प्रकार फारच खुशामतीचा लिहिला आहे. रूम शहराची स्थापना करणारे जे जुळे बंधु राम्युलस आणि रीमस ते मार्स देवापासून उत्पन्न झाले, असें ह्मणतात; पण ही गोष्ट व हिच्या सारख्याच ज्या दुसऱ्या गोष्टी आहेत, त्या सर्व कल्पित आहेत, असें जें मानलें आहे, हें बरोबर आहे. कित्येक तर रूमचे सात राजांविषयींचा सर्व लेख अविश्वसनीय आहे असें मानून त्या राजांचा इतिहासच लिहीत नाहींत; पण रोमन इतिहासकारांनीं सात राजांचा जो इतिहास लिहिला आहे, त्यापेक्षां सप्रमाण इतिहास मिळत नाहीं, ह्याकरितां त्यांनीं जें काय त्यांविषयीं लिहिलें तेंच आह्मी लिहितों. इतली देशाचे बहुतकरून मध्यभागीं लातीन लोकांचे मुलखांत समुद्रापासून सुमारें ६ कोसांवर तैबर नदीचे कांठीं एका टेकाडावर क्रिस्ताचे पूर्वीं ७५२ वे वर्षीं राम्युलस ह्यानें रूम शहर वसविलें. त्या शहराजवळच एक आल्बालांगा ह्मणून शहर होतें, तेथील कांहीं लोकांस प्रथमतः आणून त्यानें रूम शहरांत वस्ती केली. आपल्या नव्या शहराच्या वस्तीची वृद्धि त्वरेनें व्हावी, ह्याकरितां राम्युलसानें कर्जभरू लोकांस व उपरे लोकांस त्यांत आश्रय दिला. त्या

लोकांसच त्यानें चांगल्या कायद्यांनीं वागवूनव सु.रा.
लावून, योग्य आणि पराक्रमी असें केलें. पुढें शहर अंम-
लांत जमल्यावर त्यामध्यें जे अत्यंत श्रीमंत व प्रतिष्ठित होते,
त्यांपैकीं कांहीं लोकांस राम्युलसानें पिढीजाद बडे लोक
केले, व त्या बडे लोकांपैकीं कांहीं लोक निवडून त्यांचो
राज्यकारभार चालविण्याकरितां एक सभा केली. तिला
सिनेट असें नांव दिलें, बडे लोकांस पेत्रिशन असें नांव
दिलें, आणि इतर लोकांस प्लिब्यन असें नांव दिलें. त्यानें
ह्या लोकांचे वर्ग केले. मोठमोठ्या सर्व कामांचा ठराव
सिनेट सभा व बहुतेक सामान्य लोक ह्यांच्या मतानें होत
असे; आणि तो ठराव अमलांत आणणें, हेंच काय तें रा-
जाचें काम असे. कामगार नेमणें, युद्ध व तह ह्यांचा
ठराव करणें, आणि कायदे मुकरर करणें, हीं कामें रा-
म्युलसानें फक्त लोकांकडे सोंपून दिलीं, आणि उपाधीक
सिनेट सभेकडे सोंपून दिलें. लोकसभेंत एकाद्या मोठ्या
गोष्टीचा विचार करणें झाल्यास, तो शुभ शकुनावर करा-
वा लागत असे; नाहींतर, तो मान्य होत नसे. शकुन
पहाण्याचें काम सिनेट सभेंतील सभासद लोकांकडे होतें,
ह्मणून राज्यांत त्यांचें प्राबल्य झालें. राम्युलसानें मूर्ति-
पूजेची एक हेंगडी चाल घातली होती. ती चाल त्या-
च्या मागून जो राजा झाला त्यानें सुधारली.

रूमशहरांतील राहाणाऱ्यामध्यें पुरुषांचे संख्येपेक्षां
स्त्रियांची संख्या फारच कमी होती, ह्यामुळें तें नवीन वस-
विलेलें शहर हलके हलके नाहींसेंच झालें असतें; पण रा-
म्युलसानें, रूमशहराजवळ जे साबैन लोक रहात होते,
त्यांपासून आपल्या लोकांस बायका मिळविण्याची तजवीज

केली. त्या नायका त्यानें दगाबाजीनें अथवा कांहीं ठ राव करून आणिल्या ह्याचा निर्णय करणें कठीण आहे साबैन लोकांचा रोमन लोकांशीं, ह्या प्रकारचा शरीरसंबंध झाल्यावर साबैन लोक रूमशहरांत रहावयास इतके आले, कीं पहिल्या वस्तीच्या दुप्पट रूमशहराची वस्ती झाली. ह्याप्रमाणें राम्युलसाजवळ मनुष्यांचा पुरावा आल्यावर त्यानें आपल्या सभोंवतालच्या लहान लहान संस्थानांशीं लढाया चालविल्या. ह्या संस्थानांत एक दोन शहरें व त्यांच्या सभोंवतालील सिंवार ह्यांशिवाय दुसरें कांहीं प्रायः नव्हतें. ह्यांतील लोक आपल्या शेतांवर पोट भरीत असत. राम्युलस ज्या ज्या लोकांस जिंकीत गेला, त्यांपैकीं कांहीं लोकांस नियमानें रूमशहरांत रहावयास आणीत असे. ज्या रूमशहरांत प्रथमतः लुटारू लोकांची वस्ती होती, व ज्याला पुढें कालगत्या पृथ्वीचें स्वामित्व आलें, तें ह्याप्रमाणें वाढलें. राम्युलसानें हजारों संकटें आलीं असतांही अगदीं नवें शहर वसविलें; आणि त्यांतील लोकांचे ठायीं कायदे व सुशिक्षा ह्यांच्या योगानें असे उत्तम गुण उत्पन्न केले, कीं त्या गुणांच्याच आधारानें वस्तुतः रूमशहर पुढें इतके महत्वास आलें. ह्याकरितां मोठे मोठे जे लोक होऊन गेले, त्यांमध्यें राम्युलस गणण्यास योग्य आहे. इतिहासकार असें लिहितात, कीं तो आपले वयाचे ६० वे वर्षीं इतका गर्विष्ठ झाला, कीं त्याचा लोकांस त्रास येऊं लागला; ह्यामुळें दंगा होऊन त्यांत तो मारला गेला; पण आह्मास ह्या गोष्टीचा विशेष संभव वाटतो, कीं सभासद लोकांस स्वतः राज्यकारभार करण्याविषयीं लोभ सुटल्यामुळें त्यांच्या मनांत राम्युलसाविषयीं

मत्सर उत्पन्न झाला, आणि ह्यामुळें त्यांनीं विजांचा चकचकाट, मेघगर्जना, आणि वावदळ ह्यांची संधि साधून त्याचा वध केला. मग त्यांनीं ह्या वावदळामध्यें त्याला देव आपले लोकास घेऊन गेले, असें लोकांत प्रसिद्ध केलें, आणि त्याचें नांव देवांमध्यें घातलें. **रोमन** लोकांस ज्या मनुष्याचें पृथ्वीवर सहन होत नसे, त्यास मारून ते आपल्या देवांत त्याची गणना करीत, ह्या पाठाचें हें पहिलें उदाहरण. **राम्युलसानें** २७ वर्षें राज्य केलें. हा मेला त्या वेळेस **रूम**शहरांत शस्त्र धरण्याविषयीं समर्थ असे तेहतीस्यांचे ठिकाणीं सत्तेचाळीस हजार लोक झाले होते.

ह्याप्रमाणें **राम्युलस** मेल्यावर त्याचे जागीं राजा कोण नेमावा, ह्याविषयीं **रोमन** लोकांचें एकमत होईना, ह्मणून राज्यकारभार **सिनेट** सभेच्या गळ्यांत पडला. त्या सभेतील सभासद पाळीपाळीनें राज्य कारभार चालवूं लागले. ह्याप्रमाणें वर्ष लोटल्यावर, नित्य नवा धनी ह्या गोष्टीचा लोकांस कंटाळा येऊन राजा असण्याविषयीं त्यांस उत्कंठा झाली. तेव्हां **रूम** शहरांत जे **साबैन** लोक होते, त्यांनीं आग्रह धरिला, कीं आमच्यांतला राजा असावा, आणि **रोमन** लोक ह्मणूं लागले, कीं आमच्यांतला राजा असावा. शेवटीं असें ठरलें, कीं **रोमन** लोकांनीं **साबैन** लोकांपैकीं पाहिजे त्याला राजा नेमावें. मग त्यांनीं **न्युमास** पसंत केलें. तो धार्मिक व विविक्तवृत्ति होता. तो त्या वेळेस **रूम** शहरापासून दूर रहात होता. **राम्युलसाचे** राज्यांत जशा एकसारख्या लढाया चालल्या होत्या; तसें **न्युमाचे** राज्यांत एकसारखें स्वास्थ्य होतें. त्यानें लोकसत्तात्मक राज्याची व्यवस्था करून शहरांतील हरएक वर्गाचे लो-

कांस निरनिराळीं कामें नेमून दिलीं. त्यानें कायदे केले आणि शहराचा धर्म ठरवून टाकिला. ह्यामुळें जसें राम्य-लसाला रूमचे राज्याचा स्थापक मानितात, तसेंच न्यु-माला रूमच्या धर्माचा स्थापक मानितात. मूर्तिपूजा-रूप जो असत्य मार्ग, हा पाया धरून जरी न्युमानें धर्म-संबंधी नियम केले, तरी ते रूम शहरांतील अडाणी लो-कांस शहाणे करण्यास फारच उपयोगी पडले ह्यांत संशय नाहीं. त्यानें जे धर्मसंबंधी नियम केले, त्यांविषयीं विजा-तीय महत्व लोकांचे मनांत उत्पन्न व्हावें, ह्याकरितां त्यानें असें प्रसिद्ध केलें, कीं माझें इजीरिया देवीशीं स्वतः वळण आहे, ह्यामुळें हे नियम साक्षात् देवलोकांतून मिळाले आ-हेत. ही राजा ४३ वर्षे राज्य करून मृत्यु पावला. त्याला पुरावयास नेऊं लागले, तेव्हां त्याच्या पाठीमागून रोमन लोकच रोदन करीत गेले एवढें नाहीं, तर रूम शहरच्या सभोंवतालचे लोकही रडत गेले. त्या लोकांमध्यें तंटा वगैरे पडला असतां तो मध्यस्थी करीत असे, व त्यांचा लेकराप्रमाणें सांभाळ करीत असे.

न्युमा मेल्यावर राजपदाधिरूढ होण्याकरितां लोकांनीं तलसहास्तिल्यस ह्यास निवडलें. हा रूमचा तिसरा राजा होय. त्यानें ०३१ वर्षे राज्य केलें. तो रणप्रिय होता; आणि त्यानें सभोंवतालचे लोकांमध्यें रूमचे नांवाची दहशत पुनः उत्पन्न केली. त्याचे कारकिर्दींत विशेष गोष्ट एवढीच झाली, कीं आल्बालांगा शहराचा ह्मणजे, ज्या शह-रांतून लोक रूमशहरांत प्रथमतः वस्ती करण्याकरितां आले होते, त्यांचा नाश झाला, आणि तेथील लोक रूम-शहरांत येऊन राहिले; तेणेंकरून ह्यांतील वस्ती व लष्कर

हीं वाढलीं, आणि **रोमन** लोक **लातिन** लोकांमध्यें श्रेष्ठ होऊन राहिले. ह्यापुढें **रोमन** लोक व **आल्बन** लोक हे एक होऊन गेले. **रूम**चें राज्य कालक्रमेंकरून सार्वभौम झालें, तेव्हां त्यांतील अत्यंत नामांकित घराण्यांपैकीं पुष्कळ घराणीं **तलस** ह्याचे वेळेस **रूम** शहरांत जे **आल्बन** लोक येऊन राहिले होते, त्यांच्या वंशाचीं होतीं. **तलसहास्तिल्यस** ह्यास, त्याच्या पाठीमागून जो **अंकसमार्श्यस** नामें राजा गादीवर बसला त्यानें मारलें, असें ह्मणतात. तें असें कीं, त्यानें **तलसाच्या** घरास आग लावून देऊन असें उठविलें, कीं राजावर देवताक्षोभ होऊन त्याचा नाश झाला. **अंकसमार्श्यस** हा **न्युमाचा** नातू होय. त्यानें आजाप्रमाणें राज्यांत स्वास्थ्य राखून कारभार करावयाचा निश्चय केला; परंतु **रूम**चे शत्रु फारच उच्छृंखल होते, त्यांनीं त्यास फार दिवस स्वस्थ बसूं दिलें नाहीं, त्याला तरवार उपसावयास लाविलें. पुढें त्यानें **राम्युलस** व **न्युमा** ह्या उभयतांचे गुण आपल्या अंगीं आणतां आणतां आणिले. तो युद्धप्रसंगीं **राम्युलसा**प्रमाणें पराक्रम करीत असे, व स्वास्थ्यकालीं **न्युमा**प्रमाणें प्रजेचे हिताकडे लक्ष देत असे. त्यानें शत्रूंचा पराभव वारंवार केला, **तैबर** नदीस पूल बांधिला, आणि **रूम** शहराच्या हद्दी वाढविल्या. त्याचे राज्यांत मुख्यत्वेंकरून लक्षांत ठेवण्याजोगी ही गोष्ट घडून आली, कीं त्यानें **रूम** व समुद्र ह्यांच्यामध्यें जो मुलूख होता, तो जिंकून **आस्तिया** बंदर बांधिलें. त्या बंदरामुळें **रोमन** लोकांनीं जहाजें बाळगलीं; परंतु तीं जहाजें त्यांनीं व्यापाराकरितां किंवा समुद्रांत चांचेपणा करण्याकरितां बाळगलीं, ह्याविषयीं कोठें लिहिलें नाहीं. **अंकसमार्शस**

२३ वर्षे राज्य करून मृत्यु पावला. कोणी ह्मणतात, कीं त्याला स्वाभाविक मरण आलें; आणि कोणी ह्मणतात, कीं त्याला अपघातानें मरण आलें. त्याला दोन पुत्र होते, त्यांचें पालन करण्याकरितां त्यानें **तार्किनास** नेमिलें होतें. **तार्किन** हा परदेशांतला होता; परंतु त्याला राजाचा मोठा आश्रय होता.

**तार्किन ग्रीस** देशांमध्यें **कारिंथ** ह्मणून शहर आहे तेथील एका नागरिकाचा मुलगा होय. **ग्रीस** देशांत ह्या शहराएवढी मोठी दुसरी उतार पेठ नव्हती. त्या शहरांतील लोक नुकतेंच वसलेलें जें **रूम** शहर त्यांतील लोकांपेक्षां विद्याचारसंपन्न होते. **तार्किनाचा** बाप **हि-त्रुरिया** मुलखास रहावयास गेला होता; पण तेथें **तार्कि-नास** कांहीं कारणानें त्रास आल्यावरून तो आपली पुष्कळ संपत्ति होती ती बरोबर घेऊन **रूम** शहरास रहावयास आला. तो पराक्रमी होता व त्यानें तेथील लोकांमध्यें पैसा औदार्यानें खर्चला, ह्यामुळें त्यावर लोकांची कृपा बसली होती. पुढें **अंकसमार्श्यस** मरण पावल्यावर त्यानें राज्यपद मिळविण्याकरितां लोकांशीं संधान बांधिलें; आणि त्याला फारसा प्रयास न पडतां तें पद मिळालें. त्यास राज्यपद मिळतांच आसपासचीं संस्थानें त्याशीं लढाई करण्यांस उभीं राहिलीं; पण त्यानें त्यांचा अगदीं पराभव केला. ह्या वेळेस **हित्रुरिया** देशांतील सर्व संस्थानें **रूमचें** राज्य एका सपाट्या सरसें बुडवून टाकावें, ह्मणून एकदम त्यावर उठलीं; पण **तार्किनानें** त्यांचाही पराभव करून टाकिला. हा देश **तैबर** नदीच्या पलीकडे होता; आणि विस्तारानें **रूमच्या** राज्याचे दसपट होता. नंतर जिकडे

तिकडे स्वास्थ्य होऊन राजास फुरसत सांपडल्यावर त्यानें **रूम** शहर स्वच्छ करण्याकरितां, त्याला तटबंदी करण्याकरितां, व त्याला सुशोभित करण्याकरितां मेहनत घेतली. हीं कामें करण्याकरितां तो फारच योग्य होता, कारण तो **ग्रीस** देशांतला राहाणारा होता, ह्यामुळें तिकडल्या सुंदर इमारती व तट वगैरे त्याचे पाहाण्यांत होते. त्यानें आपल्या बुद्धिकौशल्यानें ज्या इमारती बांधल्या, त्यांपैकीं कांहीं अद्यापि आहेत. त्या पाहून हल्लींच्या लोकांसही आश्चर्य होतें. **रूमच्या** आसपासाच्या संस्थानांनीं पुनः दंगा केला, त्यामुळें **तार्क्विनास** रणभूमींत पुनः जाणें प्राप्त पडलें. ह्या प्रसंगीं त्यास नेहमींप्रमाणें यश आलें. पुढें त्यास मारेकऱ्यांनीं मारलें. त्या वेळेस त्याचें वय ८० वर्षांचें होतें. त्यानें ३७ वर्षें राज्य केलें. त्याचे मागून **सर व्यसतल्यस** राज्यपदावर आला. तो हलक्या कुळांतला होता; पण त्याची बुद्धि मोठी ग्राहक होती. **तल्यसानें** पुष्कळ लढायांमध्यें जय मिळविला होता, व त्याच्या अंगीं वक्तृत्वशक्ति मोठी चमत्कारिक होती, ह्मणून त्यावर लोकांची मर्जी बसली होती, ह्यामुळें राज्यपदावर त्याला नेमूं नये, असें **सिनेट** सभेतील सभासद ह्मणत असतां साधारण लोकांनीं त्यासच नेमावें असें आपलें मत देऊन त्याला राज्यपदावर बसविलें. त्याच्या राज्यामध्यें लक्षांत ठेवण्याजोग्या अशा दोन गोष्टी घडल्या. त्या अशा, कीं त्यानें पूर्वीं राज्यकारभार ज्या प्रकारानें चालला होता तो प्रकार अगदीं बदलून टाकिला, व **रोमन** लोक व **लातिन** लोक ह्यांचें ऐक्य करून टाकिलें. पहिली चाल अशी होती, कीं राज्य प्रकरणीं मोठमोठ्या

गोष्टींविषयीं विचार पडला असतां त्यांचा ठराव नागरिक लोक करीत, आणि त्या सर्व नागरिकांच्या मतांची योग्यता सारखी असे, ह्मणून ते आपआपल्या वर्गाचीं मतें देत, व नागरिकांमध्यें कोणास उत्पन्न किती आहे ह्याचा विचार न करितां सरकार सर्वांपासून सारखा कर घेत असे. **तल्यसानें** लोकांचे नवेच वर्ग केले, त्या योगानें कराचें मोठें ओझें मातबर लोकांवर पडलें, व त्या प्रमाणानें त्यांच्याकडे राज्य कारभार चालविण्याचा अधिकारही विशेष आला. ह्याप्रमाणें त्यानें शहरांतील लोकांच्या दौलती पाहून त्या बरहुकूम व्यवस्था केली, आणि ती सुरळीतपणें चालावी, ह्मणून त्यानें असा ठराव केला, कीं पांच पांच वर्षांनीं लोकांची खानेसुमारी करून त्यांच्या मालमत्तेची याद करीत जावी. आजपर्यंत राजाकडे जो अधिकार होता त्यापैकीं पुष्कळ अधिकार त्यानें **सिनेट** सभेस दिला. ज्या लढायांच्या योगेंकरून **रूम** शहर पूर्वावस्थेंत नाश पावेल असें भय वाटत होतें, त्या लढायांपैकीं बहुतेक लढाया **लातिन** लोकांशीं कज्जा झाल्यामुळें उपस्थित झाल्या होत्या, ह्मणून त्यांचें व **रोमन** लोकांचें ऐक्य दृढ करण्याविषयीं **तल्यस** हा फार काळजी वाहत असे. ह्याकरितां त्यानें **लातिन** लोकांस बोलावून आणून असा ठराव करून घेतला, कीं आह्मी व **रोमन** लोक मिळून **रूमचे** एका टेंकडीवर वर्षास एक धर्मसंबंधी उत्साह करीत जाऊं, आणि मग सभा करून तीमध्यें परस्परांच्या मधील तंटे मिटवीत जाऊं. ह्याप्रमाणें त्यानें **रोमन** लोकांस व **लातिन** लोकांस गुंतवून टाकिलें. अशा प्रकारें **रूमचे** राज्यांत स्वास्थ्य होऊन बाहेरील राज्यांशीं ऐक्य

झाल्यावर असा संभव दिसूं लागला, कीं ह्या राजाला तरी सुखानें मरण येईल; पण त्याच्या दुष्ट जांवयानें त्यास मारून टाकिलें, आणि त्याच्या छिन्नभिन्न शरीरावरून त्याच्या कन्येनें आपली गाडी हाकली. हा जांवई पहिले **तार्किनाचा** नातू होता. त्याचें नांव **तार्किनच** होतें, आणि ह्याचे आंगीं ह्याच्या आजाचें पाणीही पुष्कळ होतें. इतिहासकार ह्याचे आंगीं पुष्कळ दुर्गुण होते असें लिहितात; पण ह्याचे अमलांत एकसत्तात्मक राज्य बुडून लोकसत्तात्मक राज्याची स्थापना झाली, ह्यामुळें ह्याची हरएक प्रकारची हेळणा करण्याची चालच पडून गेली आहे, ही गोष्ट लक्षांत आणिली पाहिजे. तो मोठा युद्ध कुशल होता, व आपल्या आजाचा शहर शुशोभित करण्याचा जो उद्देश तो सिद्धीस नेण्याकरितां त्यानें हरएक प्रकारें प्रयत्न केला, हें अगदीं निर्विवाद आहे. परंतु लढाई करण्यास व इमारती बांधण्यास पैसा पाहिजे तो उत्पन्न करण्याकरितां त्याला लोकांवर कर बसविणें प्राप्त पडलें, ह्यामुळें सामान्य लोक कुरकूर करूं लागले, आणि तो पिढीजाद वडे लोकांस आकळण्यास पूर्वीपासूनच पहात होता, तेव्हां त्यांनीं सामान्य लोकांस आणखी चेतवून दिलें. ह्याप्रमाणें **रोमन** लोक चेतले असतां **तार्किनाच्या** मुलाच्या कामार्मीनें फारच पेटून त्यांनीं एकसत्तात्मक राज्य भस्म करून टाकिलें. तें असें, कीं **तार्किनाचा लुश्यस तार्किन** ह्मणून एक मुलगा होता. तो कोण्या एका वडे लोकाच्या **लुक्रिशिया** नांवाचे स्त्रीविषयीं कामातूर होऊन त्यानें तिजवर बलात्कार केला. तेव्हां ती आपले पोटांत कटार मारून घेऊन मेली. त्या वेळेस **तार्किन** राजा हा तेथें नव्हता. तो

रूमशहरापासून दाहा कोसांवर एके शहरास वेढा घालीत होता. त्यामुळें त्याचे शत्रूंस आपला मतलब पुरा करण्यास मोठी सवड सांपडली. त्यांनीं **लुक्रिशियाचें** मरणाचें वर्तमान शहरभर पसरल्यामुळें सर्व लोकांस मोठा आवेश आला. तेव्हां बडे लोक **सिनेट** सभेंत जमा झाले; आणि त्यांनीं लोकांबरोबर रागावून एकदम असा ठराव केला, कीं **तार्किन** व त्याचे नातलग ह्यांस हद्दीपार करावें, आणि त्यांस राज्यांत पुनः कधीं येऊं देऊं नये, व त्यांस पूर्वस्थितीवर आणण्याविषयीं जे झटतील त्यांस देहांत शिक्षा मिळेल.

आतां पुढें कसें काय करावें ह्याविषयीं विचार करण्याकरितां लोक जमले, तेव्हां राज्य प्रकारामध्यें उलटापालट करण्याविषयीं मुख्य कारणभूत जो **ब्रूतस** तो असें ह्मणाला, कीं राजा हें नांव व त्याची गादी हीं अगदींच नाहींशीं करून टाकावीं, दरसाल दोन मुख्य अधिकारी निवड करून नेमावे, आणि त्यांस **कान्सल** असें ह्मणत जावें, आणि सदरहू मुख्य अधिकाऱ्यांस राजाचा पोशाक खेरीज करून जे जे अधिकार राजाला आहेत, ते द्यावे. ह्याप्रमाणें १६ प्रहरांत **रूमचे** राज्य रचनेची अगदीं अदलाबदल झाली. **ब्रूतस** व **लुक्रिशिया** हिचा नवरा ह्या दोघांस अर्थातच प्रथमतः **कान्सल** नेमलें.

# प्रकरण २.

## लोकसत्तात्मक राज्याची स्थापना झाली त्या वेळेपासून रोमन लोकांनीं रूमशहर पुनः बांधिलें त्या वेळेपर्यंत.

**पोरसेनानें** रोमन लोकांचा पराभव केला— **दिक्तेतर** ह्मणून नवीन अधिकाऱ्याची नेमणूक— **रेजिलस** तळ्याजवळची लढाई— सामान्य लोक त्रासले— ते **सेसर** टेंकडीवर गेले— सामान्य लोक व बडे लोक ह्यांचा समेट— सामान्य लोकांचे त्रिब्यून— **कार्योलेनस— स्पूर्यस केश्यस**— द्वादश पट्टांचा कायदा— दशाधिकारी— **अप्यस क्लाद्यस— वर्जिनिया**— लष्करी त्रिब्यून— **स्पूर्यस मिल्यस— वेई** शहराचा मोड— **गाल** लोकांची स्वारी— **रूम** शहराचा नाश— **कामिलस.**

**रूम** शहराचा पाया पडल्यापासून २४३ वर्षांनीं त्यांतील एकसत्तात्मक राज्य नष्ट झालें. बहुतकरून ह्या काळापर्यंत **रोमन** लोक सभोंवतालचे लोकांशीं लढायाच करीत होते. आणि इतिहासकार लिहितात, हें खरें असल्यास **रोमन** लोकांचा बहुधा जयच होत गेला असें दिसतें; पण कान्सल नेमिलें तेव्हां **रोमन** लोकांचा मुलूख शहरापासून थोडक्याच कोसांपर्यंत पसरला होता. **रोमन** लोकांचें बल त्यांचे मुलखाच्या विस्तारावर नव्हतें, तर **रूम** शहरांतील नागरिक लोकांच्या संख्येवर व शौर्यावर होतें. **रोमन** लोक नवा मुलूख जिंकिला ह्मणजे तेथील कांहीं लोकांस **रूम** शहरांत राहण्याकरितां आणीत, आणि त्यांस नागरिकांचे हक्क देत; येणेंकरून **रूम** शहरांत नागरिक वाढले होते.

ह्या वेळेस **तस्कन** लोकांचे सामर्थ्याचा कळस झाला होता, ह्यास्तव राज्याचें हद्दीपार करून दिलेला जो **तार्किन** राजा ह्यानें आपलें साहाय्य करावें ह्मणून त्यांस विनंती केली. त्यावरून **तस्कन** लोकांमध्यें **रूम** शहराच्या अत्यंत जवळ जे **वेन्ती** लोक होते, त्यांनीं त्याचा पक्ष स्वीकारला. नंतर त्यांची व **रोमन** लोकांची एक मोठी लढाई होऊन तीमध्यें **रोमन** लोकांनीं त्यांचा पराभव केला. त्या लढाईंत **ब्रूतस** नामें कान्सल व **तार्किनाचा** मुलगा **आरन्स** हे परस्परांस वार करून मेले. पुढें थोडेच दिवसांनीं **तस्कनींतील** **क्रूश्यं** नामें शहरच्या **पोरसेन** राजानें **तार्किनाचा** पक्ष स्वीकारला. आणि तो जबरदस्त फौजेनिशीं **रूम** शहरावर चालून आला. नंतर **रोमन** लोकांची व त्याची लढाई झाली. **रोमन** लोकांचें सैन्य विजातीय पराक्रमी असतां व **काक्लेस** व **मुश्यस** हेही महान योद्धे असतां **पोरसेनानें** **रोमन** लोकांचा पराभव करून त्यांपासून कांहीं मुलूख घेतला, आणि शेतकीचे कामाखेरीज दुसरे कामांत लोखंडाचा उपयोग करण्याविषयीं त्यांस मनाई केली. **पोरसेन** विजय करीत करीत **तैबर** नदीचे दक्षिणेस **लातिन** लोकांचे मुलखांत गेला. तेथें **क्युमा** शहराचा नायक जो **अरिस्तामिनस** ह्याच्या हातून त्याचा पराभव झाला नसता, तर त्यानें **रोमन** लोकांचें नांव बहुतकरून नाहींसें केलें असतें. **पोरसेनाचा** पराभव झाला, ही संधि **रोमन** लोकांनीं मोठ्या त्वरेनें साधून आपला मुलूख सोडवून घेतला.

**तस्कनी** देशापासून पुढें साहाय्य मिळण्याविषयीं अगदीं निराशा झाल्यावर **तार्किनानें** **लातिन** लोकांस आप-

त्या पक्षाचे केले. वर्षास एकत्र जमून धर्मसंबंधीं उत्साह करावा, आणि सभा करून तीमध्यें परस्परांचे जे तंटे असतील, ते तोडून सला राखावा, असा **लातिन** लोकांचा व **रोमन** लोकांचा ठराव होता; पण **रोमन** लोकांचें महत्व वाढत चाललें होतें, तें पाहून त्यांच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला. ह्यामुळें **लातिन** लोकांशीं युद्ध करण्याकरितां **सिनेट** सभा सैन्य जमवावयास लागली, तेव्हां सैन्याच्या पटांत सामान्य लोकांपैकीं कोणी नांव घालीना. कारण **तार्किन** राजास मुलखांतून काढून दिल्यावर राज्यांतील सर्व अधिकार बडे लोकांनीं आपणांकडेच वस्तुतः घेतला होता; व बहुतेक सामान्य लोक बडे लोकांचें कर्ज लागत होते, आणि **रूमचा** असा कायदा होता, कीं सावकारानें, कर्जकऱ्यांस घरांत कोंडून जितके पाहिजेत तितके कोरडे मारावे; ह्यामुळें बडे लोक सामान्य लोकांस गांजीत होते. सामान्य लोक तर हट्टास पेटले होते. ते यादींत नांवें घालीत ना; आणि **लातिन** लोकांनीं तर लढाईची तयारी सपाट्यानें चालविली होती. अशा कचाटींत **सिनेट** सभेनें एक युक्ति काढिली, ती अशी, कीं साहा महिनेपर्यंत एक नवा अधिकारी नेमून त्यास **दिक्तेतर** असा किताब द्यावा. तो कामावर आहे, तोंपर्यंत दुसरा कोणाचा अमल चालू नसावा, तो सांगेल तें ऐकावें. आणि त्याच्या हुकुमावर अपील होणार नाहीं. ह्या नव्या अधिकाऱ्यास कुलअखत्याराचीं वस्त्रें मिळतांच त्यानें सामान्य लोकांचे मनांत दहशत उत्पन्न केली, तेणेंकरून त्यांनीं सैन्याचे पटांत भराभर नांवें घातलीं. पण तितक्यांत **लातिन** लोकांकडून अरिष्ट येणार होतें, तें तसेंच राहिलें, ह्यामुळें **दिक्तेतर** ह्यानें आपला अधिकार

सोडून दिला. पुढें कित्येक वर्षांनीं **लातिन** लोकांनीं आपलें सामर्थ्य **रोमन** लोकांशीं ताडून पहाण्याचा निश्चय करून आपली सर्व फौज जमा केली. मग **रोमन** लोक व **लातिन** लोक ह्यांच्यामध्यें **रेजिलस** तळ्याजवळ लढाई झाली. ती फार वेळ चालली होती. शेवटीं **रोमन** लोकांस पूर्ण जय प्राप्त झाला. त्या लढाईमध्यें **लातिन** लोकांचे ३३ हजार लोक पडले. ह्या प्रसंगीं **लातिन** लोकांचें सामर्थ्य अगदीं नष्ट झाल्यामुळें **तार्किनास** पुढें आशा राहिली नाहीं. ही लढाई **तार्किनास** राज्याचे हद्दोपार करून दिल्यावर १४ वर्षांनीं झाली. ह्या जयामुळें वडे लोकांचे मनांतील भय अगदीं नाहींसें झालें; आणि ते आपल्या कुळांवर ह्मणजे गरीब सामान्य लोकांवर पहिल्यापेक्षां अधिक सक्ती करूं लागले, तेणेंकरून **रूम** शहरांत पुनः दंगा होण्याची संधि येऊन ठेपली. अशा समयीं चिंध्या पांघरलेला व व्रिडीचे ओझ्यानें वांकलेला असा एक वृद्ध मनुष्य कैदेंतून पळून येऊन, त्यानें लोकसभेकडे आपल्या बचावाबद्दल अर्ज केला; आणि ज्या ज्या लढाया त्यानें मारल्या होत्या, त्यांचा पाढा तिच्यापुढें वाचला व त्याचे सावकार जे वडे लोक त्यांनीं निर्दयपणानें त्याला मारल्यामुळें अंगावर जे रक्ताळलेले वळ उठले होते ते दाखविले. तेव्हां सामान्य लोकांस त्याची दया येऊन वडे लोकांचा फार संताप आला आणि असल्या क्रूरपणापासून सुटका असावी, ह्मणून शहरभर एकच कल्होळ होऊन गेला. **सिनेट** सभेंतील सभासद लोक असा कांहीं कल्होळ झाला, ह्मणजे तिकडून लोकांचें मन काढण्याकरितां ते कोणाशीं तरी युद्ध सुरू करीत, ह्मणून त्यांनीं ह्या

प्रसंगीं **वोल्सी** लोकांशीं युद्ध करावयाचें असें प्रसिद्ध केलें. पण सामान्य लोक सैन्यपटांत नांव घालीतना. शेवटीं **सर-विल्यस** नांवाचे कान्सलानें पुढें होऊन सांगितलें, कीं जे लोक आपलीं नांवें लष्करी पटांत लिहितील, ते लष्करांत राहातील तोंपर्यंत कर्जाबद्दल धरिले जाणार नाहींत. ह्याप्रमाणें कान्सलानें सामान्य लोकांची खातरजमा केल्यावर ते लोक स्वसंतोषानें निशाणाजवळ* जमा झाले. नंतर ते शत्रूंवर चालून जाऊन त्यांस जिंकून लूट घेऊन परत आले. ह्याप्रमाणें सामान्य लोकांचा बैदा मोडून स्वस्थता झाल्यावर वडे लोक त्यांवर पुनः जुलूम करूं लागले, तेव्हां त्यांनीं पुनः बैदा केला; परंतु **सिनेट** सभेंतील सभासद लोकांनीं नवीन युद्धाची तयारी केली, ह्या योगानें वें **दिक्तेतर** नामें अधिकारी नेमिला त्याचे भयानें, तो बैदा कांहीं दिवसपर्यंत दबून राहिला, व फौजेनें शत्रूवर चालून जाऊन यश संपादिलें. नंतर जे लोक **दिक्तेतर** ह्याचे हाताखालीं होते त्यांस फांटा मिळाला; परंतु कान्सलाचें लष्कर त्या वेळेस रणभूमींतच होतें. त्यांतील लोकांनीं आपल्या सेनापतीशीं उघडपणें बदलून त्यास सोडिलें; आणि ते **रूम** शहरापासून सुमारें दोड कोसावर **सेसर** म्हणून एक टेंकडी होती, तीवर जाऊन राहिले; तेथें त्यांनीं असा निश्चय केला, कीं ज्या शहरांत आपला बचाव होत नाहीं, तें शहर मुळींच सोडून द्यावें. नंतर **रूम** शहरामध्यें जे सामान्य लोक, होते, ते शहराच्या हद्दींतील दोन टेंकड्या धरून राहिले. इकडे वडे लोकांनीं आपल्या आश्रयानें राहिलेले जे नाग-

---

* रोमन लोकांच्या निशाणावर गरूड असे.

रिक लोक ह्यांसहवर्तमान हत्यारबंद होऊन रूम शहरांतील बाकीच्या टेंकड्या आपले अमलांत ठेवल्या. ह्याप्रमाणें **रोमन** लोकांच्या दोन फळ्या होऊन तें शहर नष्ट होण्याची संधि आली होती; परंतु सभासद लोकांनीं पडतें घेतल्यामुळें त्याचा बचाव झाला. त्यांनीं आपणच प्रथमतः तोडजोडीचें बोलणें लावावें; असा निश्चय करून **सेसर** टेंकडीवर जे सामान्य लोक जाऊन राहिले होते, त्यांस शहरांत येण्याविषयीं विनंती करण्यास वकील पाठविले. **रोमन** इतिहासकार असें लिहितात, कीं ते वकील तेथें गेल्यावरून त्यांपैकीं मुख्य वकिलानें सामान्य लोकांस शरीर आणि त्याचे अवयव ह्यांविषयी गोष्ट सांगून त्यांचा राग शांत केला. मग ते ह्मणाले, कीं मातबर लोक व बडे लोक ह्यांच्या जुलमापासून आमचें संरक्षण करण्याकरितां आमच्या पैकीं साहा अधिकारी वर्षाचे वर्षास निवडून नेमीत असल्यास आह्मी शहरास येण्यास, आणि मागील झालेल्या सर्व गोष्टी विसरण्यास कबूल आहों, हें त्यांचें बोलणें **सिनेट** सभेनें मान्य केलें. ह्या नवीन अधिकाऱ्यांस सामान्य लोकांचे त्रिब्यून असें नांव प्राप्त झालें. त्यांचें हें काम होतें, कीं त्यांनीं **सिनेट** सभेच्या दाराशीं बसावें, आणि **सिनेट** सभेचा ठराव सामान्य लोकांच्या हितास प्रतिकूल दिसल्यास त्यांनीं त्याचा निषेध करावा. त्यांच्या शरीरास कोणी धका लावूं नये, असें केलें होतें. त्यांस दर वर्षास निवड करून नेमीत असत. राजकुलास राज्याच्या हद्दीपार करून दिल्यावर १६ च वर्षांनीं प्रथमतः ही गोष्ट सामान्य लोकांस प्राप्त झाली. सामान्य लोकांचें हें मागणें **सिनेट** सभेनें मान्य केल्यामळें पढें ते नवें नवें मागत गेले.

शेवटीं राज्यकारभारसंबंधी हक्कांविषयीं सामान्य लोक व बडे लोक ह्यांच्यामध्यें अगदीं भेद राहिला नाहीं.

ही गोष्ट झाल्यानंतर पांच वर्षेंपर्यंत **रूम** शहरांत सर्व लोकांचें लक्ष **कार्योलेनस** नांवाच्या तरूण बडे लोकाचे खटल्यांत गुंतून गेलें होतें. **कार्योलेनस** हा गर्विष्ठ व पराक्रमी होता, आणि तो सामान्य लोकांचा अत्यंत धिक्कार करीत असे. त्याच्या अविचारामुळें त्यावर पुष्कळ खटलीं उपस्थित झालीं. तेव्हां सामान्य लोकांचे अधिकारी जे त्रिब्यून ह्यांनीं, आपला अधिकार वाढविण्यास ही संधि चांगली आहे, असें जाणून **कार्योलेनस**, हा जरी **सिनेट** सभेतील सभासद होता; तरी त्यास आपले वाईट वर्तणुकीचा जबाब देण्याकरितां सामान्य लोकांपुढें बोलावून आणिलें, तेणेंकरून शहरांत मोठी गडबड झाली; परंतु **सिनेट** सभेस रक्तश्राव न व्हावा ह्मणून काळजी होती, सबब त्रिब्यून अधिकाऱ्यांस कांहीं हरकत केली नाहीं. तेव्हां सामान्य लोकांनीं **कार्योलेनस** ह्यास त्याचे वाईट वर्तणुकीबद्दल व मोठ्या अपराधाबद्दल दोषी ठरवून शहरांतून काढून दिलें. तेव्हां तो फार संतापून सामान्य लोकांचा सूड घेण्याच्या उद्देशानें **वोल्शिया** देशचा राजा **रोमन** लोकांचा हाडवैरी होता त्याच्या दरबारास गेला, आणि मला फौज दिल्यास मी ती घेऊन स्वदेशीय लोकांवर जाईन, असें बोलून त्यानें **रोमन** लोक व **वोल्श्यन** लोक ह्यांच्यामध्यें कांहीं मुदतीचा तह होता, तो मोडण्याकरितां त्या राजास हुरूप आणिला. मग त्या राजाची फौज घेऊन तो निघाला आणि सामान्य लोकांच्या शेतांची नासधूस करीत करीत व शहरामागून शहर घेत घेत तो **रूम** शहरावर चालून

आला. त्याशीं सामना करण्याजोगा पराक्रमी सरदार **रूम** शहरांत त्या वेळेस कोणी नव्हता, ह्यामुळें **रूम**च्याच एका क्षुद्र नागरिकाच्या हातून **रूमचें** नांव बुडाल्यावांचून सहसा रहात नाहीं, असें दिसून आलें. तेव्हां **कार्योलेनसाची** आई व स्त्री अशा दोघी जणी, **रूम**शहरांतील थोरथोर लोकांच्या प्रौढ बायकांस बरोबर घेऊन त्याचे लष्करांत गेल्या, आणि त्यांनीं त्याच्या पायां पडून विनंती केली, कीं ज्या शहरांत तुझा जन्म झाला त्या शहरास वांचीव, तेव्हां अभिमान व ममता ह्यांची फार वेळपर्यंत झटापट झाली. शेवटीं त्या निष्टुर **कार्योलेनसास** द्रव येऊन तो आईला ह्मणाला, कीं तूं **रूम** शहराचा बचाव केला, परंतु आपला पुत्र गमाविला. नंतर कांहीं निमित्त करून सैन्यानिशीं तो तेथून निघून गेला, त्यामुळें **वॉलश्यन** लोकांची **रूम** शहराचे लुटीविषयीं निराशा होऊन त्यांनींच त्यास मारून टाकिलें, असें ह्मणतात. ही गोष्ट **क्रिस्ताचे** पूर्वीं ४८७ वे वर्षीं झाली. ह्यानंतर **रूमचे** इतिहासांत दुसरी विशेष गोष्ट ही आहे, कीं **स्पूर्यसकेश्यस** ह्मणून एक बडा लोक **रूम** शहरांत होता त्याचा नाश झाला. तो मनुष्य कान्सलाचे हुद्यावर असतां त्यानें दोन वेळां विजययात्रा* भोगिली होती. त्याला सामान्य लोकांचे क्लेश पाहून करुणा आली, आणि त्यानें **अग्रेरियन** कायदा चालू करण्याचें उपस्थित केलें. ह्या कायद्याविषयीं **रूम** शहरचे लोक सत्तात्मक राज्यामध्यें शेंकडों वर्षेंपर्यंत तंटे चालले होते, व ह्याविषयीं अर्वाचीन इतिहास कर्त्यांमध्येंही वाद पुष्कळ झाला आहे. कांहीं

---

*[illegible]ोणास मोठा जय प्राप्त झाला असतां त्यास समारंभानें शहरांतून मिरवीत असत.

इतिहास कर्त्यांचें मत असें आहे, कीं **रूम** शहरांतील मातबर लोकांच्या जमिनी घेऊन त्यांची वांटणी सामान्य लोकांत करावी, असें त्या कायद्यामध्यें होतें. कोणी असें ही ह्मणतात, कीं जिंकलेल्या जमिनी बडे लोकांनीं घेऊन त्यांचे साऱ्याबद्दल त्यांतील उत्पन्नापैकीं दाहावा हिस्सा सरकारास देण्याचा करार केला होता; परंतु त्या लोकांचें प्राबल्य सरकारांत वाढल्यावर त्यांनीं तो सारा देणें नाकबूल केलें, सबब त्या जमिनी त्यांपासून परत घेऊन त्या सामान्य लोकांचे बहादुरीनें जिंकिलेल्या होत्या, ह्मणून नेमस्त साऱ्यानें त्या लोकांमध्येंच वांटून द्याव्या, असें त्या कायद्यामध्यें होतें. सदरहू दोन्ही मतांपैकीं कोणतेंही मत खरें धरिलें, तथापि तो कायदा मातबर लोकांस त्रासदायक होता, व सामान्य लोकांस संतोषकारक होता, हें स्पष्ट आहे. ह्यास्तव सभासद लोकांनीं, तो कायदा चालवावा ह्मणून ह्मणणारा जो **स्पूर्यसकेश्यस** ह्यासच नाहींसा करून टाकण्याचा निश्चय केला. कितीएक इतिहास कर्त्ते लिहितात, कीं **सिनेट** सभेनें ह्याचा राजपद मिळविण्याचा बेत आहे असा त्यावर गुन्हा आणिला, आणि कायद्याप्रमाणें त्याची चवकशी करून **तार्पियन** डोंगरावरून त्याचा कडेलोट करावा, अशी शिक्षा ठरविली. ही शिक्षा **रूम** शहरांत राजत्व लोभाचे अपराधाबद्दल ठरली होती. परंतु दुसरे ग्रंथकार असें लिहितात, कीं त्यास त्याचे शत्रूंनीं **क्रिस्ताचे** पूर्वी ४८४ वे वर्षी ह्मणजे **वोलश्यन** लोकांनीं **कार्योलेनस** ह्यास मारून टाकल्यापासून तीन वर्षांनीं गुप्तपणें मारून टाकिलें.

**केश्यस** ह्याचे मरणानंतर ३० वर्षें गुजरलीं त्यांमध्यें

मोठीशी सांगण्याजोगी गोष्ट घडली नाहीं; परंतु आसपासच्या लहान लहान संस्थानांशीं लढाया निरंतर चालल्या होत्या. आणि त्यांत **रोमन** लोक बहुधा यशच मिळवीत गेले, व **रूमचे** राज्यांत अपसांतील कज्ये चाललेच होते. सामान्य लोकांस त्रिब्यून मिळाले होते, तेव्हां ते आपला अधिकार वाढविण्याविषयीं प्रयत्न करीत; तेणेंकरून सामान्य लोक व बडे लोक ह्यांच्यामध्यें निरंतर तंटे होत, आणि उभयतांमध्यें फार दिवस झटापटी झाल्या ह्मणजे शेवटीं ज्या गोष्टीबद्दल कज्या चालत असे, ती गोष्ट बडे लोकांस मान्य करणें प्राप्त पडे. सामान्य लोकांकडील अधिकाऱ्यांनीं **अग्रेरियन** कायदा पुढें आणिला, ह्मणजे **सिनेट** सभेंतील सभासद लोक त्यापासून सामान्य लोकांचें लक्ष्य उडविण्याकरितां कोणत्या तरी शेजारचे संस्थानांशीं युद्ध करण्यास जात. सामान्य लोकांचें महत्व वाढत चाललें, तेव्हां प्रत्येक वर्गाचे एक अमुक हक्क व ते त्या त्या वर्गांतील लोकांस सारखे मिळावे ह्याविषयीं एक कायद्याचें पुस्तक असावें, असें वाटल्यावरून सामान्य लोकांकडील एका **तेरेंतिलस** नांवाच्या त्रिब्यूनानें ह्याविषयीं ठराव व्हावा ह्मणून बोलणें काढलें; परंतु **सिनेट** सभेच्या सभासदांकडे बेमोसल्याचा अधिकार होता, तेव्हां कायदे लिहून टाकिले असतां लागलाच तो बुडेल; ह्मणून त्यांनीं मोठी धामधूम करून त्या त्रिब्यूनाचें बोलणें हाणून पाडिलें; परंतु ह्याबद्दल कितीएक तंटे बखेडे झाल्यावर शेवटीं **सिनेट** सभेनें कायदे लिहिण्याचें कबूल केलें. नंतर तिनें तीन नामांकित गृहस्थांस वकील नेमून त्यांस **आथेन्स** शहरास

जाऊन **सोलनचे** कायदे आणण्याकरितां रवाना केले त्या वेळेस **पेरिक्लसचे** अंमलात **आथेन्स** शहराचे वैभवाचा कळस झाला होता. सदरहू तीन वकील दोन वर्षांनीं कायदे घेऊन आले. नंतर **रूम** शहरचे पराकाष्ठेच्या शाहाण्या बडे लोकांमधून दाहा लोक पसंद करून त्यांस कायद्यांचें पुस्तक विचारपूर्वक तयार करण्याचे कामावर नेमिलें. ह्या मनुष्यांची नेमणूक फक्त वर्षभर होती, व त्यांस कुल अखत्यार दिला होता, सबब दरबारांतील इतर सर्व अधिकाऱ्यांचीं कामें महकूब झालीं. ह्यामुळें त्या दाहा अधिकाऱ्यांकडे एक कायद्यांचें पुस्तक करणें व दुसरें सरकारी कामकाज चालविणें अशीं दोन कामें आलीं. त्या अधिकाऱ्यांची कामावरील निष्ठा व परिमिताचरण हे दोन्ही गुण इतके तारिफेचे होते, कीं सामान्य लोक आपले दंगेखोर त्रिब्यूनांकडील अधिकार गेला ह्मणून हळहळ करीत होते, ते हळहळ करण्याचें टाकून हा श्रेयस्कर राज्यप्रकार अक्षयी होईल तर बरें असें ते इच्छूं लागले. वर्षाची मुदत संपण्याचे सुमारास त्या दाहा बडे लोकांनीं कायद्यांचे मसुदे केले होते, ते सामान्य लोक व बडे लोक ह्या उभयतांकडे पहाण्याकरितां पाठविले. त्यांनीं ते पसंद करून त्यांस **रूमचे** राज्यरचनेचे अंशभूत असें मानलें. पुष्कळांचें ह्मणणें पडलें, कीं आणखी कांहीं कायदे करणें जरूर आहे, त्यावरून दशाधिकाऱ्यांनीं पुनः वर्षभर काम चालवावें, असें ठरलें. नंतर सदरहू दाहा अधिकाऱ्यांमध्यें **अप्यसक्लाडस** ह्या नांवाचा दुष्ट व धारिष्टवान् मनुष्य होता, त्यानें हें कायदे करण्याचें काम पुनः मिळविण्याकरितां अर्ज केला, तेव्हां तें काम त्याला मिळालें

एवढेंच नाहीं, तर त्यानें बाकीचे नऊ अधिकारी आपल्या हस्तकांतून पसंद करविले. राज्यकारभार चालविण्याचा अधिकार हातीं आल्यावर ते अधिकारी परमिताचरणानें न वागतां लोकांवर जुलूम करूं लागले, ह्यामुळें लोकांस पूर्वी जितकें सुख होतें तितकें आतां त्यांस दुःख होऊं लागलें. त्यांच्या जुलमाच्या ओझ्यानें सामान्य लोक व वडे लोक हे बरोबरच चिरडले गेले. त्यांचे नेमणुकीचे वर्ष भरलें असतांही कायदे अद्यापि पुरे झाले नाहींत, अशा निमित्तानें ते आपल्याच अखत्यारानें कामावर काईम राहिले, ह्यामुळें त्यांचे जुलुमापासून सुटका होण्याची आशा दिसेनाशी झाली. तेव्हां सिनेट सभेंतील बहुतेक सभासद लोक राज्याची काळजी बिलकूल सोडून देऊन रूमशहर टाकून मुलखांत जाऊन राहिले. सामान्य लोकांपैकीं बहुतेक लोक तर निराश होऊन पडून राहिले; परंतु कोठें कांहीं आशा राहिली नाहीं, अशा समयीं अप्पसक्लाद्यस ह्याच्या लाजिरवाण्या वर्तणुकीनें त्या दशाधिकाऱ्यांचा जुलमी अमल नष्ट होऊन जुने अधिकारी आपआपल्या कामांवर आले. तो प्रकार असा, कीं एके दिवशीं एक अत्यंत सुंदर तरुण स्त्री सरकारी शाळेंत जात असतां तिजवर अप्पसक्लाद्यस ह्याची नजर अकस्मात् गेली, आणि तो तिजविषयीं अत्यंत कामातुर होऊन त्यानें आपल्या एका आश्रितास ही माझी दासी आहे, असें ह्मणण्यास पुढें केलें. मग ह्या गोष्टीची फिर्याद अर्थांतच अप्पसाकडे इनसाफास आली. तेव्हां असा इनसाफ केला, कीं तिजवर ज्यानें दावा केला आहे, त्यासच ती मिळावी. तेव्हां तिचा बाप वर्जिन्यस ह्यास तिची आब्रू वांचविण्याचा

उपाय कांहींच दिसेनासा झाल्यावर त्यानें शेजारचे एका दुकानांतून सुरी घेऊन ती तिचे पोटांत खुपसली, आणि ती रक्ताळलेली सुरी हातांत घेऊन अरे अप्यस मी ह्या रक्तानें तुझें डोकें अधोभुवनचे देवांस अर्पितों, असें बोलला. आणि तेथून निघून त्यानें त्या दशाधिकाऱ्यांचा जुलूम नाहींसा करण्याकरितां सर्व सामान्य लोकांस चेतवून दिलें. तेव्हां शहरांत मोठा दंगा माजला, आणि लोक एकत्र झाले. मग त्यांस फौज येऊन मिळाल्यावर त्यांनीं त्या जुलुमी दशाधिकाऱ्यांचा पाडाव करून राज्याचा प्रकार पूर्ववत् असावा, असा आग्रह धरिला. ह्याप्रमाणें रोमन लोकांस स्वतंत्रपणा दुसरे वेळेसही एका पुण्यवान् स्त्रीचे मरणानें प्राप्त झाला. नंतर सदरहू दशाधिकाऱ्यांस गुन्ह्यांचा जाबसाल देण्याकरितां कचेरींत येण्याविषयीं सिनेट सभेचीं समनें गेलीं. तेव्हां त्या गुन्हेगारांपैकीं कांहीं जण पळून गेले, व बाकी जे राहिले होते त्यांपैकीं कांहीं जणास मुलखांतून काढून देण्याची शिक्षा झाली, व दोघे जण मुख्य जे गुन्हेगार होते त्यांस कैद मिळाली; आणि ते तींतच मृत्यु पावले. ह्याप्रमाणें त्यांची दुर्गति झाली; पण त्यांनीं जे कायदे केले होते ते सर्वांनीं पसंत केले. दशाधिकाऱ्यांनीं पहिल्या वर्षीं जे दाहा कायदे केले होते ते व शेवटीं जे दोन कायदे केले ते हे सर्व पितळेच्या पट्टांवर खोदले. ह्यामुळें त्या कायद्यांस द्वादशपट्टांचे कायदे, असें नांव पडलें. हल्लीं त्या कायद्यांचे कांहीं भाग मात्र राहिले आहेत. दशाधिकाऱ्यांचा अमल तीन वर्षांवर कांहींसा राहून ख्रिस्ताचे पूर्वीं ४४७ वे वर्षीं नष्ट झाला.

त्यानंतर चार वर्षांनीं सामान्य लोकांकडील अधिकारी

जे त्रिब्यून ह्यांनीं, सामान्य लोकांस राज्यांतील उंच पदवीचा अधिकार ह्मणजे कान्सलाचा अधिकार मिळावा, असा आग्रह धरिला. हा अधिकार आजपर्यंत बडे लोकांसच मिळत होता. लोकांच्या ह्या नव्या मागण्यानें नेहमीं प्रमाणें मोठमोठाले वादविवाद होऊं लागले. कारण सिनेट सभेंतिल सभासद लोक त्या उंच पदवीवर कुलहीन मनुष्यांस नेमून ती हलकी करण्याविषयीं पराकाष्टेचे नाखुष होते; परंतु त्याविषयीं सामान्य लोक फारच बखेडा करूं लागले, तेव्हां सभासदांनीं निराळाच एक प्रकार काढिला. तो असा, कीं दोन कान्सलांचे ऐवजीं साहा लष्करी त्रिब्यून दरसाल नेमावें, आणि त्यांपैकीं तीन सामान्य लोक व तीन बडे लोक असावे. ह्या गोष्टीनें सामान्य लोक इतके संतुष्ट झाले, कीं बहुत वर्षेंपर्यंत ते ह्या कामावर साहाजग बडे लोकच पसंत करीत होते. त्यांचे पोटांत मुख्य हेतु हाच होता, कीं सामान्य लोक उंच पदवीचे कामांवर नेमण्यास योग्य नाहींत, असा जो डाग आहे तो नाहींसा करून टाकावा; ह्याप्रमाणें लष्करी त्रिब्यून नेमण्याचा ठराव झाला. तथापि सामान्य लोकांस आडवें येण्यापुरतें आपले अंगीं सामर्थ्य आहे, असें सिनेट सभेंतील लोकांस जेव्हां वाटे तेव्हां ते लष्करी त्रिब्यूनांचे ऐवजीं कान्सल नेमीत; पण सर्व गोष्टींचा विचार करून पाहिलें असतां रूमच्या राज्यांत ह्या काळीं स्वास्थ्य होतें, असें दिसतें. प्लिब्यन आणि पेत्रिशन ह्यांच्यांमध्यें शरीरसंबंध होऊं नये, ह्मणून द्वादशपट्टांत एक कायदा होता, तो रद्द झाला. ही गोष्ट सदरहू स्वास्थ्यास विशेषेंकरून अनकूळ झाली, व हो कायदा रद्द झाल्यानें कुटुंबांतील

आणसांमध्यें असें ऐक्य असतें, तसें रूम शहरांतील सर्व नागरिकांमध्यें ऐक्य होऊन गेलें.

क्रिस्ताचे पूर्वी ४४० वे वर्षी रूम शहरांत मोठा दुष्काळ पडून तें उद्वस्त होऊं लागलें, तेव्हां सामान्य लोकांमध्यें स्पूर्यस मिल्यस ह्मणून एक मातबर नैट होता, त्यानें हिव्रुरिया देशांत जितकें धान्य मिळालें तितकें आणून सामान्य लोकांस फुकट वांटून दिलें; तेणेंकरून तो सामान्य लोकांस फारच आवडूं लागला; पण सिनेट सभेंतील लोक त्याचा अत्यंत द्वेष करूं लागले. मग त्यांनीं ह्यानें राज्यपद मिळविण्याची उमेद धरिली आहे, असें स्पूर्यसावर कुभांड रचलें; आणि लोकसत्तात्मक राज्यावर जसें कांहीं मोठें संकट येऊन पडलें आहे, ह्या हिशोबानें त्यांनीं दिक्तेतर नेमून त्यास कुलअखत्यार दिला. दैवहीन स्पूर्यसास कचेरींत येण्याविषयीं दिक्तेतराचें बोलावणें आलें, तेव्हां त्यास दिक्तेतर ह्याचे हातून आपलें काय होणार हें कळतच होतें, ह्मणून तो सामान्य लोकांचे पाठीस दडाला. तेव्हां दिक्तेतराचा दुय्यम आहला ह्यानें स्पूर्यसावर चढून जाऊन तरवारीच्या एकाच घावानें त्यास मारून जमिनीवर पाडिलें. तेव्हां सिनासिनेतस ह्मणून एक जुना दिक्तेतर होता, तो अत्यंत कृपाळू व भला मनुष्य होता; पण तो स्वपक्षाच्या अभिमानानें अंध होऊन बोलला, कीं शाबास आहला आज त्वां लोकसत्तात्मक राज्याचा बचाव केला.

क्रिस्ताचे पूर्वी ४३८ वे वर्षापासून ४०४ थे वर्षापर्यंत ३४ वर्षांत काय काय घडलें तें सांगतों. ह्या चवतीस वर्षांत रोमन लोक आपल्या सभोंवतालील लोकांशीं लढाया

निरंतर करीत होते. त्यांमध्यें कधीं त्यांस जय मिळाला, व कधीं त्यांचा पराभव झाला, परंतु त्यांची सत्ता उत्तरोत्तर वाढतच होती. ह्या सतत लढायांनीं **रोमन** लोकांस हत्यारांची आवड प्राप्त होऊन त्यांस त्यांचा उपयोगही करतां येऊं लागला; आणि उत्तरोत्तर ते लोक दुनिया सर करण्यास तयार झाले. **क्रिस्ताचे** पूर्वीं ३०४ थे वर्षीं **रोमन** लोकांनीं **वेई** शहरास वेढा घातला. तें शहर **हित्रूरिया** देशांत **रूम** शहरापासून सुमारें साहा सात कोस लांब होतें. त्या शहरांतील लोक मोठे व्यापारी होते; त्यांचा मुख्य उद्देश स्वास्थ्य राखून धन संपादावें हा होता, आणि **रोमन** लोकांचा उद्देश फक्त मुलूख सर करण्याचा होता; पण **साम्नैत** लोक **इतली** देशच्या दक्षिणभागाचें राज्य करीत होते, ते आलीकडे इतके बलवत्तर झाले होते, कीं **रोमन** लोकांस त्या दिशेस मुलूख सर करण्याविषयीं अगदीं आशा नव्हती; सबब त्यानें उत्तरेचे अंगास **हित्रूरिया** ह्मणून मोठा देश पसरला होता, त्यावर डोळा फिरविला; परंतु त्या देशाचे तोंडींच **वेई**शहर होतें. हें स्वतंत्र असतां **रोमन** लोकांस पुढें जाण्याचा संभव अगदीं नव्हता, ह्याकरितां **सिनेट** सभेंतील सभासद लोकांनीं त्या शहरास मोठा बळकट वेढा घालण्याचा निश्चय केला. ह्या प्रसंगीं **वेई**शहरास आसपासचे कितीएक संस्थानांनीं कुमक केली, कारण कीं, हें शहर **रोमन** लोकांचे हातीं गेलें असतां पाठीमागून आपलींही शहरें **रोमन** लोक घेतील, असें त्या संस्थानांस पुरतेपणें समजलें होतें.

ह्या पूर्वीं **रूमचे** शिपाई लोक पदरचें खाऊन लढाईस जात होते, ह्यामुळें त्यांस आपलीं शेतें करण्याकरितां दर-

साल कांहीं दिवसपर्यंत घरीं परत यावें लागत असे. पण हिवाळ्यामध्यें **वेई** शहराचा वेढा काईम ठेवावयाचा होता, ह्मणून ह्या वेळेस **सिनेट** सभेस शिपाई लोकांस पगार देणें प्राप्त पडलें. **सिनेट** सभा सैन्यास पगार देऊन ठेवूं लागली, एवढ्या गोष्टीनें **रूमचे** राज्यकारभारामध्यें व सैन्याचे स्थितीमध्यें अगदीं पालट पडून गेला, व **रूमचें** महत्व वाढविण्याचा बेत प्रतिबंधावांचून सिद्धीस नेण्याचें **सिनेट** सभेस साधन प्राप्त झालें. कारण कीं, सामान्य लोकांचे अधिकारी त्रिब्यून हे पूर्वी फौजेच्या भरतीस हरकत करून **सिनेट** सभेस आडवून धरीत होते, परंतु आतां पगार मिळूं लागला व लूट मिळण्याची आशा असे, ह्यामुळे **रूम** शहरांतील सामान्य लोक, त्रिब्यून अधिकाऱ्यांची कानउघडणी न ऐकतां आपलीं नांवें लष्करी पटांत लिहिविण्यास उड्या घालूं लागले. सदरहु **वेई**शहर, सुमारें दाहा वर्षें वेढा पडल्यावर **क्रिस्ताचे** पूर्वीं ३९५ व्या वर्षी **कामिलस** नामें सरदाराच्या स्वाधीन झालें. ह्या पराक्रमी सरदारास, त्यानें लुटीमध्यें कांहीं अफ्रातफर केली, व त्रिब्यून अधिकाऱ्यांचे मनांत **रोमन** लोकांनीं **रूम** शहर सोडून **वेई**शहरास जाऊन राहावें अशी इच्छा होती, तीस त्यानें अडथळा केला, ह्यास्तव त्यास राज्यांतून काढून द्यावें ह्मणून शिक्षा झाली. ही गोष्ट **क्रिस्ताचे** पूर्वीं ३९० वे वर्षी ह्मणजे **वेई**शहर त्या सरदारानें हस्तगत केल्यापासून पांच वर्षांनीं झाली.

ह्यानंतर दुसऱ्या वर्षी अशी गोष्ट झाली, कीं **गाल** लोकांनीं **रूम** शहरावर स्वारी करून तें जमीनदोस्त केलें. सदरहू लोक, **इतली** देश फार सुपीक आहे असें ऐकिल्या-

वरून तो देश जिंकून तेथें वस्ती करण्याच्या उद्देशानें आले होते. त्या लोकांचा एक मोठा समुदाय **आल्प्स** पर्वतांतून **इतली** देशाचे मैदानांत येऊन त्यानें पो नदी उतरून, **हिट्रूरिया** देश लुटून फस्त केला. ते लोक **क्लूश्यं** शहरास वेढा घालण्यांत गुंतले असतां **तस्कन** लोकांनी **रोमन** लोकांस कुमक मागितली. तेव्हां **रोमन** लोकांनीं उत्तम कुळांतले परंतु नवशिके अशा तीन तरुण पुरुषांस वकील नेमून **गाल** लोकांस वेढा काढण्याविषयीं ताकीद करण्याकरितां त्यांस रवाना केलें. त्या वकिलांनीं **गाल** लोकांस वेढा काढण्याविषयीं मोठ्या गुरमीनें ताकीद केली, तेव्हां **गाल** लोकांनीं तिचा धिक्कार केला. मग त्या वकिलांस, आपण वकिलीचे कामावर आहों ह्या गोष्टीचें भान न राहून ते **गाल** लोकांवर हल्ला करण्याकरितां **क्लूश्यं** शहरांतील लोकांस सामील झाले. हें पाहून **गाल** लोकांचा सरदार **ब्रेनस** ह्यानें, त्या वकिलांनीं जो विश्वासघात केला, त्याबद्दल **रोमन** लोकांची कानउघडणी करण्याकरितां **रूम** शहरास वकील पाठविले; परंतु **रोमन** लोकांनीं त्या अपराधी वकिलांस शिक्षा नदेतां उलटें त्यांस मोठ्या अधिकारावर नेमिलें. ही खबर ऐकून **गाल** लोक अत्यंत संतप्त झाले, आणि त्यांनीं तत्क्षणीं **क्लूश्यं** शहराचा वेढा काढून साऱ्या फौजेनिशीं **रूम** शहरावरच चाल केली. ह्या प्रसंगीं **रोमन** लोकांचें शाहाणपण व धैर्य हीं गेलीं असें दिसतें. कारण त्यांनीं ह्या प्रसंगीं दिक्टेतर नेमावयाचा तो न नेमितां **गाल** लोकांस रोधण्याकरितां एका नवशिके मनुष्यास कांहीं फौजेनिशीं पाठवून दिलें. नंतर **रूम** शहरापासून सुमारें साडेपांच कोसांवर **आलिया** नदीजवळ लढाई झाली,

तींत **रूमचे** फौजेचा अगदीं मोड झाला. मग **गाल** लोक तेथून कूच करून **रूम** शहरावर चालून आले. इकडे **रोमन** लोकांनीं त्याचे संरक्षणाची कांहीं तयारी करून ठेविली नव्हती.

**गाल** लोक **रूम** शहराजवळ दाखल होतांचं उपाध्याय लोक व सामान्य लोक हे शेजारचे मुलखांतून पसरले; आणि **सिनेट** सभेंतील सभासदलोक व दुसरे अधिकारी ह्यांनीं सुमारें एक हजार फौजेनिशीं **बाले** किल्यांत जाऊन तेथें बंदोबस्त केला. सामान्य लोक व बडे लोक ह्यांपैकीं कांहीं वृद्ध मनुष्य मात्र **रूम** शहरांत राहिले होते. त्यांनीं आपले आवडते शहराचा नाश झाल्यावर जिवंत रहावयाचें नाहीं, असा निश्चय केला होता. ह्या मनुष्यांची कत्तल **गाल** लोकांनीं हं हं ह्मणतां करून, शहरांतील इमारती व घरें पाडून **बाले** किल्यास वेढा घातला. पुढें एके समयीं असें झालें, कीं ज्या टेंकडावर किल्ला होता, त्या टेंकडाचे शिखरावर जाण्याचा एक रस्ता बंदोबस्तावांचून राहिला, आणि त्या रस्त्यानें **गाल** लोक शिखराजवळ अगदीं जाऊन पोहोंचले; परंतु ह्या प्रसंगीं हंसपक्ष्यांनीं कलकलाट करून **रोमन** लोकांस बचाविलें. तें असें, कीं **मानःयस** ह्मणून एक माजी कान्सल होता, तो त्या पक्ष्यांचें कलकलाटानें जागृत होऊन धोक्याच्या स्थानाकडे धांवून गेला; आणि त्यानें हल्ला करणाऱ्या लोकांपैकीं जे पुढें होते त्यांस खालीं ढकलून देऊन आपले मित्रकुमकेस येईत तोंपर्यंत बाकीचे लोकांस अडवून धरिलें. किल्यास वेढा पडून सात महिने झाल्यानंतर शरत्कालांतली साथ उठली. तेणेंमुळें **गाल** लोकांचे फौजेंत बहुत लोक मरूं लागले; व धान्याच्या तो-

त्यामुळें **बाले** किल्यावरील **रोमन** लोकांची हिंमत खचत चालली. सबब **गाल** लोक व **रोमन** लोक ह्यांचे बोलणें होऊन **गाल** लोकांचा सरदार **ब्रेनस**, सुमारें साडेचार लाख रुपयांचे किंमतीची खंडणी घेऊन वेढा काढण्यास व **रोमन** लोकांचा मुलूख सोडून जाण्यास कबूल झाला. कोणी ह्मणतात, कीं **कामिलसानें** त्या सरदाराचा अगदीं पराभव करून टाकिला; परंतु हें सर्व कल्पित आहे.

**क्रिस्ताचे** पूर्वीं ३८९ वे वर्षीं **रूम** शहराची धूळधाणी झाली. **गाल** लोक परत गेल्यावर **रूमचे** सभासदलोक किल्यावरून खालीं आले; व सामान्य लोक आश्रयाकरितां बाहेर गेले होते ते परत आले. त्यांनीं **रूम** शहरांत इमारती पडून गंज झाला आहे, सबब तें शहर मुळींच सोडून देऊन जवळ वेईशहर आइतें बांधिलें आहे, व त्यांत हरएक प्रकारची सोय आहे, ह्यास्तव त्यांतच जाऊन राहावें ह्मणून गडबड मांडली. तेव्हां ज्यास माघारें बोलावून आणलें होतें असा जो **कामिलस** त्याच्या सहाय्यानें **सिनेट** सभेनें सामान्य लोकांची पुष्कळ कानउघडणी करून तो त्यांचा नाशकारक बेत रहित केला. ह्यावरून **कामिलस** ह्यास **रूम** शहरचा द्वितीय स्थापक असें ह्मणूं लागले. **रूम** शहरांत राहाण्याविषयीं सर्व लोकांचा निश्चय होऊन ते आपलें मोडलेलें शहर मोठ्या झपाट्यानें बांधूं लागले.

---

# प्रकरण ३.

## रूम शहर मोडलें होतें तें रोमन लोकांनीं पुनः बांधिलें, त्या वेळेपासून त्यांचे कार्थेजिनियन लोकांशीं पहिलें युद्ध सुरू होई तोंपर्यंत.

**मानल्यस** ह्याचा कडेलोट — **लिसिन्यसाचे** कायदे— सामान्य लोकांस सरकारी कामें देण्याविषयींचा ठराव—**कल्यस— साम्नैत** लोकांशीं युद्ध— **विसुवियस** पर्वताजवळची लढाई— **हित्रूरियन** लोकांशीं युद्ध—**रूम** शहरचा भरभराट—**पैरस** राजाशीं युद्ध—**रोमन** लोकांच्या वसाहतींचा प्रसार.

**रोमन** लोकांनीं **रूम** शहर बांधण्याचें काम पुरें केलें न केलें तों इतक्यांत जे लोक **रूमचे** राज्याची स्थापना झाल्यापासून **रोमन** लोकांशीं नेहमीं लढाया करीत होते ते त्यांवर पुनः चढून आले; परंतु **कामिलसानें** त्यांचा अगदीं मोड केला. त्या काळीं **कामिलसा**सारिखा प्रतापी दुसरा सेनाधिपति नव्हता. गरीब लोकांस आपलीं घरें पुनः बांधण्यास कर्ज काढणें प्राप्त पडलें; ह्यामुळें त्यांस त्यांचे सावकार जे श्रीमंत बडे लोक ह्यांपासून विजायतीय त्रास होऊं लागला, तेव्हां ज्याच्या शौर्येंकरून **रूमच्या** किल्याचा बचाव झाला, असा जो **मानल्यस** ह्यास त्या लोकांची दया येऊन त्यांचे दुःखाचें मोचन करण्याकरितां तो आपले पदरचा पैसा खर्चूं लागला. तेणेंकरून मातबर लोकांस संताप येऊन त्यांनीं हा सामान्य लोकांची कृपा संपादून राज्यपद मिळवावें अशा हेतनें त्या लोकांचे भजनीं लाग-

ला आहे, असा त्यावर आरोप आणिला, आणि दिक्तेतर नेमून **मान्ल्यस** ह्यास त्यापुढें चौकशीस आणिलें. आणि त्यास देहांत शिक्षा द्यावी असा ठराव होणार, तों इतक्यांत त्यानें सामान्य लोकांची अशी प्रार्थना केली, कीं मीं किल्याचा बचाव केला आहे त्यावर नजर देऊन जें करणें तें करावें, तेव्हां किला नजरेखालीं होता तोंपर्यंत त्याचे शिक्षेचा ठराव करण्याकरितां सामान्य लोकांस वळविण्याविषयीं **सिनेट** सभेंतील सभासद लोकांचें सामर्थ्य चालेना, सबब त्यांनीं आपला हेतु सिद्धीस नेण्याकरितां दरबाराची जागा बदली. नंतर त्याचे शिक्षेचा ठराव होऊन ज्या टेंकडावरून त्यानें **रूमचे** शत्रूंस खालीं ढकलून दिलें होतें त्याच टेंकडावरून त्याचा कडेलोट केला. ही गोष्ट **गाल** लोक निघून गेल्यावर चार वर्षांनीं घडली.

**मान्ल्यस** अपराधी ठरून त्यास कडेलोटाची शिक्षा झाल्यामुळें सामान्य लोकांची हिम्मत खचली असें दिसतें; **कश्यस** व **मिल्यस** ह्यांनीं त्यांचा कैवार घेतला होता ह्मणून त्यांस वडे लोकांनीं मारून टाकिलें, ह्या गोष्टीचा सामान्य लोकांस विसर पडला नव्हता. त्यांनीं आपले तर्फेचें बोलणें बोलणारे हे सर्व लागोपाट जबरदस्तीनें मारले गेले, असें पाहून आपल्या दुःखांचें निवारण होण्याचा संभव त्यांस दिसेनासा झाला. त्यांचें कर्ज **गाल** लोकांनीं **रूमावर** स्वारी करून ते मातीस मिळविल्यामुळें फार वाढलें; आणि ह्यास्तव त्यांवर सावकार लोक पहिल्यापेक्षां फारच सक्ति करूं लागले. राज्यकारभाराचा सर्व अधिकार वडे लोकांनीं आपणाकडे अक्षय करून घेतला, व जीपासून सुटका होण्याची आशाच नलगे अ-

शा दासावस्थेमध्यें साधारण लोक आतां बुडणार, असें दिसूं लागलें, तेव्हां दोन मनुष्यांचे धैर्यानें, व त्यांचे एकसारखे श्रमानें, सामान्य लोकांची उमेद खचली होती ती बळावून त्यांस राज्यांतील हरएक काम मिळण्याविषयीं रस्ता खुला झाला; हा मजकूर विशेष स्पष्ट करून दाखविण्याकरितां हें सांगणें प्रथमतः आवश्य आहे, कीं जातिनियमानें शूद्रांपेक्षां ब्राह्मणांमध्यें जितका श्रेष्ठपणा आहे तितका श्रेष्ठ-पणा सामान्य लोकांपेक्षां आपणामध्यें राखून आजपर्यंत त्यांनीं आपली एक जातच बनाविली. वडे लोक हे कुलीन व संपन्न होते; त्यांपैकींच सिनेट सभेंतील सभासद असत. आणि तेच लोकसत्तात्मक राज्याचा कारभार चालवीत. तेच सैन्य घेऊन लढाईस जात. तेच रूम शहराचा बंदोबस्त ठेवीत. तेच न्याय निवडीत. बळिदान करतेवेळेस मुख्यस्थानीं बसण्याचा जो मोठा अधिकार तो त्यांकडेच असे. आतां सामान्य लोकांपैकीं बहुतेक लोक गरीब व कष्ट करणारे असे होते, व त्या लोकांतून फौजेची भरती होत असे. वडे लोक व सामान्य लोक ह्यांच्यामध्यें शरीरसंबंध होऊं नये ह्मणून पूर्वीं कायदा होता; पण हा दुष्ट कायदा कांहीं दिवसपर्यंत रद्द झाला होता. ह्याशिवाय कांहीं सामान्य लोक श्रीमंत होऊन उदयास आले होते; तशांत त्यांच्या सोयरिकीही कुलीन घराण्यांशीं झाल्या होत्या, ह्यामुळें त्यांचे मनांत सरकारी हुद्याचे कामांत आपण वडे लोकांशीं भागीदार व्हावें, अशी इच्छा साहजिक उत्पन्न झाली. ह्याप्रमाणें रूम शहरांतील उभयपक्षांचें लोकांची स्थिति असतां लिसिन्यस व सक्स्स ह्या नांवांचे त्रिब्युनांनीं कांहीं कायदे काढले. ते असे १ साहा लष्करी त्रिब्युनांचे ऐवजीं दोन

कान्सल नेमावें; त्यांपैकीं एकजण वडे लोकांतला असावा, व एकजण सामान्य लोकांतला असावा. २ ज्या ज्या रकमा कुळांनीं सावकारांस व्याजाबद्दल ह्मणून दिल्या असतील, त्या त्या मुदलांत वजा करून बाकीच्या मुदलाची फेड, वर्षास एक हप्ता ह्याप्रमाणें तीन हप्त्यांनीं करून द्यावी. ३ **रूमचे** नागरिकांपैकीं कोणालाही पांचशें एकरांहून अधिक जमीन मिळूं नये; व वडे लोक ज्या जमीनीचा उपभोग करीत असतील, त्या जमीनीचे सान्याबद्दल त्यांनीं सरकारी जामदारखान्यांत दरसाल अमुक रुपये देत जावे. ब्राह्मण लोक जशी शूद्र लोकांची हेळणा करितात तशी **रूम** शहरामध्यें ज्यांची आजपर्यंत हेळणा होत आली, असे जे सामान्य लोक त्यांस संपन्न करण्याचा व त्यांस मोठमोठालीं कामें देण्याचा ज्या कायद्यांचा अभिप्राय होता ते कायदे ठरण्याकरितां सामान्य लोकांस वडे लोकांशीं खूबच भांडाभांड करावी लागली, हें वाचणाऱ्यांच्या ध्यानांत सहज येईल. सदरहू कायदे चालू न व्हावे ह्मणून **सिनेट** सभेंतील सभासदांनीं १० वर्षेंपर्यंत आपणाकडून होईल तितका प्रयत्न केला; पण सामान्य लोकांचा त्रिब्यून **लिसिन्यस** ह्यानें, आपले उद्दिष्ट कायद्यांपैकीं कोणताही कायदा चालू केल्यावांचून सोडावयाचा नाहीं असा निश्चय केला, आणि विजातीय नेट धरून सदरहू कायदे **सिनेट** सभेकडून शेवटीं मान्य करविले. ह्याप्रमाणें सामान्य लोकांनीं क्रिस्ताचे पूर्वीं ३६६ वे वर्षीं कान्सलाची पदवी मिळविण्याचा हक्क संपादून पुढें हलकेहलके तीस वर्षांत इतर सर्व सरकारी कामांतही हात शिरकाविला. उपाधिकाचा अधिकार मात्र केवळ वडे लोकांकडे राहिला होता

तोंही सामान्य लोकांस द्यावा असें **क्रिस्ताचे** पूर्वीं ३००वें वर्षीं झालें. ह्याप्रमाणें बडे लोक व सामान्य लोक हे उभयतां सरकारी अधिकारांचा उपभोग सारखा करूं लागले, ह्यामुळें दोन्ही लोकांमध्यें प्रतिस्पर्धेचीं कारणें नाहींशीं झालीं. ह्यावेळेपासून **रोमन** लोकांचे ऐश्वर्यास आरंभ झाला असें ह्मटलें असतां चालेल. ह्यापुढें **सेनेट** सभेच्या चातुर्यानें राज्यांतील सर्व मोठमोठ्या पराक्रमी लोकांचीं मनें परदेश सर करण्याकडे व स्वराज्याचा थोरपणा वाढविण्याकडे लागलीं. आणखी अशी एक दुसरी व्यवस्था झाली, कीं कान्सलाकडे अदालतीचें काम होतें तें काढून तें काम चालविण्याकरितां नवा एक अधिकारी नेमला, त्यास **प्रीतार** असें नांव दिलें.

सामन्य लोकांसही कान्सलाचा अधिकार द्यावा, असें ठरल्यानंतर चोवीस वर्षांनीं **सामनेत** लोकांशीं युद्ध सुरू झालें. ह्या चोवीस वर्षांत एके समयीं **रूम** शहरांत धरित्री अकस्मात् फाटली, तेव्हां उपाध्याय लोकांनीं असें सांगितलें, कीं **रोमन** लोकांस जी वस्तु अत्यंत अमोलिक वाटते, ती वस्तु आंत टाकिल्यावांचून धरणी मिटणार नाहीं. हें ऐकून **कर्त्यस** नांवाचा एक शूर नागरिक सर्व हत्यारें घेऊन घोड्यावर बसला, आणि त्यानें **रोमन** लोकांस हत्यारें व शौर्य ह्यापेक्षां दुसरें कोणतेंही मूल्यवान वाटत नाहीं, असें बोलून त्या फाटलेल्या जमिनींत उडी टाकिली. तेणेंकरून ती जमीन तात्काल मिटली, असें सांगतात. आणखी एक गोष्ट अशी झाली, कीं **गाल** लोकांनीं **रोमन** लोकांवर हला केला; पण **रोमन** लोकांनीं त्यांस **मानल्यस** ह्याचे विजातीय शौर्याचे योगानें मागें हटवून लाविलें.

तें शौर्य असे, कीं **मानल्यसानें** **गाल** लोकांकडच्या एका धिप्पाड योध्यास द्वंद्वयुद्धांत मारून टाकिलें. ह्या चोवीस वर्षांमध्यें **सिनेट** सभेंतील सभासद लोकांनीं **लिसिन्यस** ह्याचे कायदे एकीकडे ठेवण्याविषयीं व दोन्ही कान्सलांचें जाग्यावर वडे लोक निवडण्याविषयीं तिलमात्र कमी केलें नाहीं; तथापि सामान्य लोकांचें माहात्म्य उत्तरोत्तर वाढतच होतें. ह्या काळापर्यंत **रोमन** लोकांच्या लढाया **रूम** शहराचे आसपास पंधरा कोसांच्या घेरांत चालल्या होत्या; परंतु त्या घेरांतील सर्व शत्रू जिंकल्यावर विशेष पराक्रम करून दूर दूरचे प्रदेश जिंकण्याची उमेद **रोमन** लोकांनीं धरिली. **इतलीचें** सर्व स्वामित्व आपणांकडे असावें, ही गोष्ट त्यांच्या मनांत पूर्वींच येऊन चुकली होती.

**रूम** शहराचा पाया पडल्यापासून ४१०वे वर्षीं ह्मणजे **क्रिस्ताचे** पूर्वीं ३४२ वे वर्षीं **रोमन** लोकांचा व **सामनैत** लोकांचा सामना प्रथमतः झाला. **सामनैत** लोक हे दिवसानुदिवस **इतली** **देशाचे** दक्षिण भागीं आपला मुलूख वाढवीत होते. इकडे **रोमन** लोक हे आपल्या शेजारचे लोकांशीं लढाया करीत होते. एके समयीं **सामनैत** लोकांनीं **क्यांपेनियावर** स्वारी केली, तेव्हां त्या मुलखांतील राहाणाऱ्यांस त्यांपुढें युद्धास उभे राहाण्याचें सामर्थ्य नव्हतें, ह्मणून त्यांनीं कुमकेविषयीं **रोमन** लोकांस विनंती केली. ते कुमक देण्याविषयीं अनमान करूं लागले, तेव्हां **क्यांपेनियाचे** वकिलांनीं **स्वदेशीय लोकांचे** आज्ञेवरून **रोमन** लोकांस सांगितलें, कीं आमचा देश व आह्मी तुमचे आहों. मग **रोमन** लोकांनीं अगदीं दिरंग न लावितां **सामनैत** लोकांस असें सांगण्याकरितां वकील पाठविलें, कीं **क्यां-**

**पेनियाचे** लोक आतां आमचे आहेत, त्यांस तुह्मी उपद्रव करूं नये. तेव्हां **सामनैत** लोकांनीं **रोमन** लोकांचें बोलणें गर्वानें धिःकारलें. ह्यामुळें उभयतांमध्यें युद्ध सुरू झालें. तें साठ वर्षांवर चालून शेवटीं **इतली** देशाचा सर्व दक्षिण भाग **रोमन** लोकांच्या अमलाखालीं आला.

ह्या युद्धाच्या पहिल्या वर्षी **रोमन** लोकांनीं **सामनैत** लोकांपासून दोनदा जय मिळविला. **क्यांपेनिया** देशांत **रोमन** लोकांची फौज होती, तींतील लोकांनीं तेथें दंगा केला तो मोडण्यांत दुसरें वर्ष गेलें. युद्धाचे तिसरे वर्षी **रोमन** लोकांनीं **सामनैत** लोकांचा मुलूख लुटून फस्त केल्यामुळें त्यांचें धैर्य खचून त्यांनीं **रोमन** लोकांशीं तह करण्याविषयीं बोलणें लाविलें. तें त्यांनीं **क्रिस्ताचे** पूर्वी ३४० वे वर्षी मान्य करून तह केला. **सामनैत** लोकांशीं युद्ध तहकूब होत आहे, तों इतक्यांत **रोमन** लोकांवर त्यांपेक्षां भयंकर शत्रु उठले. दीडशें वर्षांपूर्वी **रोमन** लोकांनीं **लातीन** लोकांस **रेजिलस** तळ्याजवळ अगदीं जिंकून टाकिलें होतें; तेव्हांपासून आजपर्यंत ते **रोमन** लोकांशीं स्नेहानें होते, व त्यांपैकीं पुष्कळ लोक **रूमचे** फौजेंतहा होते; परंतु ते लोक ह्या वेळेस **रोमन** लोकांशीं बदलून पडले, आणि ते **क्यांपेनियन** लोकांनीं आपले शत्रु जे **सामनैत** ह्यांचा पराभव झाला, असें पाहून **रोमन** लोकांचे ताब्यांतून मोकळें होण्याविषयीं प्रयत्न मोठ्या उत्कंठेनें चालविला होता त्यांकडे जाऊन मिळाले. तेव्हां लढाईची तयारी करण्याचें कारण काय ह्याचा जाब **रूम** शहरास येऊन करण्याकरितां दाहा **लातीन** सरदारांस **सिनेट** सभेनें तात्काल बोलावणें पाठविलें. नंतर त्या सरदारांनीं जबाब दिला,

कीं **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याची उभारणी करण्यास साधनभूत आह्मी आहों, त्या अर्थी आह्मांस सर्व प्रकारें **रोमन** लोकांबरोबर मानून **सिनेट** सभेंतील सभासद लोकांपैकीं निमे लोक आमच्यांतले नेमावे व दोन कान्सलांपैकीं एक कान्सलहा आमच्या लोकांपैकीं नेमावा. तेव्हां **सिनेट** सभेनें ह्या बोलण्याचा धिक्कार करून युद्धाची तयारी केली, हें युद्ध मोठें तुमुल झालें. जे लोक **रोमन** लोकांसहवर्तमान आज पुष्कळ वर्षें शत्रूंशीं लढाया करीत होते, जे त्यांचीच भाषा बोलत होते, व ज्यांचीं हत्यारेंही त्यांच्याच हत्यारांसारखीं होतीं, व तीं धरण्याचा प्रकारही त्यांचेच सारखा होता, अशा लोकांशीं त्यांस आतां युद्ध करण्याचा प्रसंग आला, तेव्हां त्यांस आपल्या लोकांमध्यें अत्यंत बंदोबस्त राखणें जरूर पडून त्यांनीं लष्करांत असा हुकूम फिरविला, कीं कोणी हुद्देदार किंवा शिपाई ह्यानें आपली रांग सोडून पुढें जाऊन शत्रूशीं लढाई करूं नये; परंतु लढाई सुरू होण्याचे पूर्वी कांहीं दिवस कान्सलाचा पुत्र **मानल्यस** हा फौजेची एक टोळी घेऊन जात असतां त्यास शत्रूचे फौजेची एक टोळी भेटली, आणि तिच्या सरदारानें त्यास द्वंद्वयुद्धास बोलाविलें. तेव्हां तरुण **मानल्यस** ह्यास ज्वानीचे धुंदींत सेनापतीच्या हुकमाचें भान न राहून तो त्या सरदारावर गेला, आणि त्यास मारून मोठ्या आनंदानें लुटीसहित आपले बापाचे तंबूस येऊन दाखल झाला. तेव्हां त्याचे बापानें आपला हुकूम तोडल्याबद्दल त्याचा शिरच्छेद तात्काल करविला. तेणेंकरून छावणींत बहुत लोक कुरकूर करूं लागले; परंतु ह्या निष्कारण सक्तीपासून इतका फलादेश झाला, कीं पुढील लढाई-

मध्ये फौजेंत अत्यंत उपयोगी पडण्याजोगा बंदोबस्त राहिला. ज्या दोनी फौजांनीं मिळून इतके दिवस शत्रूंशीं लढाया केल्या, त्या लढाई करण्याकरितां **विसुवियस** पर्वताजवळ येऊन थडकल्या. दोहींकडील सैनिक प्रथमतः कांहीं वेळपर्यंत मोठा नेट धरून लढत होते; पण शेवटीं **रोमन** लोकांच्या डाव्या अंगची फौज पाय मागें घेऊं लागली, तेव्हां त्या फौजेचा अधिकारी जो **देश्यसमस** कान्सल हा आपणाकडील लोकांस खचित यश मिळावें ह्या उद्देशानें जीवावर उदार होऊन शत्रूंचे ऐन दाटींत घुसून मरण पावला. तेव्हां त्याचे फौजेनें तात्काल शत्रूंवर हल्ला करून आपणाकडे जयाचें पारडें फिरविलें. जरी **लातीन** लोकांचा ह्या मोठे लढाईंत पराजय झाला, तरी पुढल्या सालीं पुनः लढाई होई तोपर्यंत ते लोक **रोमन** लोकांचे अंकित झाले नाहींत. **लातीन** लोकांच्या मुख्य शहरांनीं **रोमन** लोकांस ज्या ज्या प्रमाणें अडथळा केला, त्या त्या प्रमाणें त्यांशीं ते वर्तले. ज्यांनीं पुष्कळ अडथळा केला होता त्यांशीं ते पुष्कळ कठोरपणानें वागले, व ज्यांनीं थोडा अडथळा केला, त्यांशीं थोडे कठोरपणानें वागले. **लातीन** लोक पूर्वीं **रोमन** लोकांचे संकेत साहाय्यकारी होते; पण आतां बहुतेकांस **रोमन** लोकांनीं आपले अमलाखालीं आणिलें. **क्यांपानिया** देशांतील जीं शहरें **लातीन** लोकांकडे मिळालीं होतीं; त्यांशीं **रोमन** लोक विशेष निष्ठुरतेनें वागले. त्यांनीं त्यांच्या जमिनी हिसकावून घेऊन जे आपले लोक त्या देशांत घरेंदारें बांधून राहिले, त्यांस त्या वांटून दिल्या. **रूमचे सिनट** सभेंतील मंडळीपेक्षां त्या काळीं जगांत दुसरी कोणतीही मंडळी स्थिरचित्ताची व राज्यकारभा-

रांत कुशल अशी नव्हती. त्या सभेंतील सभासद सर्व-काळ हरएक कामांत दुरुस्ती करीत असत. **लातीन** लोकांचा हा पराभव झाल्यावर कितीएक वर्षांनंतर **सिनेट** सभेनें दरसाल नवीन फौज ठेवण्याचा जो प्राचीन क्रम होता, तो मोडून फौजेवरील अधिपति बदले असतांही त्या फौजेनें रणभूमि धरून राहावें असा हुकूम फिरविला. पुढें कांहीं दिवसांनीं तिनें दुसरी एक अशी व्यवस्था केली, कीं सेनापतीच्या चाकरीची एक वर्षाची मुदत भरली, तरी प्रोकान्सल असा किताब देऊन त्यास पुढेंच रणांगणामध्यें राखवें.

**रोमन** लोकांनीं **सामनैत** लोकांशीं तह केल्यावर बारा वर्षांनीं त्यांचे शेजारीं एक नवीन वसाहात करून त्यांस राग आणिला, त्यामुळें **क्रिस्ताचे** पूर्वीं ३२७वे वर्षीं उभयतांमध्यें युद्ध पुनः सुरू झालें. त्या युद्धामध्यें सात वर्षेंपर्यंत सांगावयाजोगी अशी कांहीं विशेष गोष्ट घडली नाहीं. **रोमन** लोकांचाच जय नेहमीं होत होता. ह्या सात वर्षांत **रूम** शहरांत असा एक कायदा झाला, कीं सावकारानें कर्जाबद्दल कुळांस धरूं नये, फक्त त्यांच्या जिनगीवर कर्ज फेडून घ्यावें. अत्यंत विद्याचारसंपन्न लोकांमध्यें ज्यांची आज गणना आहे, असे जे **इंग्रज** लोक व **अमेरिकन्** लोक त्यांच्यामध्यें असा योग्य कायदा अद्यापि चालू झाला नाहीं, ही गोष्ट मोठे आश्चर्याची आहे. युद्धाचे आठवे वर्षीं असें झालें, कीं **सामनैत** लोकांच्या फौजेवर **पांत्यस** म्हणून एक पराक्रमी सरदार होता, त्यानें **रोमन** लोकांस हिकमत लढवून डोंगराचे एका अरुंद नळींत नेऊन चोहोंकडून कोंडून टाकिलें. मग त्यानें सर्व सैन्यास कैद करून त्यास जुंवा

खालून जावयास लाविलें. जुंवाखालून जाणें ह्यापेक्षां मोठी अशी दुसरी अप्रतिष्ठा **रोमन** सैनिकांच्या मतीं नव्हती. ह्या अप्रतिष्ठेची आठवण **रोमन** लोकांचे मनांतून फार दिवसपर्यंत नाहींशी झाली नाहीं. त्यांचा पराभव होण्याचें कारण हेंच होतें, कीं डोंगरांत लढाई कशी करावी, हें त्यांस माहीत नव्हतें; परंतु त्यांनीं ह्या गोष्टीची माहिती लवकरच करून घेतली. **सामनैत** लोकांनीं **रोमन** लोकांचा जो अपमान केला होता त्याचा सूड त्यांनीं लौकरच उगविला. तो असा, कीं त्यांचा पराक्रमी सेनापति **पापिर्‍यसकर्सर**, जो शिकंदर बादशाहाचे बरोबरीचा होता, असें **रोमन** इतिहास कर्ते ह्मणतात, त्याचे आश्रयानें त्यांनीं **सामनैत** लोकांचा वारंवार पराभव केला.

ह्यानंतर थोडेच दिवसांनीं **रूमचे** जुने शत्रु **हित्रुरियन** हे **रोमन** लोकांवर पुनः उठले. तेव्हां **रोमन** लोकांचा सेनापति **फेब्यस** हा, ज्या रानास आजपर्यंत अगम्य ह्मणून मानीत आलें असें जें **सिमिनियाचें** रान त्यांत धैर्यानें शिरला, आणि त्यानें **तस्कनी** देश **गाल** लोकांचे प्रांताच्या अगदीं हद्दीपर्यंत लुटून फस्त केला. **हित्रुरियन**, **सामनैत** व **इतली** देशाचे दक्षिण भागांतील दुसरे लोक, ह्यानीं **रोमन** लोकांशीं ज्या लढाया केल्या, त्यांचें सविस्तर वर्णन केलें असतां वाचणारास त्रास मात्र येईल. ह्यास्तव इतकेंच लिहिणें पुरें आहे, कीं ५७ वर्षेपर्यंत युद्ध झाल्यानंतर **रूमचे** राज्यांत स्वस्थता होऊन परदेशांत त्यांचा भरभराट झाला. तो असा, कीं **हित्रुरिया** देशापैकीं बहुतकरून मुलूख त्यांनीं आपल्या ताब्यांत आणून **सामनियन** देशावरही आपला दाब बसविला. ईशान्येकडील **आंब्रिया** देश व वायव्य

दिशेकडील **ल्युकानिया** देश हे दोन्ही **रोमन** लोकांच्या आज्ञेमध्यें होतेच. ह्याप्रमाणें **रोमन** लोकांचा मुलूख पुष्कळ वाढला. आणि त्यांच्या वसाहती सर्व **इतलीभर** पसरून त्या मुलखांत बंडे न होऊं देण्यास फार उपयोगीं पडल्या; परंतु **रूमचे** राज्यांत स्वास्थ्य बहुत दिवस राहिलें नाहीं, कारण **रोमन** लोकांच्या राज्यलोभास पार नाहीं, ह्याविषयीं **इतालियन** लोकांची आतां पक्की खातरी झाली, व **रोमन** लोकांचें सामर्थ्य दिवसानुदिवस वाढत चाललें, हें पाहून त्यांस धास्ताही बसली, तेव्हां आपले स्वातंत्र्य राखण्यासाठीं शेवटचा प्रयत्न करावा ह्मणून सर्व एकदम एका जुटीनें **रोमन** लोकांवर उठले. ह्या लोकांस मुख्यत्वेंकरून **इतलीमध्यें** अत्यंत विलासी व धिक्कारास्पद असे **तारेन्तैन** ह्मणून लोक रहात होते, त्यांनीं **रोमन** लोकांशीं युद्ध करण्याकरितां प्रवृत्त केलें. ही गोष्ट **क्रिस्ताचे** पूर्वी २८१ वे वर्षी घडली. त्या वेळेस **रोमन** लोकांस उत्तर, दक्षिण, व पूर्व ह्या तिन्ही दिशेकडील शत्रूंशीं एकदम लढाई करण्याचा प्रसंग पडला, तथापि त्यांनीं त्या शत्रूंचा अगदीं पराभव केला. **इतलीं**-तील संस्थानांमध्यें हा कट होण्यास आंतून कारणभूत जे **तारेन्तैन** लोक ह्यांनीं, आपले बंदरांत **रोमन** लोकांच्या जहाजांचा एक समुदाय आला त्यावर हल्ला करून त्यांशीं आपलें शत्रुत्व शेवटीं उघड केलें. त्या जहाजांवरील जे लोक त्यांचे हातीं लागले, त्यांपैकीं कांहीं जणांस त्यांनीं मारून टाकून बाकीच्यांस गुलाम करण्याकरितां विकून टाकिलें. हें वर्तमान **रोमन** लोकांनीं ऐकून आपलें नुकसान भरून घेण्याकरितां त्या लोकांकडे तत्काल वकील पाठविले. परंतु त्या मूर्ख लोकांनीं अप्रतिम औद्धत्यानें

त्या वकिलांस माघारें लावून दिलें. पण आपण दुर्बल व थोडे असून **इतली** देशाचे जे जिंकणारे जबरदस्त **रोमन** लोक ह्यांस संतापविलें, असा त्यांचे मनांत विचार आला, तेव्हां त्यांनीं परदेशांतून कुमक आणण्याचा निश्चय करून **इपैरसचा** राजा **पैरस** ह्यास आपले कुमकेस बोलाविलें. त्या राजाविषयीं पूर्वीं आह्मी **मासिदनचे** इतिहासांत वर्णन केलेंच आहे.

**ग्रीस** देशांतील **इपैरस** प्रांताचा राजा **पैरस** हा पुरा सरदार होता खरा; परंतु त्याचे बोलण्याची व करण्याची कांहींच शाश्वती नव्हती. त्याशीं **तारेन्तैन** लोकांनीं कुमकेविषयीं बोलणें लाविलें, तें त्यानें लागलेंच मान्य केलें, कारण त्याला वाटलें, कीं आपण **इतलीमध्यें** गेलों तर तेथें आपला प्रताप गाजण्याचा संभव आहे. नंतर तो चांगल्या कवाइतीची फौज व हत्ती बरोबर घेऊन **ग्रीस** देशाहून जहाजें हाकारून निघाला, तो **इतली** देशांत सुरक्षितपणें उतरला. त्याशीं लढाई करण्याकरितां **रोमन** लोकांनीं लागलीच फौज पाठविली; परंतु त्या राजाबरोबर लढाऊ हत्ती होते, त्यांशीं सामना करण्याची सवय **रोमन** लोकांचे पायदळास व स्वारांस नव्हती, ह्मणून मुख्यत्वेंकरून त्या हत्तींचेच योगानें **रूमचे** कान्सलाचा पराभव झाला. हा पहिला जय **पैरस** राजानें **पांदोशिया** शहराजवळ **क्रिस्ताचे** पूर्वीं २८० वे वर्षीं मिळविला. मग त्यानें बहुत वेळ **रोमन** लोकांशीं त्यांच्या आब्रुस योग्य असा तह करण्याविषयीं बोलणें लाविलें; पण त्यांनीं त्यास असें उत्तर दिलें, कीं तूं **इतली** देशांत रहाशील तोंपर्यंत आह्मी तुशीं तह करणार नाहीं. नंतर दुसऱ्या वर्षीं **रो**-

**मन** लोकांनीं त्यावर दुसरी फौज पाठविली; परंतु तिचा-हीं त्यानें **असक्युलं** शहराजवळ अगदीं मोड केला. ह्या दोन लढायांत **पैरसाचे** हुद्देदार व शिपाई लोक इतके पडले, कीं अशी आणखी एक लढाई झाली असतां माझा अगदीं नाश होईल, असें त्यास वाटलें. तेव्हां तो **इतली** देश सोडण्याविषयीं आपल्या मनांत घाटाघाट करूं लागला, तों इतक्यांत त्याला **सिसली** बेटांतील लोकांनीं कुमकेक-रितां बोलावणें पाठविलें. तेव्हां ह्या संधीस **इतली** सो-डली असतां आपण आब्रूनें सोडून गेलों, असें होईल, असें त्यानें मनांत आणून **सिसली** बेटांतील लोकांचें बोलावणें मोठ्या आनंदानें अंगीकारिलें. मग तो **इतली** देशांत उतरल्यापासून तिसऱ्या वर्षी तेथून चालता झाला. तो तेथून अगदीं निघून गेल्यावर **इतली** देशांतील ज्या लो-कांनीं त्यास कुमक केली होती, त्यांस सडकून ताडण कर-ण्यास **रोमन** लोक प्रवृत्त झाले. तेव्हां त्या लोकांनीं त्या राजास परत येण्याविषयीं गळ घातला. इकडे **सि-सली** बेटांत त्या राजानें जें काम हातीं धरिलें होतें त्यांत यश येणार नाहीं, असें त्यास दिसून आल्यावरून **सिसली** बेट सोडून देण्यास त्यास हें चांगलें निमित्त झालें. मग तो गलबतांत बसून **इतली** देशास निघाला. **सिसली** बेट **पैरस** सोडून निघाला त्या वेळेस तो त्याकडे नेत्रवि-क्षेप करून दुःखानें बोलला, कीं काय उत्कृष्ट देश आह्मी सोडून चाललों. ह्याविषयीं **कार्थेजिनियन** लोक व **रो-मन** लोक भांडतील. ह्या राजानें जें हें भविष्य केलें त्याप्रमाणेंच पुढें घडून आलें. **इतली** देशांत दाखल झाल्यावर त्यानें आपले जूटांतील लोकांची सर्व फौज जमा

केली. तेणेंकरून त्याचे फौजेची संख्या ऐशीं **हजार** पायदळ व साहा हजार स्वार इतकी झाली. नंतर **बेनि-वेन्तम** शहराजवळ त्यांचा व **रोमन** लोकांचा तुमुल सं-ग्राम झाला. त्यांत त्या राजाचे २५००० लोक पडले व त्याची सर्व छावणी शत्रूंचे हातीं गेली. तींत **रोमन** लोक शिरले तेव्हां तींतील सर्व रचना पाहून त्यांस आ-श्चर्य वाटलें, आणि त्या छावणीप्रमाणें पुढें ते आपली छा वणी देऊं लागले. नंतर लौकरच तो राजा **इतली** देश सोडून चालता झाला, आणि तो **आर्गास** शहरांत जात असतां डोक्यावर कौल पडून मेला.

**पैरस** राजाचा पराभव झाल्यापासून **कार्थेजिनियन** लोकांशीं पहिलें युद्ध सुरू होई तोंपर्यंत ११ वर्षे गुजरलीं. ह्या अकरा वर्षांमध्यें **रोमन** लोक, आपल्या ताब्यांतील लोकांपैकीं व संकेतसाहाय्यकाऱ्यांपैकीं जे शत्रूंस मिळाले होते, त्यांस शिक्षा करण्यामध्यें व **इतली** देशाचे दक्षिण-भागांत आपला अमल दृढ करण्यामध्यें गुंतले होते. **का-र्थेजिनियन** लोकांशीं युद्ध सुरू होण्याचे पूर्वीं **रोमन** लोक **हिब्रूरिया** देशाचे उत्तर हद्दीपासून **आयोनियन्** समुद्रा-पर्यंत व पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत सर्व **इतली** देशाचे मालक झाले होते. **इतली** देशांत **गाल** लोक मात्र स्वतंत्र राहिले होते; ते **आल्पस** पर्वताच्या दक्षिणे-च्या बाजूस रहात होते; ह्मणून त्यांस **सिसालपैन गाल** असें ह्मणत. जिंकिलेल्या संस्थानामध्यें बंदोबस्त ठेवणें व लोकसत्तात्मक राज्यास बळकटी आणणें ह्यांविषयीं **रोमन** लोकांची व्यवस्था ह्याच काळामध्यें पुर्तेपणीं उदयास आ-ली. **रोमन** लोकांस जे मुलूख प्राप्त होत त्यांमध्यें वसाह-

ती करण्याकरितां ते **रूमचे** नागरिकांस पाठवीत, आणि तेथील जमिनी त्यांस वांटून देत. ह्या वसाहतींचा दुहेरी उपयोग पडे. तो असा, कीं **रूम** शहरांतील दंगेखोर व उत्पाती नागरिक लोक कमी होत, आणि जिंकिलेल्या देशांतून **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याचा अंमल पुरतेपणीं बसे. **इतली** देशांतील संस्थानें व शहरें ह्यांशीं **रोमन** लोकांचा निरनिराळ्या प्रकारचा संबंध होता; आणि तदनुरूप त्यांशीं **रोमन** लोकांनीं तहनामे केले होते. सदरहू शहरांपैकीं कांहीं शहरचे लोकांस **रूमचे** नागरिकांचे हक्क होते; कांहीं शहरचे लोक **रोमन** लोकांचें प्रभुत्व मानून आपले राज्यांतील दरबारी कामकाजाचा बंदोबस्त आपल्या चालीप्रमाणें ठेवीत होते; कांहीं शहरें **रूमचीं** संकेतसाहाय्यकारी होतीं; व कांहीं शहरें **रोमन** लोकांचे अमलांत होतीं, त्यांवर अंमल करण्यास **सिनेट** सभा कुल अखत्यारीचे सुभेदार नेमी. ह्या काळांत **रोमन** लोकांचे राज्यव्यवस्थेचा कळस झाला असें दिसतें. सामान्य लोक व वडे लोक ह्यांच्यामध्यें जो भेद राहिला होता तो बहुतकरून नांवाचाच होता. सर्व वर्गांचे लोकांनीं आपआपलें सामार्थ्य राष्ट्राचें तेज वाढविण्याकडे लाविलें होतें. **सिनेट** सभेंतील सभासद लोकांचें प्राबल्य दिवसानुदिवस जास्त होत चाललें होतें; परंतु अद्यापि कोणतीही गोष्ट अविचाराची होत नव्हती.

---

# प्रकरण ४

## पहिल्या प्युनिक युद्धाच्या आरंभापासून शेवटच्या प्युनिक युद्धाच्या समाप्तीपर्यंत वृत्तांत.

पहिलें **प्युनिक** युद्ध—**दुल्यसाचा** समुद्रावरील लढाईंत जय—**झांतिपसानें रोमन** लोकांचा पराभव केला—**रेग्युलस, सिसली, सारदिनिया,** आणि **कार्सिका** हीं बेटें **रोमन** लोकांनीं काबीज केलीं — **जेनस** देवाच्या देवळाचे दरवाजे लागले—**इलीरिया** देशाशीं पहिलें युद्ध—**गाल** लोकांशीं युद्ध—**इलीरिया** देशाशीं दुसरें युद्ध—दुसरें **प्युनिक** युद्ध—**हानिबल आल्प्स** पर्वत वलांडून गेला— **तिसिनस, त्रिबिया, थ्रासीमेनी** आणि **कानी** एथील लढाया—**रूमचे कान्सलाचे** सामर्थ्य— **सिराक्युज** शहर **रोमन** लोकांनीं घेतलें—**आर्किमदीस**— **असद्रुबलाचा** पराभव— **सिपियोनें आफ्रिकेंत** स्वारी केली—**झामा** शहराजवळची लढाई—**कार्थेजिनियन** लोकांस अत्यंत अपमानकारक तह करणें भाग पडलें—**मासिदनच्या फिलिप** राजाशीं युद्ध—**सिनासिफालि** शहराजवळची लढाई—**फिलिप** राजाशीं तह— **कार्थेज** व **मासिदन** हीं राज्यें **रोमन** लोकांनीं घेतलीं ह्यांचा परिणाम—**अंत्योकस** राजाशीं युद्ध—त्या राजास तह करणें प्राप्त पडलें—**मासिदन** देशाशीं दुसरें युद्ध—**परशस** राजाचा पराभव—**मासिदन** देश **रूमचा** प्रांत झाला—तिसरें **प्युनिक** युद्ध—**कार्थेजचे** राज्याचा नाश.

**कार्थेजिनियन** लोक व **रोमन** लोक हे सार्वभौम राज्य करण्याची उमेद धरून मुलूख काबीज करूं लागले. ते मुलूख जिंकीत जिंकीत एकमेकांचे हद्दीजवळ येऊन पोहोंचत

होते. **कार्थेजिनियन** हे **सिसली** बेटांत मुलूख सर करीत होते; व **रोमन** लोक **इतली** देशाच्या दक्षिण भागांतील मुलूख काबीज करीत होते. शेवटीं असें झालें, कीं **रोमन** लोक **रेज्यं** शहरास येऊन पोंचले; व **कार्थेजिनियन** लोक **मिसीना** शहरास येऊन पोंचले, हीं दोन शहरें समोरासमोर होतीं व ह्यांच्या मध्यें खाडी मात्र होती. सदरहू दोन्हीं लोकसत्तात्मक राज्यांनीं **युरोपाचे** आधिपत्याविषयीं परस्परांशीं लढाई करण्याची तयारी केली. उभयतांचें सामर्थ्य व युद्धसामग्री हीं प्रथमतः सारखींच होतीं, असें ह्मटलें तरी चालेल. **कार्थेजिनियन** लोकांचा व्यापार मोठ्या किफायतीचा होता व त्यांपाशीं खजिना भरपूर होता, ह्यामुळें त्या लोकांस मर्जीस वाटेल तितकी फौज चाकरीस ठेवण्याचें सामर्थ्य होतें. ह्याशिवाय त्या लोकांचा समुद्रावर अमल होता. **रोमन** लोक हे स्वतः लढाऊ होते, व त्यांच्या उमेदी मोठ्या होत्या व कोणतेंही जोखमीचें काम आलें तरी ते लोक मागें हटण्यासारखे नव्हते.

**रोमन** लोकांनीं **कार्थेजिनियन** लोकांशीं लागोपाठ तीन युद्धें केलीं. ह्या युद्धांस **प्युनिक** युद्धें असें ह्मणतात. त्यांनीं **क्रिस्ताचे** पूर्वीं २६४ वे वर्षीं **इतली** देशांतून **सिसली** बेटांत फौज पाठवून **मिसीना** शहर काबीज केलें; तेव्हां **कार्थेजिनियन** लोकांनीं **सिराक्यूज** शहराचा राजा **हैरो** ह्याचे मिलाफानें त्या शहरास वेढा घातला; पण **रूमचे** कान्सलानें त्यांचा पराभव केला. दुसरे वर्षीं **सिराक्यूज** शहराच्या **हैरो** राजानें **रोमन** लोकांपासून मोठा लांच खाऊन त्यांचा पक्ष धरिला. त्यावरून **रोमन** लोकांस आपण संपूर्ण बेट जिंकूं असें वाटलें. त्या राजाचे

साहाय्यानें त्यांनीं त्या बेटांत **अग्रिगेनम** ह्मणून एक मोठें धनाढ्य शहर होतें तें काबीज केलें. **कार्थेजिनियन** लोक **रोमन** लोकांपेक्षां जमिनीवर कमजोर होते; पण त्यांकडे समुद्राचें आधिपत्य होतें, ह्यामुळें **रोमन** लोकांवर त्यांचा पगडा इतका पडूं लागला, कीं **रोमन** लोकांस नवीं जहाजें तयार करणें जरूर झालें. ते लोक शेंकडों वर्षांपासून जहाजें वाळगीत आले होते खरें, पण त्यांपाशीं **कार्थेजि-नियन** लोकांच्या जहाजांची बरोबरी करणारें असें एकही लढाऊ जहाज नव्हतें. सुमारें ह्याच वेळेस **कार्थेजि-नियन** लोकांचें एक लढाऊ जहाज **इतली** देशाचे कांठा-वर अपघातानें येऊन आदळलें. तेव्हां **रोमन** लोकांनीं थो-डेच दिवसांत त्यांच्या सारख्या जहाजांचा एक समुदाय तयार केला. तो समुदाय घेऊन त्या लोकांच्या आरमा-रांचा सरदार **दुल्यस** हा, **कार्थेजिनियन** लोकांशीं लढाई करण्याकरितां गेला; आणि त्यानें त्या लोकांचा अगदीं पराभव करून जय मिळविला. परंतु **रोमन** लोकांस हा जो जय मिळाला तो त्यांनीं नुकतींच एका प्रकारचीं नवीं यंत्रें काढलीं होतीं त्यांच्या योगानें मुख्यत्वेंकरून मिळाला. दुसरे वर्षीं **रूमचे कान्सलानें सार्दिनिया** व **कार्सिका** ह्या दोन्ही बेटांवर स्वारी करून तीं हं हं ह्मणतां सर करून **रूमचे** राज्याखालीं आणलीं. युद्धाचे आठवे वर्षीं **रोमन** लोकांनीं **कार्थेजिनियन** लोकांपासून समुद्रावरील लढाईंत पुनः जय मिळविला. त्यानंतर **सिनेट** सभेनें असा बेत केला, कीं जहा-जांच्या योगानें थेट **आफ्रिका** खंडांत जाऊन तेथें **कार्थे-जिनियन** लोकांशीं युद्ध चालवावें. ह्या पुढें **रोमन**

लोकांमध्यें असा नियमच ठरला, कीं साधलें असतां शत्रूचे मुलखांत जाऊन त्यावर हल्ला करावा.

सदरहू बेताप्रमाणें **रोमन** लोकांनीं, **क्रिस्ताचे** पूर्वी २५६ वे वर्षी दोन **कान्सलांबरोबर** ३३० जाहाजांचा समुदाय व एक लाख चाळीस हजार फौज देऊन त्यांस **आफ्रिका** खंडांत पाठविलें. इतकी फौज **रोमन** लोकांनीं पूर्वी कधींही जमविली नव्हती. सदरहू **कान्सलांनीं कार्थेजिनियन** लोकांच्या जहाजांचा अगदीं मोड केला, आणि फौजेनिशीं जमिनीवर उतरून सर्व मुलख लुटून फस्त केला, ह्यामुळें **कार्थेजेनियन** लोकांस इतकीं संकटें प्राप्त झालीं, कीं **रोमन** लोकांचा सरदार **रेग्युलस** ह्यानें तुह्मीं तह करावा हें चांगलें असें त्यांस सांगण्याविषयीं आपला मनुष्य पाठविला, तेव्हां त्याचा सत्कार त्यांनीं मोठ्या आनंदानें केला; परंतु त्या अभिमानी सरदारानें ज्या तहाच्या अटी घातल्या त्या इतक्या अपमानकारक होत्या, कीं त्यांस हें जें वाटलें तें यथार्थ वाटलें, कीं आपणांस **रोमन** लोकांनीं अगदीं जरी जिंकिलें, तरी ह्या अटी पतकरण्यांत जी मानखंडणा होईल तीपेक्षां ज्यास्त होणार नाहीं. मग त्यांनीं असा निश्चय केला, कीं पुढें लढाईच चालवावी, काय होणें असेल तें होईल. ह्याप्रमाणें ते अत्यंत संकटांत पडले असतां, दैवयोगानें **स्पार्टा** शहरांतून **जांतिपस** नामक सरदार कांहीं उमेदवार शिपाई बरोबर घेऊन नोकरीचे उमेदीनें **कार्थेज** शहरास आला. तो सरदार लढाईचे कामांत पुरा होता, सबब **कार्थेजिनियन** लोकांनीं आपली फौज त्याचे हाताखालीं लागलीच दिली. तो ती घेऊन **रोमन** लोकांवर गेला आणि त्यानें त्यांचा सरदार जो **रेग्यु-**

**लस** त्याचा अगदीं पराभव करून बहुतेक फौज मारून टाकिली. ह्या फौजेपैकीं फक्त २००० लोक जीवंत राहिले. पुढले सालीं ह्मणजे युद्धाचे नव्वे वर्षी **रोमन** लोकांनीं **आफ्रिका** खंडांतून आपल्या शेष राहिलेल्या फौजेस परत आणण्याकरितां जाहाजांचा एक समुदाय तयार करून पाठविला. त्या जहाजांनीं **कार्थेजीन न** लोकांचा पराभव केला. पण तीं पुढें कांहीं दिवसांनीं तुफानानें पाण्यांत बुडालीं. त्यानंतर **रोमन** लोकांनीं दुसरीं जहाजें तयार केलीं, त्यांचीही तीच अवस्था झाली, सबब त्यांनीं कांहीं दिवसपर्यंत समुद्रावरील मोहीमा अगदीं सोडून दिल्या. पण ह्या युद्धाचे १४ वे वर्षी त्यांनीं पुनः तरानें व खुपकीनें अशा जोरानें यत्न चालविला, कीं, **कार्थेजीनियन** लोकांचें मोठें नुकसान होऊन त्यांची हिम्मत खचली, आणि त्यांनीं, **रोमन** लोकांचा सरदार **रेग्युलस**, जो सहा वर्षेपर्यंत त्यांच्या कैदेंत होता त्यास आपल्या वकिलांबरोबर देऊन तहाचें बोलणें लावण्याकरितां **रूम** शहरास पाठविलें. परंतु **रेग्युलस** ह्यानें तह करण्याविषयीं **सिनेट** सभेस मोडती घातली, तेणेंकरून पुनः युद्ध चालू झालें. ह्या युद्धाचे १८ वे वर्षी **कार्थेजीनियन** लोकांनीं **हामिलकर बार्का** ह्या नांवाचा सरदार **सिसली** बेटांतील आपल्या जहाजांचे समुदायावर व फौजेवर आधिपत्य करण्याकरितां पाठविला. त्यानें आपल्या अप्रतिम कौशल्येंकरून तीन वर्षेपर्यंत **रोमन** लोकांचें कांहीं चालूं दिलें नाहीं, आणि त्यानें, ज्याचे अंगीं युद्धकौशल्य असतें तो हजारों संकटें आलीं असतांही कसा काय पराक्रम करितो, हें **रोमन** लोकांस दाखविलें. तेव्हां **रोमन** लोकांच्या लक्षांत आलें, कीं जहाजांचे मदतीशिवाय **सिसली**

बेट सर होणें अशक्य आहे. मग त्यांनीं पुनः एकवेळ जहाजें तयार करण्याचा निश्चय केला; परंतु सरकारी खजिन्यांत जमा अगदीं नव्हती, सबब लोकांनीं आपले पदरचा पैसा खर्चून दोनशें जहाजें तयार केलीं. त्यांच्या योगानें **रोमन** लोकांनीं **सिसली** बेट व **कार्थेज** ह्यांच्या मधील दळणवळण बंद करून टाकिलें. ह्या **चौवीस** वर्षांचे युद्धानें दोन्ही पक्षांकडील लोक थकून गेले, ह्यामुळें त्यांचा तह झाला. पण त्या तहामध्यें **कार्थेजिनियन** लोकांचें फार नुकसान झालें. तें असें, कीं त्या लोकांस **सिसली** बेट व त्याच्या आसपासचीं लहान लहान बेटें हीं सोडून द्यावीं लागलीं; व त्यांस असा करार करून देणें प्राप्त पडलें, कीं आह्मी युद्धाचे खर्चाबद्दल २००० तालेंत ह्मणजे सुमारें ४० लाख रुपये, वर्षास एक हप्ता ह्याप्रमाणें दहा हाप्त्यांनीं देऊं, व **सिराक्यूज** शहराचा राजा **हैरो** ह्याशीं लढाई करणार नाहीं. ह्याप्रमाणें **क्रिस्ताचे** पूर्वीं २४० वे वर्षीं **सिसली, सार्दिनिया** व **कार्सिका** हीं तिन्ही नामांकित बेटें **रोमन** लोकांचे ताब्यांत आलीं; त्यांच्या जवळ गलबतांचा मोठा समुदाय जमला; व समुद्रावरील अधिकार त्यांकडेस आला.

हा तह बावीस वर्षेंपर्यंत राहिला. ह्या बावीस वर्षांमध्यें **रोमन** लोकांनीं, दोन युद्धें केलीं. त्यांपैकीं एक युद्ध **ग्रीस** देशाचे उत्तरेकडच्या हद्दीवर **इलीरिया** देशांत झालें, व दुसरें, **आल्प्स** पर्वताच्या दक्षिणेच्या बाजूस राहाणारे **गाल** लोक ह्यांशीं झालें. ह्या युद्धांचा वृत्तांत लिहावयाचे पूर्वीं हें लिहिणें योग्य आहे, कीं **क्रिस्ताचे** पूर्वीं २३४ वे वर्षी **रोमन** लोकांस युद्ध करावयास नव्हते. ह्मणून त्यांनीं जे-

**नसचें** देवालय बंद केलें. कारण पूर्वी **रूम** शहरांत **न्युमा** ह्मणून एक राजा झाला होता त्यानें सदरहू देवालयांविषयीं असें सांगितलें होतें, कीं हें देवालय युद्ध चालू असतां उघडें ठेवावें आणि युद्ध नसलें ह्मणजे बंद करावें. त्या राजाचे कारकिर्दीस सुमारें ४५० वर्षें झालीं; परंतु इतके वर्षांत **रोमन** लोक हे युद्ध केल्याखेरीज एकही वर्ष राहिले नाहींत. ह्यास्तव सदरहू देवालय बांधल्यापासून ४५० वर्षांनीं त्याचीं कपाटें प्रथमतः लागलीं, ही गोष्ट **रूमचे** इतिहासांत आठवण ठेवण्याजोगी आहे.

**इलीरिया** देशांत युद्ध उपस्थित होण्यास असें कारण झालें, कीं त्या देशाच्या **त्यूना** राणीनें आपले रयतेस **आद्रियातिक** समुद्रांत चांचेपणा करण्याविषयीं उत्तेजन दिलें, तेणेंकरून **इतली** देशांतील व्यापारी लोकांस मोठा उपसर्ग लागूं लागला; सबब **सिनेट** सभेनें त्या प्रकरणीं राणीचे कान उघडण्याकरितां तिजकडे वकील पाठविले; पण तिनें त्यांचा आदरसत्कार मोठ्या गर्वानें केला, आणि ते परत जात असतां त्यांस वाटेंत मारून टाकण्याची तजवीज केली. ह्या दगाबाजीचा सूड उगविण्याकरितां **रूम**चे दोन्ही कान्सल जबरदस्त फौज व जहाजांचा मोठा समुदाय घेऊन त्या राणीवर चढून गेले. ह्याच वेळेस प्रथमतः **रोमन** लोकांची फौज **ग्रीस** देशांत ह्मणजे वस्तुतः **इतली** देशाचे पूर्वेच्या सरहद्दीपलीकडे गेली. ह्या प्रसंगीं **रोमन** लोकांचा नेहमींप्रमाणेंच जय झाला. पुढें त्यांनीं दोन वर्षांचे आंत समुद्रांतील चांचे नाहींसे करून टाकिले, आणि **त्यूना** राणीचें बहुतेक राज्य घेऊन तिच्याकडे जें थोडेंसें ठेविलें होतें, त्याबद्दल तिणें त्यांस खंडणी द्यावी

असें केलें. हें युद्ध **क्रिस्ताचे** पूर्वीं २२७ वे वर्षीं प्राप्त झालें. ह्या युद्धामुळें ह्मणजे **रोमन** लोकांस मोठासा नफा झाला असें नाहीं; पण त्याच्या योगानें त्यांचा व **ग्रीक** लोकांचा संबंध होऊन त्यापासून पुढें अत्यंत उपयोगी अशा गोष्टी घडून आल्या.

**इलीरिया** देशाशीं युद्ध समाप्त झालें न झालें, तों इतक्यांत **पो** नदीचे सुपीक मैदानांतील व **लिगुरियन** पर्वतांतील **गाल** लोक ह्यांनीं, **आल्प्स** पर्वतापलीकडे **-होन** नदीचे कांठीं आपले जातीचे लोक रहात होते त्यांशीं कट करून ते **रूमचे** राज्यावर हले करूं लागले. तेणेंकरून त्यांशीं व **रोमन** लोकांशीं मोठें भयंकर युद्ध सुरू झालें. तें **क्रिस्ताचे** पूर्वीं २२६ वे वर्षापासून २२० वे वर्षापर्यंत ह्मणजे साहा वर्षें चाललें होतें. ह्या शत्रूंचें **रोमन** लोकांस किती भय होतें, हें ह्यावरून समजेल, कीं त्यांनीं **इतली** देशाचे सर्व प्रांतांतून सत्तर हजार फौज जमविली. **गाल** लोक मोठ्या वेगानें प्रथमतः **हिवृरिया** देशावर पडून **क्रूश्य** नामें एक शहर **रूम** शहरापासून तीन मजला होतें त्यावर आले. ते सिंहाप्रमाणें पराक्रमी होते, तरी **रूमचे** कान्सलांनीं त्यांचे चाळीस हजार लोकांची रणभूमींत कत्तल करून आणि दाहा हजार लोकांस कैदी करून त्या लोकांचा अगदीं पराभव केला. त्यानंतर **रोमन** लोकांनीं **आल्प्स** पर्वताचे आलीकडील राहाणाऱ्या **गाल** लोकांचा सर्वथैव पराभव करण्याचा निश्चय करून दोन्ही कान्सलांस फौजेनिशीं **पो** नदीचे पलीकडील देशास रवाना केलें. **गाल** लोकांनीं **रोमन** लोकांचा निश्चय पाहून जसें कांहीं कोणी ह्मणेल, कीं शेवटच्या लढाई करितांच फौज जमा करितात, ह्याप्रमा-

णें, अगदीं ह्ययगय न करितां आपली सर्व फौज जमा केली. तेणेंकरून त्यांचे फौजेची संख्या **रोमन** लोकांच्या फौजेचे संख्येपेक्षां फारच अधिक झाली, तथापि **रोमन** लोकांचाच जय झाला. दुसरें वर्षीं (म्हणजे **क्रिस्ताचे** पूर्वीं २२२ वे वर्षीं) **गाल** लोकांनीं मागल्या वर्षाचे फौजेपेक्षां फारच जास्त म्हणजे एकंदर नव्वद हजार फौज जमा केली, आणि **रोमन** लोकांच्या **मारसेलस** सरदारास गांठलें. त्याजवळ सैन्य फारच थोडें होतें. लढाई करण्यास दोन्ही दळें तयार झालीं, त्या वेळेस **गाल** लोकांच्या सरदारानें **रूमचे** सरदारास द्वंदयुद्धास बोलाविलें, तें बोलावणें त्यानें आनंदानें मान्य केलें, आणि त्या युद्धांत **गाल** लोकांचे सरदारास मारून टाकिलें. तें पाहून **गाल** लोकांचें धैर्य सुटून ते लोक पळून गेले. ज्या ज्या लढाया **सिसालपैन गाल** लोक व **रोमन** लोक ह्यांच्यामध्यें स्वतंत्रपणाबद्दल झाल्या त्यांतील ही शेवटची लढाई होय. ह्याप्रमाणें **रोमन** लोकांनीं **गाल** लोकांचे प्रांत सर करून आपले राज्याखालीं आणिले. ह्या वेळेस **रूमचे** यशस्वी लोकसत्तात्मक राज्याची हुकमत **आल्प्स** पर्वतापासून **अयोनियन** समुद्रापर्यंत झाली. **गाल** लोकांशीं युद्ध समाप्त झाल्यावर दुसऱ्या वर्षीं **इलीरिया** देशाशीं दुसऱ्यानदां युद्ध झालें. परंतु तें युद्ध ह्या संक्षिप्त ग्रंथांत लिहिण्यासारखें नाहीं. ह्या युद्धांपेक्षां विशेष महत्वाची अशी एक गोष्ट घडली, कीं **रोमन** लोकांनीं **प्लासेनशिया** व **क्रिमोना** ह्या नांवांचीं दोन शहरें, जिंकलेल्या **गाल** लोकांचे मुलखांत **पो** नदीच्या पलीकडे वसविलीं. तेणेंकरून **गाल** लोकांस संतापप्राप्त होऊन त्यांनीं **कार्थेजिनियन** लोकांचा नामांकित सरदार **हानिबल** ह्यास **रोमन**

लोकांशीं लढाई करण्याकरितां **इतली** देशास बोलाविलें. आतां त्याविषयीं आह्मी लिहितों.

**रोमन** लोकांनीं ज्या तहामध्यें **कार्थेजिनियन** लोकांपासून **सिसली** बेट घेतलें होतें, त्या तहास बावीस वर्षें गुदरलीं. सदरहू मोठ्या नुकसानाचे ऐवजीं नफा करण्याकरितां व **रोमन** लोकांस दरसाल खंडणीबद्दल कांहीं ऐवज द्यावा लागत असे, तो देण्याकरितां **कार्थेजिनियन** लोकांनीं आपले प्रतिस्पर्धी ह्मणजे **रोमन** लोक ह्यांच्या नजरेपासून दूर जो **स्पेन** देश त्यांत नवा मुलूख सर करण्याचा निश्चय करून फौजेचा अधिकार **असद्रूबल** नामें सरदारास दिला. हा सरदार मोठा पराक्रमी होता. त्यानें **स्पेन** देशावर जाऊन **इब्रो** नदीचे दक्षिणेकडील बहुतकरून मुलूख काबीज केला. नंतर थोडेच दिवसांनीं त्याचे फौजेचा अधिकार **हानिबलास** प्राप्त झाला. त्या वेळेस त्याचें वय सुमारें २५ वर्षांचें होतें. **हानिबल** हा **हामिलकर** ह्याचा पुत्र होय. त्या काळीं, युद्धांमध्यें कुशल, ह्यासारखा दुसरा कोणी नव्हता. त्याशीं तुळणा करण्यास योग्य **क्रिस्ती** शकाचे पूर्वी **शिकंदर बादशाह** व **ज्यूल्यस सीजर** ह्या दोन पुरुषांखेरीज दुसरा कोणीही झाला नाहीं. युद्धकौशल्याविषयीं व धैर्याविषयीं जशी ह्याची सर्वांवर तान होती, तशीच ज्यांनीं ह्याचें आवडतें, **कार्थेज**, शहर नीचावस्थेप्रत मिळविलें असे जे **रोमन** लोक त्यांचा द्वेष करण्याविषयींही ह्याची तान सर्वांवर होती, असें दिसतें.

**कार्थेजिनियन** लोकांचें व **रोमन** लोकांचें युद्ध **क्रिस्ता**चे पूर्वी २१८ वे वर्षी पुनः सुरू झालें; आणि तें **क्रिस्ती** शकाचे पूर्वी २०१ वर्षपर्यंत चाललें होतें. ह्या युद्धास

सामान्यतः द्वितीय **प्युनिक** युद्ध असें ह्मणतात. हें युद्ध उपस्थित होण्यास असें कारण झालें, कीं **हानिबल** ह्यानें **ईब्रो**नदीचे दक्षिणेस **सागंतम** नामक शहर **रोमन** लोकांचें संकेतसाहाय्यकारी होतें, त्यास वेढा घातला, तेव्हां त्यांतील लोकांनीं कुमकेविषयीं **रोमन** लोकांस विनंती केली. त्यावरून **रोमन** लोकांनीं त्या तरुण योध्यास वेढा काढण्याकरितां ताकीद करण्यास वकील पाठविले. त्यांस **हानिबल.** ह्यानें, वेढा काढीत नाहीं ह्मणून साफ जबाब दिला. त्यावरून ते वकील **कार्थेज** शहरास जाऊन अगळीक करणारा जो **हानिबल** ह्यास आमचें स्वाधीन करा ह्मणून बोलले, तेव्हां त्यांचें बोलणें गैरवाजवी समजून **कार्थेजिनियन** लोकांनीं त्यांचा धिक्कार केला. इकडे **हानिबल** ह्यानें **सागंतम** शहरचा वेढा मोठ्या झपाट्यानें चालविला. तेव्हां आंतील लोकांची कुमकेविषयीं निराशा होऊन त्यांनीं वेढा पडल्यापासून आठ महिन्यांनीं तें शहर **हानिबल** ह्याचे स्वाधीन केलें. हें **सागंतम** शहर **हानिबलाच्या** हातीं लागल्यामुळें **रोमन** लोकांचें वजन **स्पेन** देशांत ह्या वेळेस नाहींसें झालें. नंतर **सिनेट** सभेनें थोडेच दिवसांनीं उद्भवणारें जें युद्ध त्याची तयारी मोठ्या झपाट्यानें चालविली. आजपर्यंत ज्या ज्या शत्रूंशीं लढाई करण्याचे प्रसंग **सिनेट** सभेस पडले होते त्या सर्वांहून हल्लींचा शत्रु **हानिबल** हा फार जबर होता, त्यानें **आल्पस** पर्वत वलांडून जाऊन **इटली** देशांतच युद्ध चालवावें, असा बेत केला. हा बेत प्राचीन काळचे इतर सरदारांनीं जे जे बेत करून सिद्धीस नेले त्या सर्वांहून निःसंशय मोठ्या साहसाचा होता. **हानिबल** हा **ईब्रो**

नदीचे उत्तरेकडील देश त्वरेनें जिंकून **पिरनीज** पर्वत वलांडून **गाल** ह्मणजे **फ्रान्स** देशचा दक्षिण भाग ह्यांत शिरला आणि **आल्प्स** पर्वतास जाण्याकरितां **-होन** नदी उतरून पार गेला. इकडे **रोमन** लोक हे तर आपल्या मनांत असें समजत होते, कीं तो अद्यापि **स्पेन** देशांतच आहे; ह्यावरून **रूमचा** कान्सल **पिसा** शहरांहून **स्पेन** देशास निघाला; आणि तो **मार्सिलस** बंदरांत उतरतो, तों त्यास **हानिबल** हा आपले आटोक्याच्या पार गेला असें समजलें. तेव्हां त्यास फारच विस्मय वाटला. मग तो तेथून निघून त्वरेनें **इतली** देशास परत आला, तों त्यास असें समजलें, कीं आपला शत्रु **हानिबल** हा **आल्प्स** पर्वत वलांडून **इतली** देशाचे मैदानांत आला.

**हानिबल** हा -होन नदी उतरून **फ्रान्स** देशाचे आग्नेय भागांतून फार अयास न पडतां पार गेला; परंतु बर्फें करून आच्छादित असा जो **आल्प्स** पर्वत ह्यांतून जातांना त्याचे पुष्कळ हत्ती व मनुष्यें मेलीं. ह्या पर्वतावरून जात असतां **सिसालपैन गाल** लोकांचीं सुपीक मैदानें ह्मणजे हलींचा **लंबार्दि** देश हीं जेव्हां दृष्टीस पडूं लागलीं तेव्हां **हानिबल** हा त्या मैदानांकडे बोट करून आपल्या फौजेस बोलला, कीं हीं मैदानें बघा, हीं तुह्मांस तुमच्या श्रमाकरितां बक्षीस मिळावयाचीं आहेत. **हानिबल** पर्वताखालीं उतरल्यावर त्यास **तिसिनस** नदीचे तीरीं **रोमन** लोकांची फौज भेटली; तिचा त्यानें अगदीं पराभव करून टाकिला. नंतर त्याच वर्षीं **त्रिबिया** नदीजवळ **रूमच्या दोन्ही** कान्सलांची एकत्र जमलेली फौज त्यास भेटली, तिचाही त्यानें अगदीं पराभव केला. त्यावरून **सिनेट**

सभेंतील लोकांचे मनांत भीति प्राप्त झाली. शंभर वर्षें पर्यंत **रूमच्या** फौजेचा पाय असा आंत कधीं आला नव्हता. **पो** नदीच्या दोन्ही बाजूंचे **गाल** लोक **रोमन** लोकांचे ताब्यांतून मुक्त होण्याविषयीं उत्सुक होतेच; ते **हानिबल** ह्याचा जय दोनवेळां झाल्यानें त्याकडे येऊन मिळाले. युद्धाचे दुसरे वर्षी **हानिबल** हा पाणथळांतून पुढें गेला, त्या प्रसंगीं त्याचा एक डोळा गेला. नंतर त्यानें **हित्रुरिया** प्रांतांत शिरून तो लुटून फस्त केला. इकडे **सिनट** सभेनें दुसरी पुष्कळ फौज जमवून त्याचा रोध करण्याकरितां पाठविली; परंतु त्यानें **थ्रासमेनी** तळ्याजवळ त्या फौजेस गांठून तिचा पराजय केला. मागल्या वर्षी ज्या दोन लढाया झाल्या, त्यांपेक्षां ह्या लढाईंत **रोमन** लोकांचें फारच नुकसान झालें.

**सिनट** सभेजवळ **हानिबलाचा** मार्ग रोधण्याकरितां फौज मुळींच नव्हती. ह्यामुळें तो मुलखांतून खंडणी घेत-घेत बिनहरकत **अप्युलिया** प्रांतापर्यंत येऊन ठेपला. ह्या युद्धाचे तिसऱ्या वर्षी **रूमचे** कान्सलांनीं खूबच फौज जमा करून ती बरोबर घेऊन **आड्रियाटिक** समुद्राचे किनाऱ्यावर **कानी** गांवाजवळ **हानिबलास** गांठलें. परंतु ह्या चवथे लढाईंतही त्यानें **रोमन** लोकांचा अगदीं पराभव केला. प्राचीन काळाच्या इतिहासांत अत्यंत लक्ष्यांत ठेवण्याजोग्या ज्या काय लढाया लिहिल्या आहेत, त्यांमध्यें ह्या लढाईची गणना केली आहे, हें यथार्थ आहे. पण ह्या अनुपमेय संकटकाळीं **सिनट** सभेनें जो मनाचा थोरपणा व जें धैर्य दर्शविलें, हीं तर ह्या लढाईपेक्षां फारच लक्षांत ठेवण्याजोगीं आहेत. **सिनट** सभेंतील सभासद लोक **रूमचे**

भाग्याविषयीं क्षणभरसुद्धां निराश झाले नाहींत; व **हानिबल** ह्याशीं तोडजोड करावी ही गोष्ट त्यांचे स्वप्नींसुद्धां आली नाहीं. जरी **रूमचे** राज्यांतील थोरथोर लोकांपैकीं शेलके लोक, निवडक फौज व एक कान्सल असे **कानीचे** लढाईंत पडले, तरी सभासद लोकांनीं धीर न सोडून इतके त्वरेनें फौजेची भरती केली, कीं ती लढाई होऊन एक वर्ष झालें नाहीं तों त्यांनीं ऐशीं हजार फौज रणभूमींत आणिली. त्या फौजेचा अधिकार **फेब्यस** नामें सरदारास दिला होता. जरी त्याच्यानें **इतली** देशाचे दक्षिण भागांतील बहुतेक लोक **हानिबलाकडे** मिळत चालले होते, ते बंद झाले नाहींत, तरी त्यानें **हानिबलाशीं** समोरासमोर लढाई करण्याचा प्रसंग निरंतर टाळून त्यास युक्तीनें थोडेसें आडवून धरिलें होतें. पुढें आठ वर्षांमध्यें **हानिबलानें** बहुत लढाया जिंकिल्या; परंतु त्यांपैकीं एका लढाईमध्येंही **कानी** येथें जसा त्यास जय मिळाला तसा जय मिळाला नाहीं. त्यास मागून कुमक यावयाची होती, ती न आल्यामुळें त्यास पुढें जाण्याचें सामर्थ्य झालें नाहीं; पण तो आपली जागा धरून राहिला होता.

इकडे **सिराक्यूज** शहराच्या लोकांनीं **कार्थेजिनियन** लोकांचा पक्ष स्वीकारल्यामुळें **रोमन** लोकांच्या **मार्सेलस** सरदारानें त्या शहरास बळकट वेढा घातला; परंतु प्राचीन काळचा **न्यूतन** जो **आर्किमेदीस** ह्यानें आपल्या अलौकिक बुद्धिकौशल्येंकरून सुमारें दोन वर्षें **रोमन** लोकांचें कांहीं चालूं दिलें नाहीं. शेवटीं तें शहर **रोमन** लोकांचे हातांत आलें; आणि त्यांकडील एका शिपायानें **आर्किमेदिसास** मारून टाकिलें. त्या शिपायास **आर्किमेदिसाची**

योग्यता माहीत नव्हती, व त्याचें नांवसुद्धां माहीत नव्हतें.

**रोमन** लोकांनीं **स्पेन** देशांत लढाईचें काम चालविण्याचा अधिकार **सिपियो** ह्या नांवाच्या दोन सरदारांकडे सोंपून दिला होता. त्यांनीं त्या देशांत पुष्कळ मुलख काबीज केला. **क्रिस्ताचे** पूर्वीं २१६ वे व २१७ वे ह्या दोन वर्षांत त्यांनीं **कार्थेजिनियन** लोकांपासून दोनवेळां जय मिळविला; परंतु पुढें ते सरदार दगाबाजीनें मारले गेले. नंतर फौजेचा अधिकार तरुण जो **पब्लियससिपियो** त्यास प्राप्त झाला.

**कार्थेजिनियन** लोकांनीं इटली देशांत **हानिबलास** कुमक पाठविण्याविषयीं नेहमीं बेत चालविले होते; पण त्यांचा एकही बेत सिद्धीस गेला नाहीं. शेवटीं ह्या युद्धाचे बारावे वर्षीं **असद्रुबल** नांवाचा सरदार पुष्कळ फौज बरोबर घेऊन **स्पेन** देशाहून निघाला; आणि ज्या रस्त्यानें त्याचा भाऊ **हानिबल** हा गेला होता, त्याच रस्त्यानें जाऊन पाहाडी लोकांचे मेहरबानगीनें **आल्प्स** पर्वत वलांडून तो **इटली** देशास जाऊन पोहोंचला. त्यानें आपण आल्याचें वर्तमान **हानिबलास** कळविण्याकरितां जासूद पाठविला; परंतु तो जासूद **रूमच्या** कान्सलाचे हातीं सांपडला, तेव्हां त्या कान्सलानें, **असद्रुबल** हा आपल्या भावास जाऊन मिळाला नाहीं तों त्यावर हल्ला करावा, ह्मणून निश्चय केला. नंतर **मितारस** नदीचे कांठीं उभयतां फौजांची गांठ पडली; आणि लढाई होऊन **रोमन** लोकांचा पूर्ण जय झाला. **असद्रुबल** सरदारानें आपलें जितकें काम बजावावयाचें होतें तितकें बजावलें. त्यानें कांहीं कसर केली नाहीं, पण त्याच्या सैन्याचा पराजय झाला,

तेव्हां आतां प्राण ठेवणें हें बरावर नाहीं, असें त्यास वाटून तो शत्रूचे सैन्यावर पडून मेला. **असद्रुबल इतली** देशांत दाखल झाल्यावर **रूमचे** रहाणारे लोक इतके घाबरले, कीं त्या शहरांत मक्ते बंद झाले, खरेदी व विक्री ह्या अगदीं राहिल्या, कोणी कोणास पैसा उसना देईना व कोणी आपलें कर्ज फेडीना. परंतु **असद्रुबल** ह्याचा पराभव झाल्यानें **रूम** शहरचा मोहरा वदलून सर्व कामें पूर्ववत् चालू झालीं. **रूमचा** कान्सल, **असद्रुबलाचें** डोकें कापून **हानिबलाकडे** मोठ्या त्वरेनें गेला; आणि त्यानें दोन कैदी लोकांच्या द्वारें जयाचें वर्तमान **हानिबलास** कळवून त्याचे छावणींत त्याच्या भावाचें डोकें फेकून दिलें. **हानिबलाचा** भाऊ **असद्रुबल** हा मेल्यामुळें त्याचे देशाचा व घराण्याचा मोठा घात झाला; आणि तेणेंकरून **हानिबलाचें** धैर्य खचून तो मोठ्या दुःखानें ह्मणाला, कीं ही गोष्ट **कार्थेजिनियन** लोकांचे नसिवासारखी झाली. मग त्यानें तात्काळ आपला तळ उठविला; आणि तो **इतली** देशाचे दक्षिण कोनांत **ब्रूटपं** येथें छावणी देऊन राहिला. तेथें **रोमन** लोकांनीं त्यावर पुष्कळ हल्ले केले, परंतु त्या सर्वांचें निवारण करून तो कुमकेवांचून चार वर्षें तेथें आपला बचाव करून राहिला होता.

**असद्रुबलानें स्पेन** देशांतून कूच केल्यावर तरुण **सिपियो** ह्यानें तो देश आपले ताब्यांत आणिला, आणि असा बेत केला, कीं **हानिबलानें इतली** देशांत येऊन लढाई चालविली, त्याप्रमाणें आपण **आफ्रिकेंत** जाऊन लढाई चालवावी. नंतर त्यानें **आफ्रिकेंतील न्युमिदया** देशचे **शिफाक्स** राजाशीं तह करून त्याला आपल्या कडचा करून

ठेविला. **कार्थेजिनियन** लोकांनीं त्या राजाची जी सुंदर राणी **सोफानिस्बा** हिचे द्वारानें त्या राजास आपणांकडे लवकरच वळवून घेतलें. पण **सिपियो** ह्यानें **मासिनिसा** राजाशीं स्नेह करून, युद्धाचे पंधरावे वर्षीं आपले फौजें-निशीं **आफ्रिका** खंडांत उतरून तेथें **कार्थेजिनियन** लो-कांचा दोनवेळां मोड करून **कार्थेज** शहरास वेढा घाल-ण्याची तयारी केली. तेव्हां **कार्थेज** शहरचे सभासद लोकांस आपले देशाचा बचाव करण्याकरितां **हानिबलाला** परत बोलावणें अगत्य पडलें. **हानिबल** ह्यानें **इतली** देश सोडतांना डोळ्यांनीं पाणी काढिलें, व त्याचें जहाज **इतली** देशाचे तीरापासून दूरदूर जाऊं चाललें, तेव्हां त्याचे जिवास अत्यंत खेद वाटून तो त्या तीराकडे टक लॅावून पहात होता. **हानिबला** सारखा भयंकर शत्रु **रूमचे** लोकसत्तात्मक राज्यास आजपर्यंत कधीं भेटला नव्हता. तो परत गेला असें वर्तमान ऐकून **रोमन** लोकांचे मनांत इतका हर्ष झाला, कीं लोकांनीं देवांचा आभार पांच दि-वस पर्यंत मानावा ह्मणून **सिनेट** सभेनें ताकीद केली. **हा-निबल आफ्रिका** खंडांत दाखल होतांच त्यानें **रोमन** लोकांशीं लढाई करण्याची तयारी केली. ह्या लढाईमध्यें **कार्थेज** शहराचे दैवाचा निर्णय व्हावयाचा होता. त्या काळचे अत्यंत पराक्रमी जे सरदार **सिपियो** व **हानिबल** हे आपआपले फौजांनिशीं **झामा** शहरास आले. नंतर दोन्ही सैन्यांची झपाट्यानें लढाई होऊन तींत **हानिबला**-चा पराभव झाला. त्या वेळेस **हानिबलास** ४५ वें वर्ष होतें, आणि जन्मल्यापासून त्याचा हाच काय तो प्रथमतः परा-जय झाला. युद्धकौशल्याचे पूर्ण ज्ञाते असें ह्मणतात, कीं

ह्या प्रसंगीं **हानिबल** ह्यानें उत्कृष्ट सेनाधिपतीनें ह्मणून जें काय करायाचें तें सर्व केलें, पण दैवापुढें त्याचा उपाय नाहीं. ह्या संकटसमयीं स्वदेशाचा बचाव होण्यासारिखी मसलत देण्याकरितां **हानिबलास कार्थेजचे** सभासद लोकांनीं सभेंत बोलाविलें असतां, त्यानें त्यांस असें सांगितलें, कीं तहाशिवाय आतां दुसरा उपाय राहिला नाहीं; आणि युद्धकुशल जो **हानिबल** ह्यानें असें सांगितलें, तेव्हां तहाविषयीं शंकाच राहिली नाहीं. त्याच्या मसलतीप्रमाणें **कार्थेजचे** सभासद लोकांनीं **क्रिस्ताचे** पूर्वी २०१ वे वर्षी **रोमन** लोकांशीं तह केला. ह्या तहांतील कलमें **कार्थेजिनियन** लोकांस अत्यंत अपमानकारक होतीं. तीं कलमें बितपशील.

१ **कार्थेजिनियन** लोकांनीं **आफ्रिका** खंडांतील जिंकलेला सर्व मुलूख सोडून द्यावा, व दाहा लढाऊ जहाजें ठेवून बाकीचीं असतील तीं सर्व त्यांनीं **रोमन** लोकांचे स्वाधीन करावीं, आपले सर्व हत्ती त्यांस द्यावे, ह्याखेरीज १०००० तालेंत ह्मणजे सुमारें दोन कोट रुपये द्यावे. २ **रोमन** लोकांचे परवानगीशिवाय त्यांनीं कोणाशीं लढाई सुरू करूं नये. ३ **मासिनिसा** राजाचे पूर्वजांचा ह्मणून जितका मुलूख होता, तितका सर्व **कार्थेजिनियन** लोकांनीं त्या राजास परत द्यावा.

**रोमन** लोकांनीं आपले मोठे प्रतिस्पर्धी जे **कार्थेजिनियन** लोक, ह्यांस खालविल्यानंतर दुनिया सर करण्याविषयीं उघडपणें उमेद धरिली. त्या काळीं **रोमन** लोकांचा अमल **इतली** देशांत व त्या देशाचे आसपासचे बेटांत व **स्पेन** देशाचे बहुत भागांत पक्का बसला होता. ह्याशिवाय

समुद्रावर त्यांचा अधिकार निष्प्रतिबंध होता. ह्या सर्व गोष्टी-मुळें पृथ्वीवरील सर्व राज्यांस त्यांचें भय फार वाटूं लागलें. त्या लोकांनीं सार्वभौम राज्य करण्याची उमेद धरिली, ह्याचें मुख्य कारण **सिनेट** सभेचा हिय्या होय. त्या सभेमध्यें राज्यकारभारांत अत्यंत कुशल व अत्यंत पराक्रमी असे लोक असत. **रोमन** लोकांचें सैन्य व त्यावरील सरदार सर्वोत्कृष्ट होते, व **रूम** शहराचा नाश होण्याकरितां जे जे कट होत ते पक्के दशेस येण्यापूर्वींच **रोमन** लोक आपल्या विलक्षण चातुर्यानें व सावधगिरीनें हाणून पाडीत, ह्यामुळें त्यांस सार्वभौम राज्य प्राप्त झालें. पण परराज्यांतील लोकांची नीति बिघडली नसती, व त्या लोकांमध्यें लढाईचें चातुर्य व धमक हीं असतीं, तर **रोमन** लोकांचा इतका जय झाला नसता.

**रोमन** लोकांनीं आपले मनांत **मासिदनाचा** राजा **फिलिप** ह्यावर स्वारी करण्याचा निश्चय फार दिवस केला होता, कारण, कीं त्या राजानें **कार्थेजिनियन** लोकांचा सरदार **हानिबल** ह्यास कुमक केली होती; परंतु मुख्य कारण असें होतें, कीं त्यांचा **एशिया** खंड काबीज करण्याचा निश्चय झाला होता. जोंपर्यंत **हानिबलाशीं** युद्ध करीत होते, तोंपर्यंत त्यांनीं शाहणपणानें त्या राजाशीं उघडपणें शत्रुत्व दाखविलें नाहीं; परंतु **कार्थेजिनियन** लोकांशीं युद्ध समाप्त झाल्यावर दुसरे वर्षीं ते लोक त्या राजाशीं बिघाड करण्यास निमित्त शोधूं लागले; तें त्यांस सहज सांपडलें. युद्ध सुरू झाल्यावर **ग्रीस** देशांत **इतलियन** ह्मणून अत्यंत बलाढ्य लोक होते त्यांनीं **रोमन** लोकांचा पक्ष स्वीकारून त्यांस अत्यंत साहाय्य केलें. हें युद्ध पुष्कळ दिवसपर्यंत चाललें नाहीं. तीन वर्षें चाललें होतें.

ह्या युद्धामध्यें शेवटची लढाई **सिनासिफाली** शहराजवळ **क्रिस्ताचे** पूर्वी १९६ वे वर्षी झाली. तींत **फिलिप** राजाचा अगदीं पराभव होऊन त्यास **रोमन** लोकांशीं तहाचें बोलणें लावणें प्राप्त पडलें. त्याचें बोलणें **रोमन** लोकांनीं कबूल करून तहाच्या आटी सांगितल्या त्यांचा तपशील.

१ **फिलिपानें ग्रीस** देश सोडून द्यावा.

२ आपलीं सर्व जहाजें **रोमन** लोकांचे स्वाधीन करावीं.

३ आपली फौज कमी करावी.

४ त्यानें हजार तालेंत ह्मणजे सुमारें वीस लाख रुपये **रोमन** लोकांस द्यावे.

ह्या जबर अटी **फिलिप** राजास कबूल करणें प्राप्त झालें. ह्या वेळेस **रोमन** लोकांचा उद्देश समुद्रावरील आधिपत्य मिळविण्याचा होता; पण हा उद्देश सिद्धीस नेण्याकरितां त्यांनीं आपल्या गलबतांची संख्या न वाढवितां आपले सर्व शत्रूंचीं जहाजें नाहींशीं करून टाकण्याचा बेत धरिला होता, कारण गलबतांची संख्या वाढविणें हें खर्चाचें काम होतें; आणि सदरहू बेताप्रमाणें त्यांनीं **कार्थेज** व **मासिदन** ह्या राज्यांचीं जहाजें नाहींशीं करून टाकिलीं. **ग्रीस देश फिलिप** राजाचे ताब्यांतून सुटतांच **रोमन** लोकांनीं त्यांस स्वतंत्र केलें. एकाद्या दुर्बल राज्यास शेजारीं बलाढ्य राज्य असतां जितकी स्वतंत्रता उपभोगावयास सांपडते, तितकी स्वतंत्रता कांहीं दिवसपर्यंत **ग्रीक** लोकांनीं भोगिली. परंतु **ग्रीस** देशांत जागोजाग **रोमन** लोकांचे वकील होते, त्यांनीं स्वभावतः परस्परांचा अत्यंत मत्सर करणारीं जीं संस्थानें त्यांच्यामध्यें कलह लावून दिले, आणि तेथील सर्व बातमी **रूम** शहरास कळवून त्या संस्था-

नास अत्यंत त्रास दिला; आणि ह्या तऱ्हेनें **रोमन** लोकांचें वजन दृढ केलें. **रोमन** लोकांनीं **कार्थेज** व **मासिदन** ह्या राज्यांची सत्ता बहुतेक नाहींशी करून टाकिली, त्यामुळें पृथ्वीवरील इतर राज्यांस आपणांविषयीं **रोमन** लोकांच्या मनांत काय आहे हें कळून आलें; आणि **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याची सत्ता वाढत चालली आहे, ती साधल्यास खुंटवून टाकावी अशी सर्वांचे मनांत इच्छा उत्पन्न झाली. **रोमन** लोकांविषयीं **हानिबलाचे** मनांत निरंतर जळत होतेंच; आणि तो आतां **कार्थेज** येथें मुख्य कारभारी होता. त्यानें हितकारक असे फेरफार करून आपले देशास बळकटी आणण्याविषयीं यत्न केला एवढेंच नाहीं, तर **रोमन** लोकांवर एक जबरदस्त कट करण्याविषयीं तजवीज चालविली. त्या कटामध्यें **कार्थेज** व **षाम** हे देश होतेच; आणि **मासिदन** व **मिश्र** हेही देश कदाचित असतील; पण **रोमन** लोकांनीं नानाप्रकारच्या हिकमती लढवून **हानिबलास कार्थेजचे** राज्याच्या हद्दापार करून दिलें, **मासिदनचे** राजास थोडीशी लालूच दाखवून त्यास नादीं लाविलें, आणि इतर संस्थानांमध्यें सत्ता दृढ केली. **हानिबलानें** वस्तादगिरीनें जो कट चालविला होता तो **रोमन** लोकांस भयावह झाला असता, पण त्यांनीं सदरहु तजविजी योजिल्यामुळें तो कट मोडून गेला, आणि **हानिबल** ह्यालाच आपला बचाव करण्याकरितां **षामचा** राजा जो **अंत्योकस** ह्याचा आश्रय करणें प्राप्त पडलें. त्या राजाचे मनांत एकदां **रोमन** लोकांचें सामर्थ्य पहावयाचें होतें, ह्मणून **हानिबलानें** त्या राजास ह्या गोष्टीविषयीं उत्तेजन दिलें, आणि त्यास मसलत देऊं लागला. **अंत्योकस**

राजा व **रोमन** लोक ह्यांच्यामध्यें कलह उत्पन्न होण्याचें एक कारण असें झालें, कीं **रोमन** लोकांनीं **ग्रीक** लोकांस स्वतंत्र केलें होतें, त्याप्रमाणें **एशियामैनर** देशांत **अंत्योकस** राजाचे अमलांत जीं **ग्रीक** लोकांचीं शहरें होतीं त्यांसही स्वतंत्र करावें, अशी **रोमन** लोकांस इच्छा उत्पन्न झाली. तो राजा **रोमन** लोकांस **एशिया** खंडांत पायसुद्धां ठेवूं देत नव्हता. **रोमन** लोकही, **युरोपा**मध्यें **अंत्योकसाचा** पाय शिरकूं नये ह्मणून तत्पर होते, ह्यास्तव **अंत्योकसानें युरोपा**मध्यें **थ्रेश** देशाचा एक भाग घेतला, हें एक उभयतांमध्यें कज्या सुरू होण्यास कारण झालें; पण कज्याचें वास्तविक कारण बघूं गेलें असतां **रोमन** लोकांची महत्वाकांक्षाच होय.

**अंत्योकस** राजानें युद्ध करण्याचा निश्चय करून चार लाख फौजेनिशीं मोठ्या इतमामानें व ऐशआरामानें **ग्रीस** देशास येऊन तेथें हिंवाळ्याचे दिवस ख्यालीखुशालींत घालविले. परंतु त्याचे शत्रु जे **रोमन** लोक हे एकाग्रतेनें युद्धाची तयारी करीत होते. वसंतऋतूच्या आरंभींच **रूमचें** कान्सल रणभूमींत आलें, आणि उभय दळांची **थरमापलीचे** प्रख्यात खिंडींत गांठ पडून त्यांच्यामध्यें लढाई झाली. तींत **अंत्योकस** राजाचा पराभव होऊन त्याची बहुतकरून सर्व फौज मारली गेली. फक्त ५००० स्वार राहिले, त्यांबरोबर तो आपला प्राण वांचविण्याकरितां **एशिया** खंडांत पळून गेला. ही लढाई **क्रिस्ताच्या** पूर्वी १९० वे वर्षी झाली. आणखी त्याच वर्षीं पाण्यावरील लढाईंत **रोमन** लोकांनीं त्या राजाचा पराभव करून त्याचीं जहाजें हिसकावून घेतलीं. दुसऱ्या वर्षीं **रोमन**

लोकांनीं, **कार्थेजचा** जिंकणारा जो **सिपियो** ह्यास ह्याचे भावास बरोबर देऊन आपले राज्यनीतीच्या नियमाप्रमाणें **अंत्योकसा**चेंच राज्यांत लढाई चालविण्याकरितां **एशिया** खंडास पाठविलें. नंतर उभयतांच्या फौजेची **मागेसिया** एथें लढाई झाली. तींत **अंत्योकस** राजाचा पराभव पुनः होऊन त्याच्या फौजेपैकीं तीन चतुर्थांश फौज मारली गेली. त्यामुळें त्या राजास **रोमन** लोकांनीं सांगितल्याप्रमाणें तह करणें प्राप्त पडलें. सदरहू तहाचीं कलमें येणेंप्रमाणें.

**अंत्योकस** राजानें **युरोप** खंडांतील मुलखावरील आपला दावा सोडून द्यावा.

२ **एशियामैनर** देश **रोमन** लोकांस देऊन **तौरस** डोंगर आपल्या राज्याची हद्द करावी.

३ युद्धाचे खर्चाबद्दल **रोमन** लोकांस तीन कोट रुपये द्यावे.

४ **हानिबल*** ह्यास **रोमन** लोकांचे स्वाधीन करावें.

ह्याप्रमाणें तहनामा झाल्यावर **रोमन** लोकांनीं **एशियामैनर**चे सुभे **परगेमस**चा राजा **युमेनस** व **र्‍होदियन** लोक ह्यांस वांटून दिले. सदरहू राजा व **र्‍होदियन** लोक **रोमन** लोकांचे संकेत साहाय्यकारी होते. **रोमन** लोकांची खातरी होती, कीं आपल्या संकेत साहाय्यकाऱ्यांपासून ज्या वेळेस पाहिजे त्या वेळेस ते सुभे परत घेण्यास उशीर लागणार नाहीं. ह्याप्रमाणें **कार्थेज**चें राज्य खाल-

---

* जोंपर्यंत हा सरदार मोकळा राहील तोंपर्यंत आपणास सुरक्षितपणा दुर्लभ असा **रोमन** लोकांनीं आपल्या ठिकाणीं निश्चय करून ठेविला होता.

वल्यावर एका दाहा वर्षांत पृथ्वीवरील विद्याचारसंपन्न भागाची अगदीं स्थिति बदलून गेली, आणि **एशिया** खंडांत **रोमन** लोकांचे ऐश्वर्यास आरंभ झाला. **अतलांतिक** समुद्रापासून **युफ्रेतीज** नदीपर्यंत सर्व मुलुखाचे आधिपत्य ह्या काळीं **रोमन** लोकांकडे आलें होतें. **कार्थेज** व **षाम** व **मासिदन** ह्या तिन्ही राज्यांचें सामर्थ्य इतकें कमी झालें होतें, कीं त्यांजपाशीं पैसा व जहाजें न राहिल्यामुळें त्यांस **रोमन** लोकांशीं पुनः लढाई करण्याचें अवसान राहिलें नव्हतें. इतर राज्याशीं लढाई करणें झालें, तर **रोमन** लोकांचे परवानगीशिवाय त्यांनीं करूं नये असें त्यांचे तहनाम्यांतून ठरलें होतें. आतां **मिश्र** देशचे राज्यांत आपसांतील कज्जे माजून तें **क्रिस्ताचे** पूर्वीं २०१ आंत आपोआप **रोमन** लोकांचे आश्रयाखालीं आलें होतें. ह्याप्रमाणें ह्या चार मोठ्या राज्यांचीं अवस्था झाली होती. लहान लहान राज्यांस **रोमन** लोकांनीं आपले संकेतसाहाय्यकारी करून त्यांस थोरपणा दिला; आणि त्या मोहक नांवावरच तीं राज्यें आपणांस कांहीं धोका नाहीं, असें मानीत होतीं; पण शेवटीं **रोमन** लोकांनीं सोईवार वाटलें, तेव्हां तीं राज्यें बुडवून त्यांस लोकसत्तात्मक राज्याचे प्रांत केलें.

**अंत्याकस** राजाचा पराभव झाल्यानंतर वीस वर्षांत **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याचे पूर्वावस्थेंत ज्या गोष्टी मोठ्या महत्वाच्या ह्मणून मानिल्या असत्या अशा पुष्कळ घडल्या; पण लोकसत्तात्मक राज्याच्या हल्लींच्या स्थितीच्या मानानें ह्मटलें असतां मोठ्या महत्वाची अशी एकही गोष्ट घडली नाहीं. पण ह्या संक्षिप्त इतिहासांत २०

वर्षांतील ही गोष्ट सांगण्याजोगी आहे, कीं ज्यांनीं आपल्या युद्धकौशल्येंकरून व नीतिकौशल्येंकरून आपले देश प्रख्यातीस आणिले, असे जे परस्परांचे प्रतिस्पर्धी **हानिबल** व **शिपियो अफ्रिकेनस** ह्यांस त्यांच्या देशाच्या लोकांनीं स्वराष्ट्रांतून काढून दिलें, आणि ते परदेशांतच **क्रिस्ताचे** पूर्वीं १८३ वे वर्षीं मृत्यु पावले.

**क्रिस्ताचे** पूर्वीं १७९ वे वर्षीं **मासिदनचा फिलिप** राजा मृत्यु पावला, आणि त्याच्या गादीवर त्याचा पुत्र **परशस** बसला. त्यानें राज्यकारभार हातीं घेतांच **रोमन** लोकांशीं युद्ध करण्याची तयारी चालविली, त्यावरून **रूमचे सिनेट** सभेंतील सभासद लोकांनीं तिकडील कशी काय स्थिति आहे, हें पाहाण्याकरितां तीन वकील पाठविले. त्यांची **परशस** राजाशीं मुलाखत होऊन बोलणें झालें नाहीं, तथापि त्या राजाचा **रोमन** लोकांशीं युद्ध करण्याचा बेत आहे, अशी त्यांची पुरी खात्री झाली. आणखी **परगेमसच्या युमिनस** राजानेंही त्याच्या युद्धाचे बेताबद्दल **रूमचे सिनेट** सभेस लिहून पाठविलें. त्या राजाला अशी आशा होती, कीं **रोमन** लोकांनीं पूर्वीं **अंत्योकस** राजापासून मुलूख घेऊन त्याचा हिस्सा आपणास दिला, ह्याप्रमाणेंच ते हल्लीं **परशस** राजाचे मुलुखाचाही हिस्सा आपणास देतील.

**क्रिस्ताचे** पूर्वीं १७१ वे वर्षीं **रोमन** लोकांनीं **मासिदनचे** राजाचें स्वातंत्र्य अगदीं नष्ट करून टाकावें ह्या हेतूनें त्या राजाशीं युद्ध सुरू केलें. तें दोन वर्षें रेंगत चाललें होतें. मग तिसरे वर्षीं **रोमन** लोकांनीं **पालस एमिल्यस** ह्मणून पराक्रमी सरदार होता, त्यास सेनाधिपत्य

दिलें. त्यानें **परशस** राजास **पिंदा** शहराजवळ गांठलें. नंतर तेथें मोठी लढाई झाली, तींमध्यें **परशस** राजाचा अगदीं पराभव झाला. त्यामुळें त्यास रणांगणांतून पळून जाऊन पुढें **रोमन** लोकांचे स्वाधीन होणें प्राप्त पडलें. **रोमन** लोक विजयी जो **एमिलयस** ह्यास शहरांतून मिरवीत नेत असतां, त्यांनीं **परशस** राजाला बरोबर घेतलें होतें. नंतर त्यांनीं त्यास अंधारी कोठडींत टाकिलें, आणि तेथें तो मेला. **रोमन** लोकांनीं प्रथमतः **मासिदनचे** राज्यास स्वतंत्र ठेविलें; परंतु शेवटीं त्यांनीं तें राज्य आपल्या राज्याचा एक सुभा करून टाकिलें. सदरहू युद्धांत **रोमन** लोकांस इतकी लूट मिळाली, कीं तीमुळें पुढें १२० वर्षेंपर्यंत लोकसत्तात्मक राज्याचा सर्व खर्च भागला. **मासिदनचें** राज्य सर झाल्यानें **रूमचे** राज्याचे अंगीं अनिवार्य सामर्थ्य आलें. **रूमचें** राज्य प्रस्तुत काळीं थोर भाग्यास चढलें, व त्याला पुढें उतरती पायरी लागून त्याचा ऱ्हास झाला, ह्याविषयीं एका **इंग्लिश** इतिहासकारानें सर्वोत्कृष्ट वर्णन केलें आहे. तें असें, ह्या वेळेस **रूमच्या** राज्यरूपवृक्षाचे उंचीचा बहुतकरून कळस झाला, हा टवटवीत व सुंदर वृक्ष वाडीच्या मध्यभागीं शोभत आहे. तो लोकांचे दृष्टीस पडण्यास प्रतिबंधक जे वृक्ष होते, त्यांपैकीं कांहीं समूल उपटून टाकिले आहेत, व कांहीं कापून टाकिले आहेत. आतां त्यास पाहून लोकांस साल्हाद आश्चर्य होत आहे. हा वृक्ष ह्याप्रमाणेंच कांहीं दिवस राहून पुढें ह्याचें सौंदर्य कमी होऊं लागलें. महत्वाकांक्षारूप वादळ होऊन त्या वृक्षाच्या मोठमोठ्या फांद्या व ढाळ्या एकमेकांवर अपटतील. नंतर त्यांचीं पानें पडून त्या वाळतील,

आणि अज्ञानी लोकांचा समुदाय येऊन, वाडींत शिरून त्या वृक्षास तोडून टाकील.

**मासिदन**चें राज्य नष्ट झाल्यापासून **कार्थेजानियन** लोकांशीं शेवटचें युद्ध सुरू होई तोंपर्यंत वीस वर्षे गुजरलीं. ह्या वीस वर्षांत अशी एक गोष्ट झाली, कीं **शाम** देशाचा राजा **सिकंदराबाद** शहर घेण्याकरितां जात असतां त्यास **रोमन** लोकांकडील **पापिल्यस** वकिलानें गांठून सांगितलें, कीं ही मोहीम महकूब करण्याविषयीं आपणास **रूमच्या सिनेट** सभेनें हुकूम पाठविला आहे. तेव्हां त्या राजानें त्या गोष्टीचा विचार करण्याविषयीं फुरसत मागितली; परंतु तो अभिमानी वकील आपल्या तरवारीच्या टोंकानें त्या राजासभोंवतीं जमिनीवर रेघ ओढून त्यास ह्मणाला, कीं मला उत्तर दिल्याखेरीज आपण ह्या रेघेचे बाहेर जाऊं नये. तेव्हां त्या बिचाऱ्या राजास **सिनेट** सभेचा हुकूम मानितां, असें तोंडानें ह्मणून परत जाण्याकरितां कूच करणें प्राप्त पडलें. ह्या काळीं अणखी एक अशी गोष्ट झाली, कीं **रोमन** लोकांनीं **ग्रीस** देशांतील मोठमोठाले नामांकित हजार लोकांस कैद करून **रूम** शहरांत आणून त्यांपैकीं बहुतेकांस सत्रा वर्षेपर्यंत कैदेंत ठेविलें. व एव्हांच असें झालें, कीं **रोमन** लोकांनीं एक दिवसांत **इपैरस** देशांतील सत्तर शहरांची धूळधाणी करून, त्यांतील दीड लाख लोकांस दास केलें. सारांश, पृथ्वीवर कोणाचें राज्य राहूं न देतां सर्व लोकांस आपली प्रजा करण्याविषयीं **रोमन** लोकांनीं निश्चय केला होता; आणि ह्या बुद्धीनें त्यांनीं **कार्थेजचें** राज्य अगदीं नष्ट करण्याचा बेत केला. असें वर्तमान झालें, कीं **केटो** ह्या नांवाचा

मनुष्य **रोमन** लोकांकडून वकील ह्मणून **कार्थेज** शहरास तेथील कांहीं तंटे तोडण्याकरितां गेला होता. तो परत आल्यावर त्यानें **सिनेट** सभेस सांगितलें, कीं **कार्थेज** शहर पुनः समृद्ध झालेलें दिसतें, त्यास तें नष्ट करावें. हें **केटोचें** सांगणें मान्य पडून **रोमन** लोकांनीं **कार्थेजिनियन** लोकांशीं, लढाई करण्याकरितां एक निमित्त शोधून काढिलें. तें असें, कीं **कार्थेजिनियन** लोकांनीं आपल्या बचावाकरितां कांहीं लढाऊ जहाजें तयार केलीं होतीं, ही गोष्ट उघड होती; परंतु तीं त्यांनीं **न्युमिदियाचा** राजा **रोमन** लोकांचा संकेत साहाय्यकारी होता, त्यावर हल्ला करण्याकरितां तयार केलीं, असें **रोमन** लोकांनीं त्या लोकांवर दूषण ठेवलें आणि जहाजांचा एक मोठा समुदाय व मोठें लष्कर **आफ्रिका** खंडांत रवाना केलें; परंतु **रोमन** लोकांशीं युद्ध करून जय मिळण्यास आपणामध्यें सामर्थ्य नाहीं, असें **कार्थेजचे** लोकांस पक्कें माहीत होतें. सबब त्यांनीं **रोमन** लोकांची विनवणी केली. तेव्हां **रोमन** लोकांनीं तुह्मी आपलीं सर्व जहाजें आमच्या स्वाधीन करा, ह्मणून त्यांस आज्ञा केली. तीप्रमाणें **कार्थेजचे** लोकांनीं केलें. मग **रोमन** लोकांनीं तीं जहाजें त्यांचे डोळ्यांदेखत आग लावून जाळून टाकिलीं. नंतर तुह्मी आपलीं सर्व हत्यारें द्या, ह्मणून त्यांस सांगितलें. तेंही **कार्थेजचे** लोकांनीं केलें. शेवटीं **रूमचे** कान्सलानें त्यांस असा हुकूम केला, कीं तुह्मी **कार्थेज** शहर अगदीं सोडून देऊन समुद्राचे कांठापासून दूर देशांत जाऊन नवें शहर बांधून राहावें. परंतु ह्या मग्रुरीचे हुकुमानें **कार्थेजिनियन** लोकांचे अंगाचा संताप होऊन गेला, आणि ते जिवावर

उद्दार झाले. मग त्यांच्या सभासदांनीं, आपण आपले शहराबरोबर जगूं अथवा मरूं अशी प्रतिज्ञा करून लढाईचीं नवीन जहाजें तयार करण्याकरितां हरतऱ्हा केल्या. त्यांनीं गलबतांच्या कामास उपयोगी पडण्याजोगें जितकें लांकूड जमविलें तितकें गोदींत जमवून त्याचीं गलबत केलीं, व शहरांतील सर्व प्रकारच्या धातु जितक्या होत्या तितक्या सर्व जमा करून त्या आटवून त्यांचीं हत्यारें केलीं. स्त्रियांनीं धनुष्यांच्या दोऱ्या व जहाजांचे रस्से वळण्याकरितां आपले डोक्यांचे लांब लांब केस कापून दिले. हरएक वयाचे व हरएक पदवीचे बायका व पुरुष ह्या सामान्य प्रलयाच्या निवारणार्थ एकदिल झाल्यामुळें **रोमन** लोकांनीं आपली पराकाष्ठा केली, तरी तें शहर तीन वर्षेपर्यंत हातीं आलें नाहीं. शेवटीं **कार्थेज** शहराचे दोन तट **रोमन** लोकांनीं घेतले, तेव्हां आंतील लोकांनीं तिसरा बांधिला. व एक बंदर **रोमन** लोकांचे हातीं गेलें, तर ते दुसरें खणीत. ह्याप्रमाणें **कार्थेजचे** लोकांनीं लढाई केली; व जरी **सिपियो** ह्यानें बंदरांत हिकमतीनें रिगाव केला, व जरी शहरचे तट पाडून आंत शिरण्यास शत्रूस मार्ग झाला, तरीही त्या लोकांनीं अवसान न सोडितां दृढ निश्चयानें सहा दिवस अहोरात्रपर्यंत लढाई केली. परंतु पुढें लढाई केल्यानें कांहीं उपयोग होणार नाहीं, असें त्या लोकांस दिसून आल्यावरून त्यांनीं **कार्थेज** शहरास आग लाविली, आणि **बाले** किल्यांत, व देवळांत, व आपल्या पूर्वजांचे कबरांत, आपल्याच हातांनीं आपला वध करून घेतला. **कार्थेज** शहर पंधरा दिवसपर्यंत जळत होतें. ह्या धनत्तर शहराचे ऐन भरभरींत

त्यांत ७००००० लोक रहात होते, व तें सुमारें हजार वर्षें नांदत होतें; परंतु आतां त्याचा मागमोसही राहिला नाहीं. **कार्थेजचे** लोकांनीं आपले शहराचा बचाव करण्याकरितां ह्या प्रसंगीं जो प्रयत्न केला, त्यापेक्षां श्रेष्ठ व **रोमन** लोकांनीं ह्या शहरावर जो जुलूम केला, त्यापेक्षां नीच अशी गोष्ट प्राचीन काळच्या इतिहासांत घडली नाहीं.

---

# प्रकरण ५.

## कार्थेजचें राज्य नष्ट झाल्यापासून क्रिस्ताचे जन्मापर्यंत.

**स्पेन** व **पोर्तुगाल** ह्या देशांतील युद्ध— **विर्यथस**— **अतलस** राजानें आपल्या राज्याचे **रोमन** लोकांस वारस केलें— **रूमचे** राज्याचा विस्तार—**रोमन** लोकांतील अपसांतील बखेडे **ग्रेकसांचा** परिश्रम व त्यांचें दुःखदायक मरण— **रूम** शहरांतील लांचखोरी— **जुगुर्था**— **कयसमेर्यस**— **सिंब्री** लोकांचा पराभव—अपसांतील युद्ध— **मिथ्रिदेतस** राजाशीं युद्ध—**सिला** व **मेर्यस** ह्या उभयतांचें युद्ध— **मेर्यसाचा** पराभव— **सिलानें** राज्याधिकार सोडून दिला—**सर्तोर्यस**— पट्टा खेळणाऱ्या लोकांशीं युद्ध— चाच्यांशीं युद्ध—**पांपी**— **आर्मिनिया** देशाचा राजा **तिग्रनस** — **लुकलस** —**मिथ्रिदेतस** राजाचा अंतकाल— **कातलैनाचा** कट— **रूमचे** राज्याधिकारी लोक— **सीजरानें गाल** लोकांशीं युद्ध चालविलें— पहिलें त्रिकूट— **सीजर** हा **रूम** शहरावर चढून आला— **फरसालिया** येथील लढाई— **सीजर** दंग्यानें मारला गेला— **ब्रूतस** व **कशस**— **मार्कअंतनी**— **सिसरो**—दुसरें त्रिकूट—**आकशंची** लढाई—**आगस्तस सीजर** ह्यानें बादशाही अधिकार स्थापिला— **येसू क्रिस्ताचा** जन्म.

मागील काळ **रोमन** लोकांचे प्रभावाचा होता. त्यांत त्यांनीं पुष्कळ प्रसंगीं परिमिताचरण, न्याय, धैर्य व देशाभिमान हे गुण प्रगट केले; पण ज्या काळाचें आतां आह्मी वर्णन करणार त्या काळामध्यें ह्या गुणांचा लोप झाला; ह्मणून ह्या काळास **रोमन** लोकांचे गुणांच्या ऱ्हासाचा

काळ असें ह्मटलें असतां चालेल. **रोमन** लोकांस अत्यंत संपन्न देश लुटावयास सांपडल्यामुळें त्यांच्यामध्यें अमर्याद विलास शिरून त्यांची नीति अगदीं सुटत चालली; आणि जो जो मनुष्य सुभ्याचे कामावर जाई तो तो खूब पैसा मिळवून येई. **मासिदनचें** राज्य सर झाल्यापासून **रूमचे** लोकसत्तात्मक राज्यांत नीतिभ्रष्टता दिवसानुदिवस वाढत चालली होतीच, पण तिला **कार्थेजचें** थोडेंसें दडपण होतें; परंतु तें प्रतिस्पर्धी शहर जमीनदोस्त होतांच, **रूमचे** सभासद लोक, सरदार, व वकील ह्यांच्या अंगीं एकाएकीं निर्लज्यपणा, अप्रामाणिकता, विश्वासघात, व क्रूरता हे दुर्गुण शिरले.

**कार्थेज** शहर नष्ट झालें, त्या वर्षीं ह्मणजे **क्रिस्ताचे** पूर्वीं १४५ वे वर्षीं **एकियन** व **लासिदिमोनियन** ह्या लोकांचा कलह होत असतां **रोमन** लोकांनीं **एकियन** लोकांचा कट मोडून टाकिला, आणि **कारिंथ, काल्चिस्** व **थीब्स** हीं तिन्हीं शहरें जाळून **ग्रीस** देशास आपल्या राज्याचा एक सुभा केला. **स्पेन** देश पुरतेपणीं सर करण्यास **रोमन** लोकांस ६० वर्षांहून अधिक वर्षेंपर्यंत युद्ध चालवावें लागलें. त्यांनीं जे जे लोक आपल्या कबज्यांत आणिले, त्यांपैकीं **स्पेन** देशचे लोक जसे आपलें स्वातंत्र्याचें रक्षण करण्याकरितां नेटानें झटले तसे कोणी झटलें नाहींत. त्या लोकांशीं युद्ध **क्रिस्ताचे** पूर्वीं २०० वे वर्षापासून सुरू झालें, तें **क्रिस्ताचे** पूर्वीं १३३ वे वर्षापर्यंत बहुतकरून सारखें चाललें होतें. **क्रिस्ती** शकाच्या पूर्वीं १४७ वे वर्षीं **रोमन** लोकांच्या सुभेदाराच्या असहनीय जुलुमानें **लुसितेनियन** लोकांस (पोर्तुगीस) अत्यंत त्वेष आला, आणि त्यांनीं

**विर्यथस** ह्यास आपला सरदार केलें. तो दुर्गुणी नव्हता, व **रोमन** लोकांतील सर्वोत्कृष्ट पुरुषांच्या अंगीं जे गुण होते, ते त्याचे अंगीं अत्यंत भरले होते, असें लिहिलें आहे. त्यानें साहा वर्षेपर्यंत मोठ्या दृढ निश्चयानें **रोमन** लोकांशीं युद्ध चालविलें. **रोमन** लोकांची जी जी फौज त्यावर गेली, तिचा तो पराभवच करीत गेला. शेवटीं त्यानें **रोमन** लोकांच्या कान्सलास कचाटींत धरून त्या संधीस त्याशीं तहाचें बोलणें लाविलें. सदरहू तह **रूमचे सिनेट** सभेचे अनुमतानें लवकरच झाला; परंतु **रोमन** लोक त्याचे भयापासून मुक्त होतांच त्यांनीं त्यास खबर न समजूं देतां अकस्मात् तो तह मोडण्याचा निश्चय केला. **सिपियो** कान्सल ह्यानें **विर्यथसा**वर एकाएकीं पडून त्याचा पराभव केला; आणि पाजीपणानें त्याचे तिघे मित्रांस लांच चारून त्यांकडून त्यास मारविलें. ह्या कृत्यानें **रोमन** लोकांचे नांवास अविनाशी कलंक लागला. तत्रापि **स्पेन** देशचे लोकांनीं पुढें साहा वर्षेपर्यंत युद्ध चालवून पुनः **रूमच्या** फौजेचा पराभव केला; परंतु शेवटीं त्या लोकांचा सर्व मुलूख **रोमन** लोकांचे हातीं जाऊन **न्युमानशिया** शहर मात्र त्यांकडे राहिलें. त्यांत चार हजार लोक लढाऊ होते. पुढें त्या शहरास **रूमचे** कान्सलानें साठ हजार फौजेनिशीं वेढा घातला; परंतु तें शहर कान्सलाचे हातीं लागलें नाहीं. शहरांतील लोक उपासानें मरूं लागले, तेव्हां त्यांनीं आपल्या घरांस आग लावून तींत मरून गेले. त्यांनीं **न्युमानशिया** शहराचे नांवाशिवाय **रोमन** लोकांस त्यापैकीं कांहीं राहूं दिलें नाहीं. सदरहू शहर **क्रिस्ताचे** पूर्वी १३३ वे

वर्षीं नाश पावलें. मग **रोमन** लोकांनीं **स्पेन** देशाचे दोन सुभे करून आपले राज्यांत मिळविले. त्यानंतर दोन वर्षांनीं **परगेमसाचा** जो अयोग्य राजा **अतलस**, ज्याचे बापास **रोमन** लोकांनीं **एशियामैनर** देशाचा मोठा भाग दिला होता, तो मृत्यु पावला, त्या वेळेस त्यानें आपले राज्याचे **रोमन** लोकांस मालक केलें. ह्याप्रमाणें **रोमन** लोक लेखणीचे एके टांकानें **एशिया** खंडांतील एका धनाढ्य राज्याचे मालक झाले. पण ह्या लाभाचे योगानें **रूम** शहरांत ऐशआराम व दगाबाजी ह्या दोन गोष्टी वाढून **रोमन** लोकांचा मोठा तोटा झाला.

सदरहू मुलूख **रोमन** लोकांस **क्रिस्ताचे** पूर्वी १३० वे वर्षीं प्राप्त झाला. ह्या वेळेच्या अगोदर १३२ वर्षी-पूर्वी **रोमन** लोकांचा मुलूख **इतली** देशाचे हद्दीबाहेर एक पाऊलभरही नव्हता; परंतु ह्या काळीं त्यांचे राज्यांत जे मुलूख होते, त्यांचीं नांवें बितपशील.

**पश्चिमेकडील मुलूख.**

१ **स्पेन**देशाचे दोन सुभे.
१ **सिसली** बेट.
१ **सार्दिनिया.**
१ **आफ्रिका** खंडांत **कार्थेज**-चा मुलूख.
१ **आल्प्स** पर्वताचे आलीकडील **गाल** लोकांचा मुलूख.
१ **लिगूरिया** देश.

**पूर्वेकडील मुलूख.**

१ **मासिदोनिया.** १ **एशियामैनर** व, १ **एकिया.**

सदरहू मुलुखांतील रहाणारे लोक **रूम** शहरचे सर्वथैव

प्रजा होते, आणि त्यांवर अमल करावयास ज्या लोकांनीं पूर्वी **प्रीतर व कान्सल** ह्यांचीं कामें केलीं असतील, त्यांच्या नेमणुका होत होत्या. सदरहू अमलदारांस लष्करी व मुलखी ह्या दोन्ही कामांचा अधिकार मिळत असे; परंतु ह्या गोष्टीच्या योगानें रयतेवर अत्यंत जुलूम होई. सुभ्यांत फौज **रोमन** लोकांची असे, व ज्या सुभ्यांत **ग्रीक** भाषा चालत होती त्याखेरीज सर्व सुभ्यांत **लातीन** भाषा चालू झाली.

**रोमन** लोकांनीं हे इतके समृद्ध देश जिंकले खरे, पण ह्याचा दुष्ट परिणाम लवकरच उघाडीस आला. तो असा, कीं **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याची स्थापना झाल्यावर थोडकेच दिवसांनीं त्या शहरांतील लोकांमध्यें जे कलह उत्पन्न होऊन स्वास्थ्य नाहींसें झालें होतें, ते कलह हल्लीं उपस्थित झाले. लोकसत्तात्मक राज्यानें एकामागून एक मोठमोठाले मुलूख संपादिले, ते श्रीमंत लोकांनीं आपसांत वांटून घेतले; त्यांपैकीं गरीब लोकांस कांहींही भाग दिला नाहीं. तशांत त्या लोकांनीं कांहीं व्यापार करून उदरनिर्वाह करावा, तर गुलाम लोकांखेरीज इतर लोकांनीं व्यापार करणें अश्लाघ्य होय, अशी त्यांची समजूत होती; सबब त्या लोकांस इतर देशांतील लोकांप्रमाणें व्यापार करण्यास अरुता नव्हती, ह्यामुळें त्यांस उपजीविका करण्यास कांहीं इलाज राहिला नव्हता. **रोमन** लोकांनीं **न्युमानशिया** शहरास वेढा घातला होता, त्या वेळेस **रूम** शहरांत वडे लोकांचे जुलुमामुळें एक मोठा दंगा होऊन त्यांत रक्तश्राव झाला. आजपर्यंत **रूम** शहरांत आपसांत कज्जे झाले; पण ह्याच कज्जामध्यें रक्तश्राव झाला. नंतर

राज्यप्रकरणीं सभेमध्यें हत्यारें येऊं लागलीं, व दंगे होऊं लागले, ह्यामुळें वरच्यासारखे पुष्कळ अनर्थ वरच्यावर उत्पन्न होऊन शेवटीं **रोमन** लोकांमधील स्वातंत्र्य अगदीं नाहींसें झालें.

**रूम** शहरांत **निवीर्यस ग्रेकस** ह्या नांवाचा एक मनुष्य अत्यंत शूर व परोपकारी होता, त्याचे पूर्वज प्लिव्यन कुळांतील होते; परंतु त्याचे बापानें **कार्थेजचा** जिंकणारा जो पहिला **सिपियो** ह्या वडे लोकाचे कन्येशीं लग्न केलें होतें. सामान्य लोकांचे फार हाल होऊन गेले होते, ते हाल दूर करण्याविषयीं **ग्रेकसचे** मनांत आलें, आणि हा उद्देश सिद्धीस नेण्याकरितां **लिसीनियन** कायदा पुनः चालू करण्यापेक्षां दुसरा चांगला उपाय त्यास दिसेना. ह्या कायद्यांत **रोमन** नागरिकांस ५०० एकरांहून अधिक जमीन मिळूं नये, असें होतें; पण ह्या कायद्याची वहिवाट बुडत बुडत अगदीं बुडाली, आणि ह्यामुळें पुष्कळ मोठमोठ्या लोकांकडे ५०० एकरांहून फार जास्त जमीन झाली होती. **ग्रेकस** ह्यानें हा कायदा चालू करण्याचें काढल्यामुळें त्यावर सामान्य लोकांची कृपा झाली; व **सिनेट** सभेतील लोक त्याशीं अत्यंत द्वेष करूं लागले. सामान्य लोकांनीं त्यास त्रिब्यूनचे अधिकारावर नेमिलें, तेव्हां त्यानें वडे लोकांकडे जी पुष्कळ जमीन होती, ती कमी करून ५०० एकरांवर आणून ठेवावी, ह्मणून वर लिहिलेला कायदा काढिला. तो चालू करण्यास *त्याच्या बरोबरीचे अधिकाऱ्यानें बहुत हरकत केली. परंतु शेवटीं तो चालू होऊन जमिनी वांटून देण्याकरितां कमिशनर नेमले. ह्याच वेळेच्या समारें **परगेमसचे** राजानें आपले राज्याचें वा-

रसपत्र **रोमन** लोकांचे नांवेंकरून दिलें; त्या समयीं **तिबीर्यस ग्रेकस** ह्मणाला, कीं सदरहू राज्याचा मुलूख सामान्य लोकांमध्यें वांटून द्यावा. तेव्हां ह्या बोलण्याचे योगानें बडे लोकांचा द्वेष फारच वाढला. पुढें **ग्रेकसाचे** नेमणुकेची मुदत भरल्यावर तो तें काम पुनः मिळविण्याविषयीं उद्योग करूं लागला; पण त्रिब्यून निवडून नेमण्याचे दिवशीं **सिपियो नासिका** ह्या नांवाचा एक बडा लोक, ज्याच्या वहिवाटीस सरकारी जमीन बहुत होती, त्यानें, हातांत सोटे घेतलेले असे आपले पदरचे लोक व गुलाम ह्यांचा समुदाय बरोबर घेऊन पुष्कळ सभासद लोकांनीशीं **तिबीर्यस ग्रेकस** ह्यावर पडून त्यास व त्याचे ३०० शें मित्रांस मारून टाकिलें. **रूमचें** लोकसत्तात्मक राज्य उत्पन्न झाल्यापासून ६२० वर्षेंपर्यंत **रोमन** लोकांचे अपसांतील तंटेबखडे कांहीं तोडजोड होऊन तुटत असत; व सामान्य लोक **सिनेट** सभेचा मान ठेवीत असत; व **सिनेट** सभा सामान्य लोकांचें भय बाळगीत असे; परंतु ह्या प्रसंगीं खुद्द **सिनेट** सभेनें होऊन आपला मतलब पुरा करण्याकरितां खून केले; ह्यामुळें **रूम** शहरांतील निरनिराळे तट आजपर्यंत परस्परांची भीड धरीत होते, पण ह्या वेळेपासून त्यांनीं भीड धरणें सोडून दिलें.

**सिनेट** सभेनें **ग्रेकस** ह्यास मारून टाकिल्यावर १० वर्षांनीं त्याचा धाकटा भाऊ **केयस** ह्यानें आपले भावाप्रमाणें वर्तण्याचा निश्चय करून **रूमचे** राज्यकारभारांत हात घातला. हा आपले भावापेक्षांही थोर मनाचा व मोठा शहाणा होता. त्यास सामान्य लोकांनीं त्रिब्यून नेमिलें, तेव्हां त्यानें **लिसीनियन** कायदा चालू करण्याबद्दल फा-

रच आग्रह धरिला. त्यावरून मातबर लोकांनीं व बडे लोकांनीं त्यासही मारून टाकण्याविषयीं कट केला. तो ज्यांच्या योगानें लोकांचें निरंतर फार कल्याण होईल अशा तऱ्हेचे नेहमीं बेत करीत असे. ह्या योगानें व विशेषेंकरून ह्या पुढील दोन गोष्टींनीं त्याची कारकीर्द फारच प्रसिद्धीस आली. एक गोष्ट अशी, कीं **रूमचें** राज्य स्थापित झाल्यापासून इनसाफ करण्याचा अधि॰ार **सिनेट** सभेंतील सभासद लोकांकडे होता, तो त्यानें त्यांकडून काढून त्यांपेक्षां कमी पदवीचे **नैत** ह्मणून लोक होते त्यांस दिला. ह्या तजविजीनें त्यानें सभासद लोकांकडे ज्यास्त अधिकार होते, ते काढून सामान्य लोक व बडे लोक ह्या उभयतांच्या अधिकारांचीं पार्डीं बराबर केलीं. दुसरी गोष्ट अशी, कीं **इतलीमध्यें** जे लोक **रोमन** लोकांचे संकेतसाहाय्यकारी होते, त्यांस **रूमच्या** नागरिकांचे हक्क देण्याचा बेत काढला. सदरहू बेताचें विशेषेंकरून वर्णन करण्याचा प्रसंग आह्मांस पुढें येईल. त्याच्या बेतांनीं काय जोखीम येणार ती वर लिहिलेल्या दोहों बेतांनीं बडे लोकांस दिसून आली. तेव्हां त्यांनीं **रूम** शहरांतच त्यावर उघडपणें हल्ला करून खुद्द त्यास व त्याचे अनुषंगी लोकांपैकीं ३००० लोकांस मारून टाकिलें. **ग्रेकस** मारून टाकिल्यावर **सिनेट** सभेनें **अग्रेरियन** ह्मणजे जमिनीचे वांटणीविषयींचा कायदा, टाळून टाकण्याची तजवीज केली. पुढें तो पुरतेपणें कधींही चालू झाला नाहीं. **ग्रेकस** ह्यानें **इतालियन** लोकांस **रूमचे** राज्याचे कारभारांत घेण्याची आशा लाविली होती ती, त्याच्या मरणानें

नाहींशी झाली. तेणेंकरून त्या लोकांचे मनांत वांकडे-पणा येऊन त्यापासून पुढें फार वाईट परिणाम झाला.

**सिनेट** सभेंतील सभासद लोकांनीं उभयतां **ग्रेकस** त्यांस मारून टाकून सामान्य लोकांचा पाडाव केला; आणि तेणें-करून त्यांस आपलें प्रस्थ वाढविण्याचे व सामान्य लोकांस छळण्याचे बेत निर्भयपणें चालू करण्यास सामर्थ्य आलें. प्राचीन काळीं **रोमन** लोकांच्या चाली साध्या होत्या, त्या सुटून ते लोक अमर्याद ऐशआराम करूं लागले; व निर्लज्जपणानें मोठमोठीं दुष्कर्में करूं लागले. सुभ्यांतील सुभेदार हे लोकांस बेलाशक लुटूं लागले. लहान मोठे असे पुष्कळ राजे **रोमन** लोकांशीं स्नेह राखून होते, ते मोठमोठाले लांच देऊन **रूमच्या सिनेट** सभेंत आपल्या पक्षाचे कांहीं सभासद करून ठेवण्याविषयीं प्रयत्न करूं लागले; तेणेंकरून ज्यांचा पूर्वी मोठा प्रभाव असे, ते सभा-सद लोक पैशाविषयीं लोभी होऊन नानाप्रकारचीं कंत्राटें करूं लागले.

**रूमचे** राज्याधिकारी लांच खातात, ही गोष्ट **जुगर्था** राजाशीं **रोमन** लोकांचें युद्ध चाललें होतें, त्यांत विशेषेंकरून उजेडास आली. सदरहू युद्ध **क्रिस्ताचे** पूर्वी ११८ वे वर्षी सुरू झालें. **मासिनिसा** नांवाच्या राजानें **कार्थेजिनियन** लोकांचे युद्धांत **रोमन** लोकांस साहाय्य केलें होतें, त्याबद्दल **रोमन** लोकांनीं त्यास **आफ्रिका** खंडांत **न्युमीदियाचें** राज्य बक्षीस दिलें होतें. त्या राजाचे मागून त्याचा पुत्र **मिसिप्सा** हा राज्याचा मालक झाला. त्याला **हिंप्सल व अधर्बल** ह्या नांवाचे दोन पुत्र होते, व **जुगर्था** ह्या नांवाचा एक पुतण्या होता; तो उद्योगी व पराक्रमी

होता; पण तो दुराचरणी होता. हा पुतण्या आपले पुत्रांस काढून देऊन आपणच राज्य बळकावील अशी **मिसिप्सा** राजास शंका आली, त्यावरून त्यानें त्या पुतण्याबरोबर आपल्या वांटणीची फौज देऊन त्याला **न्युमानशिया** शहराचे वेढ्यांत **रोमन** लोकांस कुमक करण्याकरितां पाठविलें. तेथें **जुगर्थानें** युद्धकलेमध्यें प्रवीण होऊन आपले सरदारांची वाहावा मिळविली. नंतर **रोमन** लोकांचे लष्करांतील बहुतेक लोकांनीं **रूम** शहरांत पैशाचा खर्च केला असतां सर्व गोष्टी सिद्ध होतात, ह्यास्तव तुझा चुलता मृत्यु पावला ह्मणजे तूं **रोमन** लोकांचें भय अगदीं न बाळगितां **न्युमीदियाचे** राज्याचा मालक हो, असें त्यास सांगूनै त्याचे मनांत राज्य मिळण्याविषयीं इच्छा प्रदीप्त केली. **जुगर्था** परतल्यावर त्याचे चुलत्यानें त्यास दत्तक घेऊन आपले पुत्रांबरोबरच त्यासही आपला वारस करून ठेविलें; परंतु चुलत्याचा अंतकाळ होतांच **जुगर्थानें हिंप्सल** ह्यास मारून टाकिलें; आणि **अधर्बल** ह्यास मुलखांतून काढून देऊन आपण **न्युमीदियाचे** राज्याचा मालक झाला. **अधर्बल** हा **जुगर्थावर** फिर्याद करण्याकरितां **रूमचे सिनेट** सभेकडे गेला. तेव्हां **जुगर्था** ह्यानें सभासद लोकांस लांच देण्याकरितां बरोबर बहुत पैसा देऊन वकील रवाना केले. त्यांनीं लांच दिला तो सभासद लोकांनीं स्वीकारून उभयतां दावेदारांमध्यें **न्युमीदियाचा मुलूख** सारखा वांटून देण्याकरितां **आफ्रिका** खंडास दाहा अमीन रवाना केले. त्यांनीं राज्यांतील सर्वोत्कृष्ट सुभे आपले हिशांत लावून द्यावे ह्मणून **जुगर्थानें** त्या अमीनांसही लांच दिला. पैसा खर्चिल्यानें सर्व गोष्टी घडून येतात, असें

**जुगर्था** ह्यास समजल्यावरून त्यानें धट्टाईनें आपले चुलत भावाच्या हिशाचे मुलखावर स्वाऱ्या केल्या. त्यामुळें त्याचे भावास **सिन्ना** शहरांत कोंडून घेणें प्राप्त झालें. सदरहू शहरासही **जुगर्था** ह्यानें बळकट वेढा घातला, तेव्हां **अधर्बल** ह्यानें आपल्या प्राणसंकटाची खबर **रूमचे सिनेट** सभेस कळविण्याकरितां युक्तीनें त्या शहरास वकील पाठविले. त्यावरून **जुगर्थास** योग्य शिक्षा देण्याकरितां आणण्यासाठीं **आफ्रिका** खंडांत फौज पटवून द्यावी, असें **सिनेट** सभेमध्यें प्रथमतः बोलणें निघालें; परंतु ज्या लोकांनीं **जुगर्था**पासून लांच खाल्ला होता, त्यांनी तें बोलणें मोडून काढलें. शेवटीं उभयतां राजांचे कज्जाचा निवाडा करण्याकरितां **रूमचे** राजसभेतून तीन अमिनांची नेमणूक होऊन ते रवाना झाले. त्यांत मुख्य अमीन **स्कारस** होता. हा **रूमचे सिनेट** सभेतील मुख्य होता. त्या अमिनांनीं **आफ्रिका** खंडांत गेल्यावर **जुगार्थास** कचेरींत येण्याकरितां बोलावणें पाठविलें. तेव्हां तो थोडक्या फौजेनिशीं त्या अमिनापुढें हजीर झाला. इकडे त्याच्या सेनापतींनीं **सिन्ना** शहरचा वेढा जोरानें चालविलाच होता. त्या **अमीन** लोकांनीं लांच खाल्यामुळें ह्मणा अथवा त्यांस सामर्थ्य नसल्यामुळें ह्मणा कज्जाचा कांहींच ठराव केला नाहीं. **जुगर्था**पासून दोषारोपाचा फक्त जबाब घेऊन, ते **इतली** देशास परत गेले. नंतर थोडकेच दिवसांनीं **सिन्ना** शहर सर झालें. मग **जुगर्थानें अधर्बलास** फार हाल करून मारून टाकिलें, व जे हत्यारबंद लोक सांपडले, त्यांची कत्तल केली. हें सर्व **वर्तमान रूम** शहरांत पोहोंचतांच, **रोमन** लोक फारच संतापले; तेव्हां सभासद

लोकांना आपला दोष माहीतच होता, त्यामुळें ते लोकांचे रागास भिऊन, त्यांनीं सैन्यास आफ्रिका खंडास जाण्याकरितां मनापासून हुकूम केला; परंतु जुगर्थानें त्या फौजेचे सरदारांस युक्तीनें लांच देऊन त्यांस रोमन लोकांचे नांवास कलंक लागण्याजोगा तहनामा करण्याविषयीं राजी केलें. ह्या गोष्टीचें वर्तमान रूम शहरांत प्रसिद्ध होतांच सामान्य लोकांस अत्यंत राग आला; आणि मेम्मस ह्या नांवाचे एके त्रिब्युनानें आफ्रिका खंडांत जी फौज रवाना झाली होती, तिजवरील सरदारांवर व तिकडे जे अमीन गेले होते त्यांवर लांच खाल्याबद्दल उघडपणें आरोप घातला, आणि त्यांची व जुगर्थाची रुजुवात करण्याकरितां रोमन लोकांचे अभयवचनानें जुगर्थास रूम शहरास आणावयासाठीं वकील पाठविण्याविषयीं सिनेट सभेस कळविलें. मग त्याप्रमाणें होऊन जुगर्था रूम शहरास आला. तो राजाचे डौलानें न येतां गरीब अर्जदाराप्रमाणें आला; आणि त्यानें आपला लांच चारण्याचा प्राचीन क्रम चालविला. तो क्रम इतका सफल झाला, कीं त्याला लोक सभेचें बोलावणें येऊन तो तेथें गेल्यावर त्याचे सर्व अपराधांचा पाढा वाचला, आणि त्यांचा जबाब देण्याकरितां त्यास आज्ञा झाली. तेव्हां बिब्यस नांवाच्या त्रिब्युनानें त्यास अपराधांचा जबाब देऊं नको ह्मणून हुकूम केला. त्या त्रिब्युनानें त्याजवळून फार पैसा खाल्ला होता. जुगर्था त्याही सभेत बहुतकरून शिक्षा झाल्यावांचून सुटला असता; परंतु त्यानें मासिनिसा राजाचा नातू मासिवा ह्मणून होता, व त्याचा न्युमीडियाचे राज्यावर दावा होता, त्यास त्यानें रूम शहरांत मारेकऱ्यांचे हा-

तून मारविलें. ह्यामुळें त्याच्या अन्यायांचा घडा भरला. त्यास रूम शहर व इतली देश ह्यांतून तत्काल निघून जाण्याविषयीं हुकूम झाला. नंतर त्याचे राज्याचें हरण करण्याकरितां आफ्रिका खंडांत फौज रवाना केली; परंतु त्या फौजेवर आलबिनस कान्सल नेमिला होता, त्यानें कांहीं केलें नाहीं, त्यावरून बहुत लोक तर्क करूं लागले, कीं त्यानेंही जुगर्था ह्यापासून लांच खाला. इतक्यांत एक त्रिब्यून असें ह्मणाला, कीं ज्या ज्या लोकांनीं जुगर्था पासून लांच खाला असेल त्यांस चवकशीस आणावें, हें ऐकून सामान्य लोक बडे लोकांचे द्वेषामुळें त्या त्रिब्यूनाचें बोलणें सिद्धीस नेण्याकरितां फारच उत्कंठित झाले. तेव्हां सभासद लोकांस त्यांचे ह्मणण्यास रुकार देणें प्राप्त झालें, आणि मोठ्या पदवीचे चार मनुष्य लांच खाल्याबद्दल अपराधी ठरून त्यांस शिक्षा झाली. मितिलस ह्यास आफ्रिका खंडांतील फौजेवर सरदार नेमिलें. हा मनुष्य प्रामाणिक होता, व लांच खाऊन वश होण्याजोगा नव्हता. त्यानें जुगर्था राजाशीं मोठ्या झपाट्यानें युद्ध चालवून एका मागून एक ह्याप्रमाणें शहरें घेत त्याचे राज्यांत त्याच्या पाठीस लागला, आणि युद्ध समाप्त करण्याचे बेतांत होता, तों इतक्यांत त्याकडून तो अधिकार निघून त्या हुद्यावर केयस मेर्यस ह्या नांवाचा दुसरा सरदार आला.

केयस मेर्यस आर्पिनम एथें जन्मला. त्याचे आईबाप गरीब व हलक्या कुळांतील होते. तो आपलें धारिष्ट व विशाल बुद्धि ह्यांच्या बलानें मुलकी व सेनासंबंधी मोठमोठालीं कामें मिळवीत गेला. तो त्रिब्यूनाचे कामावर असतां त्यानें

सामान्य लोकांचा पक्ष धरून बडे लोकांस इतकें आकळून धरिलें होतें, कीं त्यावर सामान्य लोकांची मर्जी बसली, आणि हा आमचे हक्कांचें संरक्षण करणारा आहे, असें लोक मानूं लागले. ह्या वेळेस तो **मितिलस** सरदाराचे हाताखालीं मुतालीक होता. त्यानें कान्सलाची जागा मिळविण्याकरितां **रूम** शहरास येण्याविषयीं रजा घेतली. तो **रूम** शहरास दाखल झाल्यावर त्यास सामान्य लोकांचे कृपेमुळें ती जागा मिळाली; परंतु असा हलक्या कुळांतला मनुष्य पूर्वी कान्सलाचे जाग्यावर कधींही नेमिला नसतां हल्लीं नेमिला; ह्मणून बडे लोकांस फारच वाईट वाटलें. त्यास **आफ्रिका** खंडांतील लढाईचे कामावर सरदार नेमण्याचे वेळेस सभासद लोकांनीं अडथळा केला; परंतु त्याची नेमणूक होऊन **मितिलस** सरदारास सर्व फौज त्याचे स्वाधीन करणें प्राप्त झालें. त्या वेळेस त्याचें वय ४८ वर्षांचें होतें. **मेर्यस** ह्यामध्यें अव्वल प्रतीच्या सरदाराचे गुण भरले होते. त्यानें **जुगर्था** ह्यास त्राही त्राहीं करावयास लाविलें. **मेर्यस** ह्याच्या हातीं **जुगर्था** लागेना, तेव्हां त्यानें त्या राजाचा सासरा **बोकस** ह्मणून **मारितेनिया** एथील राजा होता, त्याला जावयास धरून देण्याविषयीं कबूल केलें. **बोकस** हा **आफ्रिका** खंडांतील राहणारा होता, व त्यास **रोमन** लोक अडाणी ह्मणून मानीत होते; पण तोही अशा विश्वासघाताचें काम करण्याविषयीं कांकूं करूं लागला, परंतु **मेर्यसाच्या** नायब सरदार **सिला** ह्यानें त्याला तें काम करण्यासाठीं योग्य हेतु दाखवून त्याच्या मनांतील शंका दूर केली. तेव्हां **बोकस** ह्यानें कांहीं गोष्टी स्नेहाच्या नात्यानें बोलावयाच्या आहेत, ह्मणून **जुगर्था** राजास आपणाकडे बोलावून आणून

**रोमन** लोकांचे स्वाधीन केलें. ह्याप्रमाणें त्या राजाचे युद्धाचा शेवट झाला. ही दगाबाजीची गोष्ट **क्रिस्ताचे** पूर्वी १०६ वे वर्षी झाली. ह्या गोष्टीमुळें **मेर्यस** व **सिला** ह्या उभयतांचे आब्रूची हानि होऊन **रोमन** लोकांचे नांवासही फारच बट्टा लागला.

**रूमचे** इतिहासांत दुसरी एक विशेष गोष्ट सांगावयाजोगी ही आहे, कीं **युरोप** खंडाचे उत्तर भागांत रहाणाऱ्या जंगली लोकांनीं **रूमच्या** राज्यावर स्वारी केली. त्या लोकांचेच हातून पुढें कालक्रमेंकरून **रूमचें** संपूर्ण राज्य नष्ट झालें. **सिम्ब्री** व **ट्यूतन** वगैरे लोकांनीं **युरोप खंडाचे** उत्तर भागांतून उतरून **क्रिस्ताचे** पूर्वी सुमारें १०९ वे वर्षी **आल्प्स** पर्वताचे पलीकडील राहाणाऱ्या **गाल** लोकांचा जो मुलूख **रोमन** लोकांनीं नुकताच जिंकिला होता, तो लुटून फस्त केला. पुढें चार वर्षांनीं त्यांनीं **रूमचा** सरदार **सिलेनस** ह्यास जिंकून थोडकेच दिवसांनीं **स्कारस** व **सिपियो** ह्या नांवांचे द्रोन सरदारांचाही पराभव केला. त्यामुळें जसा **कार्थेजानियन** लोकांचा सरदार **हानिबल** ह्याच्या वेळेस इतली देश डगमगून गेला होता, त्याप्रमाणें ह्या वेळेस डगमगून गेला. तेव्हां सदरहू जंगली लोकांचा पराभव करून **रूमचे** राज्याचा बचाव करण्यास योग्य असा सरदार फक्त **मेर्यसच** आहे, असें सर्वांचे मनांत येऊन सर्वांचे डोळे त्याकडे लागले. ह्या प्रसंगीं वास्तविक पाहिलें असतां **रोमन** लोकांस ह्या जंगली लोकांचें इतकें भय वाटलें होतें, कीं त्यांनीं कोणी मनुष्य हजीर नसला अथवा ज्यास कान्सलाचें काम करून दाहा वर्षे झालीं नाहींत, त्यास कान्सल नेमूं नये, असा कायदा होता, तो मह-

कूब करून मेर्यस ह्यास कान्सल नेमिलें. त्या वेळेस मेर्यस रूम शहरांत नव्हता, व त्याला कान्सलाचें काम सोडून फक्त तीनच वर्षें गुदरलीं होतीं. तेव्हां तो चांगल्या कवाइतीच्या फौजेनिशीं क्रिस्ताचे पूर्वी १०३ रे वर्षी गाल देशास गेला. त्या देशांत दाखल झाल्यावर त्यास समजलें, कीं सदरहू जंगली लोक ऱ्होन नदीपासून पिरनीज पर्वतापर्यंत संपूर्ण मुलूख लुटून दक्षिणेस स्पेन देशास गेले. तो त्या लोकांचे परत येण्याची वाट पहात व आपल्या फौजेची कवाईत पुरी करीत बसला. इकडे, त्याची तिसरे व चवथे वेळेस कान्सलाचे पदवीवर नेमणूक झाली. तिसरे वर्षी ते जंगली लोक स्पेन देशांतून परतले, त्या वेळेस त्यांनीं आपल्या फौजेच्या दोन टोळ्या केल्या. त्यांपैकीं एका टोळींत अंब्रोन व त्यूतन असे लोक होते, त्यांनीं प्रावन्सचे प्रांतांतून इतलींत शिरण्याचा निश्चय केला होता. दुसऱ्या टोळींत सिंब्रि लोक होते, त्यांनीं मोठा फेर घेऊन तैरालचे रस्त्यानें इतली देशांत शिरण्याचा निश्चय केला. सिंब्रि लोकांची टोळी तैराल येथें जाऊन पोहोंचली. इकडे मेर्यस हा अंब्रोन लोकांचे टोळीची खबर ठेवून राहिला होता. शेवटीं त्यानें हल्लीं ज्या स्थळीं अर्वाचीन एक्स शहर आहे, तेथें त्या लोकांवर हला करून त्यांचा अगदीं पराभव करून त्यांपैकीं एक लाख लोकांहून अधिक लोक मारून टाकिले, व कैद केले. त्यानंतर लवकरच सिंब्रि लोकांची टोळी आल्प्स पर्वतावरून खालीं उतरली. क्याटलस नामें सरदार त्या लोकांस अडविण्याकरितां फौजेनिशीं रूम शहराहून रवाना झाला होता; परंतु त्याच्या फोजेनें भिऊन पळ काढला. त्या संधीस मेर्यस हा

कूच शहरास परत गेला होता, त्यास फौजेचा अधिकार घेण्याविषयीं विनंती केल्यावरून त्यानें उत्तर दिशेस कूच करून सिंब्रि लोकांस पो नदीचे काठीं गांठलें. तेव्हां मोठी लढाई सुरू झाली, आणि तींत त्या जंगली लोकांचा अगदीं पराभव होऊन त्यांपैकीं एक लक्ष चाळीस हजार लोक रणभूमींत पडले; आणि इतली देश त्यांचे भयापासून मुक्त झाला.

सुमारें ह्या वेळेस सिसली बेटांत दासांशीं युद्ध झालें. त्यांचे मालकांनीं त्यांवर फारच सक्ती मांडली होती, व त्यांस स्वातंत्र्य मिळविण्याविषयीं फारच उत्कंठा झाली होती, ह्यामुळें त्यांनीं लागोपाट बंडें करून रोमन लोकांचे सैन्याचा पराभव केला. शेवटीं दासांपैकीं सुमारें दाहा लक्ष लोक मारले जात तोंपर्यंत सिसिली बेटांत स्वस्थता झाली नाहीं.

क्रिस्ताचे पूर्वीं ९८ वे वर्षापासून ९१ वे वर्षापर्यंत सात वर्षांत बडे लोकांच्या टोळींतील मुख्य मेतिलस ह्यास राज्याचे हद्दीपार केला, इतकीच विशेष गोष्ट झाली. ह्या खेरीज दुसरी आठवण ठेवण्याजोगी कांहीं विशेष गोष्ट झाली नाहीं. मेर्यस ह्यानें पैसा खर्चून साहाव्यानदा कान्सलाची पदवी मिळविली, आणि कितीएक साहसी मनुष्यांशीं मिळाला. त्यांनीं शहरांतील लोकांवर इतका जुलूम चालविला, कीं शहरांतील सज्जन लोक त्यांस आडवे आले, आणि मेर्यस ह्यास त्यांचा पक्ष सोडून देणें प्राप्त पडलें. नंतर त्यांपैकीं सतर्न्यस व ग्लास्यस ह्या नांवाचे दोन मुख्य मनुष्य ह्याले किल्यांत होते, त्यांसही वेढल्यामुळें

त्यांना लोकांचे स्वाधीन होणें प्राप्त झालें. मग **रोमन** लोकांनीं त्यांस देहांत शिक्षा दिली.

सदरहू लोकांचे जुलमामुळें **मेर्यस** व त्याचा शत्रु **सिला** ह्या उभयतांस बिलक्षण जुलूम करण्यास रस्ता खुला झाला. आतां ह्याविषयीं वर्णन करण्याचा प्रसंग पुढें लवकरच येईल.

**मेर्यस** व **सिला** ह्या उभयतांचे वेळेस ज्या ज्या भयंकर गोष्टींनीं **रूम** शहरांत रक्ताचा प्रलय झाला, त्या गोष्टी वर्णावयाचे पूर्वीं ही गोष्ट सांगणें योग्य दिसते, कीं **रूम** शहर हें मुळींच लुटारू लोकांचे टोळ्यांपासून उत्पन्न होऊन त्यांतील रहाणारे लोक शेंकडों वर्षेपर्यंत अज्ञानावस्थेंत राहिले होते; परंतु त्या लोकांनीं **इतली** देशापलीकडे मुलूख जिंकल्यावर पूर्वेकडील ज्ञानसंपन्न लोकांशीं त्यांचें संघट्टन पडलें. तेव्हां **रूम** शहरांतील उंच उंच पदवीचे लोकांस विद्येविषयीं गोडी लागूं लागली; **रूम** शहरांत **ग्रीक** भाषेचा अभ्यास आस्थेनें होऊं लागला; आणि **लातीन** भाषा होतां होतां इतकी परिष्कृत झाली, कीं तिच्या अंगीं **ग्रीक** भाषेची बहुतेक प्रौढी आली. **रोमन** लोकांनीं आपले शस्त्रसामर्थ्येंकरून **ग्रीक** लोकांस वश केलें; पण **ग्रीक** लोकांनीं मग उलटें आपली विद्या, शास्त्रें व कला ह्यांच्या योगानें **रोमन** लोकांस वश केलें. लोकसत्तात्मक राज्याचा कारभार फार फैलावल्यामुळें **रूमचे** मोठमोठ्या बुद्धिमंत नागरिकांस आपली अक्कल चालविण्याचे प्रसंग येऊं लागले, व उत्कृष्ट वक्तृत्वामुळें मोठमोठाले लाभ होऊं लागले, म्यास्तव लोक वक्तृत्व शिकावयास लागले, आणि **रूम** शहरांतील बरवरच्या पदवींच्या लोकांचीं मनें हलक्या गोष्टींकडून निघून चांगल्या गोष्टींकडे लागलीं.

ह्याच काळामध्यें **नैत** लोकांचा अधिकार कमी झाला. **केयस ग्रेकस** ह्याचे कायद्यांनीं इनसाफ करण्याचा अधिकार त्या लोकांस मिळाला होता, व त्यापूर्वीं त्यांच्याकडे वसूल जमा करण्याचा अधिकार होताच, त्यामुळें ते लोकांवर निष्प्रतिबंध जुलूम करून पैसा काढूं लागले, कारण लोकांचे गैर वर्त्तणुकेच्या फिर्यादी त्यांच्येचकडे निवाड्यास येत असत. न्यायाधिशाचें काम व तहसीलदारी हीं दोन्हीं कामें त्याच मनुष्यांकडे आल्यानें राज्यांतील कित्येक प्रांतांची अत्यंत शोकास्पद अवस्था होऊन गेली. **नैत** लोकांचे सभेंत ३९०० लोक होते, त्यांस वर लिहिलेलीं दोन्हीं कामें मिळाल्यामुळें त्यांचे अंगीं इतकी मग्रुरी चढली, कीं ती शेवटीं कोणास सहन होईनाशी झाली. तेव्हां सामान्य लोकांचा **ड्रूसस** नांवाचा त्रिब्यून ह्यानें प्रयत्न करून **नैत** लोकांकडून अर्धा अधिकार काढिला; परंतु तो **रूम** शहराचे रस्त्यांत मारला गेला.

**ड्रूसस** ह्यानें आणखी असा एक बेत काढला होता, कीं **रोमन** लोकांचे इतली देशांत संकेत साहाय्यकारी आहेत, त्यांस **रोमन** नागरिकांचे हक्क द्यावे. सदरहू बेत सिद्धीस गेला असता तर **रूमचा** राज्यकारभार चालविण्यांत **इतालियन** लोकांचा साक्षात् हात शिरला असता; परंतु तो बेत सभासद व सामान्य लोक ह्यांस न आवडल्यामुळें प्रस्तुत काळीं फसला. **इतली** देशाचे लोकांस **ड्रूसस** ह्यानें वचन दिल्यावरून आपणांस **रोमन** नागरिकांचे हक्क मिळतील, ह्मणून त्यांस मोठी आशा लागली होती; पण ती सफळ न झाल्यामुळें त्यांस अत्यंत वाईट वाटून ते लोक त्या हक्कांस बाहुबलेंकरून मिळविण्या-

विषयीं तजवीज योजूं लागले, आणि तशामध्यें त्यांनीं **ड्रूसस** ह्याचे वधाचें वर्तमान ऐकिलें, तेणेंकरून तर **रोमन** नागरिकांचे हक्क पराक्रमावांचून कदापि प्राप्त व्हावयाचें नाहींत, अशी त्यांची पक्की खातरी झाली. **रोमन** लोकांनीं दुनिया सर करण्याकरितां ज्या ज्या लढाया केल्या, त्या सर्वांमध्यें **रोमन** लोकांचे फौजेंत **इतलींतील** संकेतसाहाय्यकारी संस्थानांची दोन हिस्से फौज होती. **आंब्रिशियन**, **ह्युत्रिशियन**, **साबैन**, व **लातीन** ह्या लोकांचीं संस्थानें **रोमन** लोकांशीं इमानानें वागत होतीं; पण ह्यांखेरीजकरून **सिसालपैन गाल** ह्या देशाच्या दक्षिणेस जीं संस्थानें होतीं, तीं सर्व **रोमन** लोकांवर नाखुष होतीं. सदरहू नाखुष संस्थानांनीं **रोमन** लोकांशीं उघडपणें लढाई करण्यास प्रवृत्त होण्याचे पूर्वी **रूम** शहरास वकील पाठवून **सिनेट** सभेस असें समजाविलें, कीं आह्मी लोकसत्तात्मक राज्याच्या सर्व लढायांमध्यें कामास पडलों आहों, व दर वर्षास **रोमन** लोकांच्या फौजेच्या दुप्पट फौजेची भरती करून दिली आहे, व हल्लीं **रूम** शहरचें ऐश्वर्य वाढलें आहे, तें आमचेच मदतीनें वाढलें आहे, ह्यास्तव आमचें इतकेंच मागणें आहे, कीं आह्मास **रूम** शहरांतील नागरिकांप्रमाणें मानावें, परंतु ह्या बोलण्याचा **सिनेट** सभेनें मोठ्या रागानें धिःकार केला. तेव्हां उभयपक्षांचे लोक युद्ध करण्यास सिद्ध झाले. **इतालीयन** लोकांनीं **कार्फिनियम** ह्मणून एक शहर **रूमचे** पूर्वेस सुमारें ३० कोसांवर होतें, तें आपली राजधानी करून त्यास संपूर्ण **इतली** देशाची राजधानी करण्याची उमेद धरली; आणि त्यांत ५०० लोकांची राजसभा स्थापून त्या सभेत का-

सल, सेनापति व दुसरे हुद्देदार **रूम** शहराप्रमाणेच निमिले. हें युद्ध तीन वर्षें चाललें होतें. **क्रिस्ताचे** पूर्वी ९० वे वर्षी सुरू होऊन ८८ वे वर्षी समाप्त झालें. **इतालीयन** लोकांनीं **रोमन** लोकांचा वारंवार पराभव केला; परंतु शेवटीं **रोमन** लोकांचा जय झाला; पण तो मुख्यत्वें-करून **सिला** नामक सरदार ह्मणजे ज्यानें **मेर्यस** सरदाराचे हाताखालीं **जुगर्था** राजाचे युद्धांत काम केलें होतें, त्याच्याच पराक्रमानें झाला. पुढें **सिनेट** सभेनें **इतली** संस्थानास एकामागून एक ह्याप्रमाणें **रूमचे** नागरिकांचे हक्क दिले. ते मुळींच दिले असते, तर जीं तीन लाख मनुष्यें लढाईंत मरण पावलीं त्यांचे प्राण वांचले असते. सदरहू हक्क **रोमन** लोकांनीं **इतालीयन** लोकांस दिल्यानें **रूमचे** राज्यरचनेंत समतोलपणा होता, तो अगदीं नाहींसा होऊन, शहरांत जो घोटाळा होऊन गेला तो मोडून पुनः स्वास्थ्य आणण्यास उपायच राहिला नाहीं. तेव्हांपासून असें होऊं लागलें, कीं एकादा गांवगुंड उठे, आणि आपणाबरोबर देशांतील संमत देणारे लोकांचा मोठा समुदाय घेऊन येई; आणि आपल्या मनांत जी गोष्ट असे, तिचा विचार काढून आपल्यासारखी करून घेऊन जाई.

ह्या युद्धानंतर **रोमन** लोक **मिथ्रिदेतस** राजाशीं युद्धांत गुंतले. **मिथ्रिदेतस** राजा ज्या घराण्यांतील होता त्या घराण्यांतील राजानीं फार दिवसपर्यंत **पांतसचें** राज्य केलें. हें राज्य **एशियामैनरच्या** ईशान्य भागांत होतें. ह्या राजाची बुद्धि मोठी विशाल व ग्राहक होती, आणि युद्धामध्यें मोठा कुशल होता; पण त्याचे सर्व चांगले गुण

कपटापुढें रद्द होऊन गेले होते. **एशिया** आणि **युरोप** ह्या खंडांतल्या उत्तर भागांतील पुष्कळ देश **मिथ्रिदेतस** जिंकून बसला होता, आणि त्याच्या मनांत सर्व **एशिया** आपले अमलांत सर्वथैव आणावयाची होती. **एशियामैनरांत रोमन** लोकांचे प्रांत होते, त्यांच्या हद्दीस लागून एक **क्यापादोशिया** देश होता, त्याचे कारभारांत **मिथ्रिदेतस** ह्यानें हात घातल्यामुळें ह्याचा व **रोमन** लोक ह्यांचा प्रथमतः सामा झाला. **रोमन** लोकांच्या लवकरच लक्ष्यांत आलें, कीं **मिथ्रिदेतस** ह्यानें आपलें राज्य वाढविण्याविषयीं जे बेत चालविले आहेत, त्यांस कडकून अडथळा करावा लागेल, आणि ह्याची त्यांस प्रचीतीही आली. त्याशीं त्यांस पुष्कळ वर्षेंपर्यंत युद्ध करावें लागलें. त्या युद्धास प्रारंभ **क्रिस्ताचे** पूर्वीं ८९ वे वर्षीं झाला, आणि त्याचा शेवट **क्रिस्ताचे** पूर्वीं ६३ वे वर्षीं तो मेला तेव्हां झाला. **हानिबलाच्या** मागें असा भयंकर शत्रु **रोमन** लोकांस आजपर्यंत भेटला नव्हता. त्या राजानें **बिथिनिया** व **क्यापादोशिया** हे दोन मुलूख काबीज केले; तेव्हां त्यांतील पदच्युत केलेले राजे फिर्याद करण्याकरितां **रूम** शहरास आले. तेव्हां **सिनेट** सभेनें त्या उभयतां राजांचे मुलूख त्यांस द्यावे, ह्मणून **मिथ्रिदेतस** राजास हुकूम करण्याकरितां **एशिया** खंडांत अमीन पाठविले. त्या समयीं **मिथ्रिदेतसाचे** बेत पक्के झाले नव्हते, ह्याकरितां **रूमचे** सभेचा हुकूम त्यानें मानून त्या उभयतां राजांस त्यांचीं राज्यें परत दिलीं; परंतु थोडकेच दिवसांनंतर त्यानें आपले पुत्रास **क्यापादोशिया** येथें पाठवून तें राज्य पुनः हिसकावून घेतलें; आणि असें जाहीर केलें, कीं **रूमचे**

अमीन लोकांनीं लबाडी केली, ह्यामुळें असें करणें प्राप्त पडलें. हें ऐकून त्या अमिनांनीं **सिनेट** सभेचे हुकमाची वाट न पहातां पुष्कळ फौज जमा करून **मिथ्रिदेतस** राजाशीं उघडपणें लढाई चालू केली. परंतु **मिथ्रिदेतस** राजानें त्या फौजेचा अगदीं पराभव करून **रोमन** लोकांस उशीर न लागतां **ऱ्होद** शहर खेरीज करून **एशियामैनरचे** सर्व प्रांत व शहरें व बेटें ह्यांतून हाकून दिलें. ही गोष्ट **क्रिस्ताचे** पूर्वीं ८७ वे वर्षीं झाली.

ह्या पराजयाचें वर्तमान **रूम** शहरांत पोहोंचल्यावर **सिनेट** सभेंतील सभासद लोकांनीं ह्या नव्या भयंकर शत्रूवर पुष्कळ फौज पाठवून मोठ्या जोरानें युद्ध चालविण्याचा निश्चय केला. तेव्हां त्या युद्धाचें काम चालविण्यास कितीएक उमेदवार उभे राहिले. त्यांत **मेर्यस** व **सिला** हे पहिल्या प्रतीचे पुढारी होते. **मेर्यस** हा सामान्य लोकांचा कैवारी होता. त्यानें **सिंब्रि** लोकांचा पराभव केला होता, व त्याचें वय सुमारें ७० वर्षांचें झालें होतें, तरी त्यास प्रतापतृष्णेची पीडा अजून होत होती. ह्या युद्धांत आपलें नांव गाजेल, व आपणास पुष्कळ पैसा मिळेल, असें त्यास दिसून आल्यावरून युद्धांत हात घालण्याविषयीं त्यास उत्कंठा झाली होती. **सिला** हा सभासद व बडे लोक ह्यांचा कैवारी होता. त्यानें **इतलींतील** संकेतसाहाय्यकारी संस्थानांशीं नुकतेंच युद्ध करून त्यामध्यें कीर्ति मिळविली होती. तोही ह्या युद्धाची मुक्त्यारी मिळविण्याविषयीं उत्कंठित होता, कारण त्या योगानें त्याचे मोठमोठाले हेतु सिद्धीस जाण्याचा संभव होता. शेवटीं **सिला** ह्याची नेमणूक त्या युद्धावर झाली. **रोमन** लो-

कांनीं त्याची नेमणूक चिठ्या टाकून केली, किंवा तशीच केली हें निश्चित नाहीं. **मेर्यस** ह्यानें तें काम **सिला** ह्याकडून निघून आपणास मिळावें ह्मणून हरएक प्रकारच्या हलक्या तजविजी केल्या, व अत्यंत दुष्ट लोकांशीं मिळाला. त्यानें **सिनेट** सभेंत जाऊन त्यांतील कितीएक सभासदांस धरून मारून टाकिलें. त्या वेळेस **सिला** हाही तेथेंच होता. त्यासही तेथून निघून त्याचें लष्कर **नोला** शहरास वेढा घालीत होतें तेथें जाणें प्राप्त झालें. **मेर्यस** ह्याचे मारहाणीनें सभासद लोकांस भय प्राप्त होऊन त्यांस **मिथ्रिदेतस** राजाशीं युद्ध करण्याचा अधिकार **सिला** ह्याकडून काढून **मेर्यस** ह्यास देणें प्राप्त झालें. हा अधिकार **मेर्यस** ह्यास मिळतांच तो शहरचा मालक झाला, आणि त्यानें **सिला** ह्याचे मित्रांपैकीं बहुतेक जणास मारून टाकून त्यांची मालमत्ता जप्त केली. हें वर्तमान **सिला** ह्यास समजतांच तो ३५००० फौजेनिशीं **रूम** शहरावर चालून आला. **रोमन** लोकांचीच फौज **रूम** शहरावर चढून आली, ह्याचें हें पहिलें उदाहरण होय. **सिलानें** फारसे श्रम न पडतां **रूम** शहर काबीज करून सामान्य लोकांचा अधिकार कमी करण्याकरितां कांहीं नवीन कायदे ठरविले, व **मेर्यस** ह्याचे तर्फेचे कितीएक लोकांस मारून टाकून, खुद्द **मेर्यस** ह्यासच हद्दीपार करून जो त्याचें शीर आणून देईल त्यास बक्षीस मिळेल, असें प्रसिद्ध केलें. ह्याप्रमाणें त्यानें **रूम** शहरांत आपले पक्षाचे लोकांचा वरिष्टपणा स्थापिल्यावर **सिना** व **आक्टेव्यस** ह्या नांवांचे दोन मनुष्यांस कान्सल नेमून आपण आपल्या फौजेनिशीं **मिथ्रिदेतस** राजाशीं युद्ध चालविण्याकरितां पूर्व-

दिशेस निघून गेला. ह्या वेळेस **सिला** ह्यानें आपल्याच मर्जीनें कान्सल नेमिलें. कान्सलांस सर्व लोकांचे अनुमतानें पसंत करून नेमण्याची चाल होती, ती त्या वेळेपासून बंद झाली.

**मेर्यस रूम** शहरांतून निघून इतली देशाचे दक्षिणेस पळून गेला. तेथेंही त्याचे शत्रूनीं त्याचा खूब पाठलाग केला, तेव्हां तो दलदलींत लपून राहिला. परंतु पाठलाग करणाऱ्या लोकांनीं त्याचा पत्ता लावून त्यास चिखलानें भरलेला बाहेर ओढून काढून अंधार कोठडींत ठेविलें; परंतु तो तेथूनही युक्तीनें सुटून **आफ्रिका** खंडांत गेला. तेथील **प्रीतर सिला** ह्याचे पक्षाचा होता, त्यानें त्यास तेथून तत्क्षणीं निघून जाण्याविषयीं ताकीद पाठविली; परंतु जो मनुष्य ताकीद करावयास गेला होता, त्यास **मेर्यस** ह्यानें **प्रीतरास** असें सांगावयास सांगितलें, कीं **रूमचे** राज्यांतून काढून दिलेला **मेर्यस** ह्यास मीं मोडलेल्या **कार्थेज** शहरांत बसलेला पाहिलें. अशा निरोपानें त्याचे मनांत **प्रीतर** अधिकाऱ्यास असा बोध करावयाचा होता, कीं जें **कार्थेज** शहर पूर्वीं **रूम** शहराची बरोवरी करीत होतें, त्याची आतां दुर्दशा झाली; व जो मीं उत्तमावस्थेत होतों तो हल्लीं नीचावस्थेंत येऊन मिळालों, तस्मात् इहलोकच्या सर्व गोष्टी क्षणभंगुर आहेत. **मेर्यस** तेथून निघून जहाजांत बसून हिंवाळ्याचे बहुतेक दिवस समुद्रांत फिरत होता. इतक्यांत इकडे **रूम** शहरांत असें वर्तमान झालें, कीं **सिना** नांवाचे मनुष्यास **सिलानें** कान्सल नेमिलें होतें; तो मनुष्य पराक्रमी होता; पण तसाच दुराचरणीही होता. तो **मेर्यस** ह्याचे तर्फेचे लोक **रूम** शहरांत होते, त्यांकडे विशेष अनुरक्त

झाला. नंतर एक मोठी लढाई होऊन त्यास **रूम** शह-रांतून पळून जाणें प्राप्त झालें. त्यानें बाहेर गेल्यावर बरीच फौज जमविली, व त्याच्या पक्षाचे लोक व **मेर्यस** हे येऊन त्यास मिळाले. तेव्हां त्यानें **रूम** शहरावर चाल करून त्यास बळकट वेढा घातला. **आक्टेव्यस कान्सल** व **मेती-लस** ह्या उभयतांनीं शहराचें संरक्षण केलें; पण शहरांतील लोक इतके अडचणींत पडले, कीं शेवटीं **सिनेट** सभेस शहर शत्रूंचे स्वाधीन करणें प्राप्त पडलें. परंतु तिनें शहर स्वाधीन करावयाचे पूर्वीं **रूमचे** कोणा एका नागरिकास मारणार नाहीं, असें वचन **मेर्यस** ह्याजवळ मागितलें, तें त्यानें तेव्हांच दिलें; पण पुढें तें त्यानें बेश्रमपणानें मोडलें. **मेर्यस** ह्यानें सभासद लोकांस असें सांगून पाठविलें, कीं मला हद्दीपार करण्याविषयीं जो ठराव झाला आहे, तो रद्द झाल्याखेरीज मी शहरांत येणार नाहीं. पण कामगार संमतीच्या चिठ्या मोजीत असतां **मेर्यस** ह्यास रागाचा वेग आठोपेनासा झाल्यामुळें त्यानें ४००० गुलाम लोकां-निशीं शहरांत घुसून आपल्या शत्रूंची कत्तल सुरू केली. नंतर स्वस्थपणानें बसून शत्रूंचा पुरतेपणें सूड उगविण्याक-रितां ज्या ज्या लोकांवर शत्रुत्वाचा वहीम होता त्यांसही त्यानें मारून टाकविलें. ह्या प्रसंगीं जे लोक मारले गेले त्यांमध्यें शहरांतील कितीएक मोठमोठे लोक होते. ह्याप्र-माणें तो क्रूरपणानें लोकांस मारीत असतां त्यास **क्रिस्ताचे** पूर्वीं ८७ वे वर्षीं ताप येऊन तो आपले वयाचे ७१ वे वर्षीं मृत्यु पावला.

आम्ही आतां **सिला** ह्याचे कृत्यांचें वर्णन करितों. पूर्वीं असें लिहिलेंच आहे, कीं **मिथ्रिदेतस** राजानें एका स्वारीनें

**रोमन** लोकांचा **एशिया** खंडांतील सर्व मुलूख घेतला. **ऱ्होद** शहर मात्र राहिलें होतें, त्यासही त्यानें वेढा घातला, आणि **एशियामैनर** देशांत जे **रोमन** लोक रहात होते त्या सर्वांची कत्तल करण्याविषयीं लोकांस हुकूम दिला; त्यावरून एके दिवशीं ८०००० **रोमन** लोकांची कत्तल झाली. त्यांची सर्व मालमत्ता जप्त झाली, आणि त्यांपाशीं दस्ताऐवज सांपडले ते सर्व जाळले गेले. हा हुकूम लोकांनीं लागलाच बजाविला, ह्यावरून असें स्पष्ट दिसून येतें, कीं **एशिया** खंडांत **रोमन** लोकांची जी रयत होती तीवर त्यांनीं जुलूम केल्यावरून त्या रयतेचे मनांत **रोमन** लोकांविषयीं द्वेष उत्पन्न झाला होता. ह्या प्रसंगीं सर्व कागदपत्र जाळले गेल्यानें **रूम** शहरांत फारच मोठा गोंधळ पडला. असो, त्या दगाबाजीचा सूड घेण्यास **सिला** हा जातच होता. इकडे **मिथ्रिदेतस** राजानें **एशियाचे** सुभ्यांत मुलूखगिरी करून **आर्चिलास** नांवाचा त्याचा मोठा पराक्रमी सरदार होता त्याचे हाताखालीं फौज देऊन त्यास **ग्रीस** देशांत पाठविलें. **आथेन्स** शहराचे लोकांस **रोमन** लोकांनीं दंड केला होता, सबब ते स्वसंतोषानें **आर्चिलास** ह्याकडे मिळाले. हें पाहून आणखीही कितीएक संस्थानें त्याकडे येऊन मिळालीं. **सिला** हा त्या देशांत **क्रिस्ताचे** पूर्वीं ८७ वे वर्षीं उतरला. त्यानें **आथेन्स** शहरास वेढा घालून युद्ध चालू केलें. परंतु त्या शहरचे लोकांनीं दोन वर्षेंपर्यंत त्याशीं नेटानें लढाई करून त्याचे सर्व परिश्रम व्यर्थ केले; परंतु शेवटीं त्यानें तें शहर घेऊन कोणा एकाची वगळ न करितां सर्व लोकांस मारून टाकावें ह्मणून हुकूम दिला. अशी कत्तल **ग्रीस** देशांत कधींही झाली नव्हती. ह्या वेळेस

रक्ष्यांत रक्त पडलें तें वेशीचे दरवाज्यांजवळ वाहत गेलें; परंतु त्याचे फौजेचा त्वेष कमी होतांच त्यानें आपल्या मित्रांचे पुष्कळ प्रार्थनेंवरून जे लोक राहिले होते त्यांस जीवदान दिलें. **आथेन्स** शहर नष्ट झाल्यावर **मिथ्रिदेतस** राजाचा सेनापति **आर्चिलास** हा **बिओशिया** प्रांतांत **चिरोनिया** शहराकडे गेला. तेथें **सिला** ह्यानें त्याशीं लढाई केली, तींत जरी त्याची फौज **आर्चिलास** सरदाराचे फौजेपेक्षां कमी होती; तरीही त्यानें त्याचा अगदीं पराभव केला. शत्रूचे फक्त दाहा हजार लोक मात्र जिवानिशीं पळून गेले. नंतर **मिथ्रिदेतस** राजाचा दुसरा सेनापति **डोरिलास** हा नवीन फौज घेऊन उत्तरेकडून **ग्रीस** देशांत शिरला. त्याचाही **सिला** ह्यानें **आर्कोमिनसचे** लढाईंत अगदीं पराभव केला. **मिथ्रिदेतस** राजानें आपल्या दोन्हीं फौजांचा पराभव झाल्याचें वर्तमान ऐकून जसा होईल तसा तह करावा ह्मणून **आर्चिलास** ह्यास हुकूम पाठविला. **सिला** ह्याचे मनांत तह करावयाचा होताच, कारण कीं, **मेरिअस** ह्याचे कटांतला **फिंब्रिया** नांवाचा सरदार होता, त्यास सदरहू युद्धाचे कामावर **रूम** शहराहून पाठविलें होतें. **मिथ्रिदेतस** राजासही तह करण्याविषयीं विशेष काळजी लागली होती; कारण, वर लिहिलेला **फिंब्रिया** सरदार ह्यानें एशिया खंडांत आल्यावर त्या राजाचे एके पुत्राचा पराभव करून स्वतः त्या राजास **पितनेस** शहरांत कोंडिलें होतें. ह्या दोन्हीं कारणांवरून पुढें तह झाला. **फिंब्रिया** ह्यानें राजपुत्राचा पराभव केल्यावर **ट्राय** शहराचे आसपासचे मुलुखांत लूटालूट करण्याकरितां पुढें कूच केलें. त्यामुळें **सिला** एशिया खंडांत जलद जाण्याविषयीं प्रवृत्त

झाला. तो **हेलेस्पांत** खाडी उतरून पार गेला तो तेथें त्यास **मिथ्रिदेतस** राजा येऊन भेटला, आणि त्यानें **सिला** ह्याचे सांगितल्याप्रमाणें त्याशीं तहनामा केला. त्या तहनाम्याचीं कलमें वितपशील.

१ **मिथ्रिदेतस** ह्यानें **रोमन** लोकांस **एशियामैनर** व **पाफ्लगोनिया** हे दोन्ही देश परत द्यावे.

२ **बिथीनीया** व **क्यापादोशिया** हे देश त्या मुलखांचे राजांस परत द्यावे.

३ २००० तालेन्त ह्मणजे सुमारें ४०००००० रुपये नगद व आपलीं सत्तर लढाऊ जहाजें अशीं **रोमन** लोकांस द्यावीं.

ह्याप्रमाणें कलमें ठरून तह झाल्यावर **सिला** हा **फींब्रि**यावर गेला. त्या सरदारानें आपले पुष्कळ लोक आपणांस सोडून जाऊं लागले, असें पाहून आपल्याच तरवारीनें आपला वध करून घेतला. **सिला** ह्याशीं लढाई करण्यास **एशिया** खंडांत आतां कोणीही शत्रू राहिला नाहीं. सर्व शत्रू नाहींसे झाले तेव्हां त्यानें तो देश आपले फौजेस लुटण्यास मोकळीक दिली. तेव्हां शिपाई लोक लूट करून इतके श्रीमंत झाले, कीं तसे पूर्वी कधींही झाले नव्हते. अणखी **सिला** ह्यानें जे जे लोक **रोमन** लोकांशीं न बदलतां मिळून राहिले होते, ते खेरीजकरून त्या देशांतील संपूर्ण लोकांपासून दंड घेतला, आणि अशा तजविजीनें त्यानें सुमारें २०००० तालेन्त ह्मणजे ४०००००००० रुपये जमा करून **क्रिस्ताचे** पूर्वी ८४ वे वर्षी आपल्या खासगत शत्रूंचा सूड घेण्यास्तव **इतली** देशास परत जाण्याची तयारी केली.

ह्या वेळेस **रूम** शहर व सर्व **इतली** देश **मेर्यस** ह्या-जकडील लोकांचे स्वाधीन होता. **रूमचे** कान्सलांस, **सिला** हा यशस्वी फौज व लढाऊ जहाजांचा मोठा समुदाय व पुष्कळ खजिना असें घेऊन जवळ येऊन पोहोंचला, असें वर्तमान समजल्यावर त्यांनीं त्याशीं लढाई करण्याकरितां पुष्कळ जहाजें जमविण्याची तयारी चालविली. ह्या प्रसंगीं त्यांनीं **इतली** देशांत जागोजाग फौज जमा केली तिची संख्या सुमारें २००००० होती. ह्या लोकांचें **सिला** ह्याशीं दोन वर्षें युद्ध झालें, त्यांत कितीएक मोठमोठ्या लढाया झाल्या; पण त्या सर्वांत **सिला** ह्याचाच जय होत गेला. ह्या प्रसंगीं **इतली** देशांत रक्ताचा प्रलय झाला, तो परदेशांतील शत्रूंचे हातून झाला, असें नाहीं; त्या देशांतील राहाणाऱ्यांचेच हातून झाला. शेवटीं **रूम** शहर **सिला** ह्याचे हातीं लागलें. मग तो आपले शत्रूंस शिक्षा करण्यास सिद्ध झाला. ह्या प्रसंगीं पृथ्वीची स्वामिनी जी **रूम** नगरी ही आपलेच एका नागरिक व्याघ्राचे घशांत पडली. **सिला** ह्यानें **सिनेट** सभा भरवून तींतील सभासदांस आपला मजकूर निवेदन करीत असतां कैदी लोकांपैकीं ८००० लोकांस मारून टाकविलें, त्यांच्या ओरडण्यानें सभासद लोकांस भय पडलें; परंतु **सिला** ह्याची किंचित् सुद्धां मुद्रा न बदलतां तो सभासदांस ह्मणाला, कीं मी बोलतों आहें इकडे लक्ष्य द्या; कारण कीं मी कांहीं दंगेखोर मनुष्यांस शिक्षा करण्याविषयीं हुकूम दिला आहे, त्यास त्यांचेंच हें ओरडणें आहे. त्यानंतर त्यानें **रूम** शहरांत मोठी कत्तल उडविली. ज्या ज्या लोकांचा ते **मेर्यस** ह्याचे तर्फेचे होते असा त्यास वहिम आला त्यां-

तून तर त्यानें एकासही जिवंत सोडिलें नाहीं. त्या संधीस त्याचे मित्रांनीं त्यानें कानाडोळा केल्यामुळें आपआपल्या घरगुती शत्रूंस मारून टाकिलें. शेवटीं जवळ दवलत असणें हाच गुन्हा झाला, आणि सिला ह्याचे सोबत्यांचे मनांत ज्या ज्या लोकांना मारून टाकावें असें आलें, त्यांपैकीं एकही जिवंत राहिला नाहीं. एके दिवशीं सिला ह्याचा मित्र मितिलस ह्यानें त्यास सिनेट सभेंत विचारिलें, कीं ह्या अनर्थाचा शेवट कधीं होणार, तेव्हां तो एवढें बोलला, कीं कोणास जिवंत सोडावें ह्याचा अझून मला निश्चय होत नाहीं. मग दुसरे दिवशीं त्यानें ज्या लोकांस ठार मारण्याविषयीं ठराव केला होता त्यांच्या नांवांची एक याद करून ती शहरांत एका प्रसिद्ध जाग्यांत लाविली, आणि त्या मनुष्यांचीं जे शिरें आणतील त्यांस मोठमोठालीं बक्षिसें मिळतील, असें प्रसिद्ध केलें. सिलानें दासांस आपले धन्यांस मारण्याविषयीं परवानगी दिली, व पुत्रांस आपले बापास मारण्याविषयीं उत्तेजन दिलें. ज्या लोकांस मारण्याचा ठराव झाला होता, त्यांची मालमत्ता जप्त करून ती सिलानें आपले अनुयायी ह्यांस देऊन त्यांस संपन्न केलें. सदरहू यादींत दिवसानुदिवस नवीं नवीं नांवें पडत जाऊन शेवटीं त्यांची संख्या ४७०० झाली. पण जे लोक मारले गेले त्यांची संख्या यादींतील संख्येपेक्षां फारच जास्त झाली. ह्याविषयीं एका रोमन इतिहासकारानें असें लिहिलें आहे, कीं मिथ्रिदेतस राजाचे हुकुमानें जितके रोमन लोक मारले गेले, त्यांहीपेक्षां सिला ह्याचे हातानें अधिक मारले गेले. सिला ह्याचे हेर सर्व इतलीभर पसरले होते, आणि त्यांस मेर्यस ह्याचे तर्फेचे लो-

क्रांस मदत केल्याबद्दल ज्या लोकांचा वहीम आला त्या सर्वांस त्यांनीं शोधून मारून टाकिलें; परंतु मेर्यस ह्याचा पक्ष धरिल्याबद्दल जे लोक मारिले गेले त्यांपेक्षांही दवलती बद्दल ज्यास्त लोक मारिले गेले; व सिला ह्यानेंही आपले सर्व सोबती मातबर होत तोंपर्यंत यादींत गुन्हेगार लोकांचीं नवीं नवीं नांवें लिहिणें बंद केलें नाहीं.* सिलानें इतली देशांतील पांच शहरें मातीस मिळविलीं, त्यांतील सर्व राहाणाऱ्या लोकांची कत्तल केली, आणि त्यांची मालमत्ता विकून टाकिली.

ह्यानंतर सिला ह्यानें आपणास दिक्तेतराच्या कामावर अक्षयी नेमून घेतलें, आणि असा एक कायदा ठरविला, कीं त्याचे योगानें त्यास रूम शहरांतील लोकांवर व त्यांचे दौलतीवर अप्रतिबंधसत्ता प्राप्त झाली. ह्याप्रमाणें रोमन लोकांचा स्वतंत्रपणा नष्ट झाला; कारण सिला मृत्यु पावल्यावर जरी मुख्य अधिकारी पसंत करण्याचे कामांत स्वतंत्रपणाचा कांहींसा भास राहिला होता, तरी लोकसभा व सिनेट सभा ह्या शहरांतील एक किंवा दोनच जबरदस्त नागरिकांच्या मुठींत असत. सिला ह्यानें दिक्तेतराचें काम दोन वर्षें केलें, आणि आपल्या कारकीर्दींत राज्यरचनेचें स्वरूप अगदीं बदलून टाकिलें. त्यानें जे जे कायदे केले, त्या सर्वांत त्याचा उद्देश हाच होता, कीं सामान्य लोकांचे अधिकारांचें हरण करून सिनेट सभेच्या सभासद लोकांचें वाढवावें. सिला व मेर्यस ह्यांच्या हातून सिनेट सभेंतील पुष्कळ सभासद मेल्यामुळें तींत थोडे राहिले होते, ह्मणून त्यांची भरती सिलानें नैत लोकांतून केली. आणखी त्यानें त्रिब्यन अधिकाऱ्यांकडून कायदे

करण्याचा अधिकार काढिला, आणि त्रिब्यूनाचें काम कोणीं केलें असल्यास त्या कामापेक्षां मोठें काम मिळणार नाहीं, असा कायदा केल्यामुळें त्रिब्यूनाचे कामांतही जीव राहिला नाहीं; त्रिब्यून हें मोठें नांव मात्र राहिलें. ह्याशिवाय त्यानें नैत पदवीचे लोकांपासून इनसाफ करण्याचा अधिकार काढून तो पुनः सभासद लोकांस दिला. हे व दुसरे आणखी कायदे ह्यांच्या योगानें त्यानें सिनेट सभेस मुळचे सर्व अधिकार दिले; परंतु त्याच्यानें सिनेट सभेचें पूर्वींचें तेज आणवलें नाहीं. त्यानें लोकांची व शहरांची मालमत्ता जप्त केली, तींतून त्यानें आपल्या लाख शिपायांची तजवीज केली. त्या लोकांचा भाग्योदय सिलाच्या हातून झाला, सबब त्यास त्या लोकांचा मोठा जबरदस्त आधार झाला.

ह्याप्रमाणें सिला ह्यानें आपले सर्व हेतु पूर्ण केले, आणि रूमचें सर्व राज्य त्याचे कबजांत असतां, अकस्मात् आपला अधिकार व अम्मल सोडून देऊन तो क्यूमी शहरास सुखवस्तु रहावयास गेला, आणि तो तेथें निराश्रित जरी राहिला होता, तरी ही आश्चर्याची गोष्ट आहे, कीं पूर्वीं त्यानें ज्या हजारो लोकांस मारून टाकिलें होतें, त्यांपैकीं एकाच्याही स्वकीयाच्या मनांत त्याचा प्राण घेण्याविषयीं बुद्धि उत्पन्न झाली नाहीं. क्यूमी शहरांत वासकरील असतां त्यानें आपलें चरित्र लिहिलें, व विषयसुखाचाही उपभोग घेतला. पुढें त्यास एक घाणेरडा रोग झाला, आणि मरण्याचे पूर्वींच त्याचे अंगास किडे पडले. शत्रूंस शिक्षा करण्यामध्यें व मित्रांवर उपकार करण्यामध्यें आजपर्यंत माझेवर ताण कोणींच केली नाहीं, ह्या अर्थाची क-

घेता त्यानें आपल्या मरणसमयीं आपले थडग्याचे धोंड्यावर खोदण्याकरितां करून ठेविली. हें त्याच्या स्वभावाचें वर्णन अगदीं बरोबर आहे. **सिला** व **मेर्यस** ह्यांचे युद्धामुळें २०० सभासद लोक मेले, त्यांपैकीं ३३ जणांनीं कान्सलांचें काम केलें होतें, व **रूमचे** नागरिक १५००० मेले. **सिला** ह्याचा अंतकाल **क्रिस्ताचे** पूर्वीं ७७ वे वर्षीं झाला.

**रोमन** लोक आतां एकाचे अधिपत्याखालीं रहातील, असें **सिलावरून** स्पष्टच झालें. ह्मणून **लेपिदस** कान्सलानें **सिलाच्या** मरणाचें वर्तमान ऐकिल्यावर मुख्याधिकार मिळविण्याची उमेद धरली; पण त्याचा प्रयत्न फसला. कारण दुसऱ्या कान्सलानें त्याचा दोन्ही लढायांत पराभव करून त्यास **सार्दिनिया** बेटास पळून जाणें प्राप्त पाडलें. नंतर तो तेथेंच मृत्यु पावला. ह्या प्रकारच्या आपसांतील बखेड्यांमध्यें राज्यांतील पुष्कळ महत्वाकांक्षी सरदारांचे गुण उदयास आले; पण सर्वांमध्यें **पांपी** व **सीजर** ह्यांचे गुण विशेषेंकरून उदयास आले. **रूमचे** राज्यरचनेचा समतोलपणा नाहींसा होऊन गेला होता; ह्यामुळें तें राज्य कुलमालिकाशिवाय बहुत दिवस चालेल, असें दिसेना. पण **सिलानें** राज्याधिकार सोडून दिल्यापासून **आगस्तस सीजरास** बादशाहाची पदवी मिळे तोंपर्यंत ४७ वर्षें गुजरलीं. **आगस्तस सीजर** हा बादशाह झाला, तेव्हां **रूमचा** स्वतंत्रपणा अगदींच नष्ट झाला.

**मेर्यस** ह्याचे पक्षाचा **सरतोर्यस** ह्मणून एक मोठा पराक्रमी सरदार **स्पेन** देशांत होता, त्याशीं **रोमन** लोकांनीं युद्ध चालविलें. **सिला** मेल्यावर मोठें असें युद्ध

प्रथमतः हेंच घडलें. **सरतोर्यसाचे** सोबतीचे सरदारांनीं **सिलाचे** युद्धांत नीट वागणूक केली नाहीं, सबब त्याला त्यांचा त्रास येऊन तो **क्रिस्ताचे** पूर्वी ८२ वे वर्षी **स्पेन** देशांत जाऊन तेथें १० वर्षेपर्यंत आपला स्वतंत्रपणा राखून राहिला होता. **सरतोर्यसा**पेक्षां निष्कलंक व मानार्ह असा मनुष्य **रूमचे** सर्व इतिहासांत दृष्टीस पडत नाहीं. तो **पिरनीज** पर्वत वलांडून **स्पेन** देशांत गेल्यावर तेथें फौज जमवूं लागला, त्या वेळेस **लुसितेनियन** (पोर्तुगीज) हे **रोमन** लोकांशीं युद्ध करीत होते, त्यांनीं त्यास आपल्या सेनेचा सरदार करण्याकरितां बोलाविणें पाठविलें. तें त्यानें आनंदानें कबूल केलें. त्यावर पोर्तुगीज लोकांचाच पूर्ण विश्वास बसला असें नाहीं, तर **स्पानियर्द** लोकांचाही बसून त्यांनीं त्यास प्रति **हानिबाल** ह्मणून मानिलें. तो लढाईचे विद्येंत निपुण होता, सबब तो फक्त ८००० लोकांनिशीं **रोमन** लोकांची १२०००० फौज चार सरदारांचे हाताखालीं होती, तीस तोंड देऊन आपला बचाव करून राहिला. त्याबरोबर सभासद व मुख्य मुख्य **रोमन** लोक होते, त्यांची त्यानें एक सभा केली; आणि तो ह्मणाला, कीं वास्तविक **रूमची सिनेट** सभा ही होय; कारण **रूम** शहरांत जी **सिनेट** सभा आहे ती केवळ नामधारी आहे, ती **सिलाचे** पक्षाचे लोकांच्या मुठींत आहे. आणखी त्यानें थोर पदवीचे लोकांस तरबेज करण्याकरितां त्या सर्व देशांत शाळा घालण्याचा उद्योग केला, आणि सामान्य लोकांस सुधारण्याविषयीं त्यानें कोणता उपाय ठेविला नाहीं. त्या वेळेस त्याचे शत्रु **रूम** शहरांत राज्य करीत होते, ह्मणून त्यानें **रूमचें** आधि-

पक्ष मान्य करणें नाकारिलें. ह्यास्तव **रोमन** लोकांस त्याचा पाडाव करणें जरूर झालें. जे जे सरदार **रोमन** लोकांनीं त्यावर पाठविले त्या सर्वांचा त्यानें पराजय करून त्यांस हाटवून लाविलें. **रोमन** लोकांनीं त्यास जिंकण्याकरितां **पांपी** ह्या नांवाचा एक प्रख्यात सरदार पाठविला, परंतु **सरतोर्यसानें** त्याच्याही फौजेचा वारंवार मोड करून त्याचे सर्व परिश्रम व्यर्थ केले. ह्याप्रमाणें दाहा वर्षेंपर्यंत मोठें युद्ध झाल्यावर त्यास त्याच्या पदरचे **परपेना** नांवाचे सरदारानें मारून टाकिलें. हें करण्यास त्यास प्रवृत्त होण्यास दोन कारणें झालीं; एक असें, कीं तो **सरतोर्यसाचा** मत्सर करीत होता, आणि दुसरें असें, कीं **पांपीचा** साहाय्यकारी सरदार **लुकलस** ह्यानें **सरतोर्यसास** जो मनुष्य मारील त्यास एक अमुक बक्षीस मिळेल, असें प्रसिद्ध केलें होतें.

ज्या वर्षीं **सरतोर्यस** हा मारला गेला त्याच वर्षी इतली देशांत पट्टे खेळणारे लोकांशीं युद्ध सुरू झालें. हे लोक युद्धांत पाडाव करून आणिलेले होते. ह्यांस **रोमन** लोकांनीं गुलाम करून आपणांस रिझविण्याकरितां एकमेकांचा प्राण घेण्यास त्यांस शिकविलें होतें. **रोमन** लोकांचे हातीं लागण्याचे पूर्वीं हे लोक **रोमन** लोकांप्रमाणेंच थोर व स्वतंत्र होते. **क्यापुआ** येथें ह्या लोकांची एक मंडळी होती, तींतील लोकांस आपले नीचावस्थेचा त्रास येऊन ते आपले धन्यांवर उठले; आणि आपणांपैकींच एक **स्पार्तेकस** नांवाचे मनुष्यास मुख्य करून त्याचे आश्रयानें स्वतंत्रपणा मिळविण्याविषयीं त्यांनीं लढाई करण्याचा निश्चय केला. हा मनुष्य दुसरा **सरतोर्यसच** होता,

त्यामध्यें विचार, परिमिताचरण, व युद्धकौशल्य हे गुण भरलेले होते; सारांश, हा दासाचा पोषाख मात्र करीत होता; पण मोठा योद्धा होता. ह्या पट्टे खेळणाऱ्या लोकांची इतकी संख्या वाढली होती, कीं त्यांनीं तीन वर्षेंपर्यंत **रोमन** लोकांचें कांहीं चालूं दिलें नाहीं. **स्पार्तेकसावर रोमन** लोकांनीं चार वेळां फौज पाठविली, तिचा त्यानें पराभव केल्यावरही त्याजवळ ४०००० फौज राहिली होती. पट्टे खेळणारे लोक हे **रोमन** लोकांचे विलक्षण सामर्थ्यापुढें न टिकून शेवटीं मारिलेच जातील, अशी त्याची खातरी होऊन त्यानें त्या लोकांस असें सांगितलें, कीं तुह्मी **इतली** देशांतून पार निघून जाऊन **आल्पस** डोंगरांत बंदोबस्त नाहीं, त्यास तो वलांडून आपले जन्मभूमींत जाऊन तेथें मोकळीक व स्वास्थ्य ह्यांची आशा धरिली असतां शोभेल; परंतु त्या लोकांस **इतली** देश लुटण्याची व विशेषेंकरून **रूम** शहराची धूळधाणी करावयाची आशा होती, ह्यामुळें त्यांनीं **स्पार्तेकसानें** सांगितलेली मसलत ऐकिली नाहीं; शेवटीं **रोमन** लोकांनीं **क्रासस** नांवाचे सरदारास जबरदस्त फौजेनिशीं त्या लोकांवर पाठविलें. त्यानें त्या लोकांचा मोड करून, त्या चाळीसही हजार लोकांची कत्तल रणभूमींत केली. त्यामुळें त्याचा दंगा अगदीं नाहींसा झाला. त्या लढाईंत **स्पार्तेकसानें** मोठा पराक्रम केला, आणि त्याचे सर्वांगास जखमा लागून, शेवटीं तो रणभूमींत पडला. ही गोष्ट **ख्रिस्ताचे** पूर्वीं ७० वे वर्षीं झाली.

**सिलानें नैत** लोकांकडून न्याय करण्याचा अधिकार काढून **सिनेट** सभेस तो दिला होता, त्यास ही व्यवस्था

कांहीं दिवसपर्यंत चालल्यावर असें दिसून आलें, कीं **नैत** लोकांकडे न्याय करण्याचें काम होतें, तेव्हां जे लोकांस अपाय होत त्यांपेक्षां आतां जास्त होऊं लागले. राज्य-कारभार ह्या वेळेस विजातीय अनितीनें चालला होता. बडे लोकांच्या नेमणूका सुभ्याचे कामावर झाल्या, ह्मणजे ते लोकांस पिळण्याशिवाय दुसरें कांहींच काम करीत नसत. सरकारांतून नवीं नवीं कामें पैसा खर्चून मिळविण्याचे इराद्यानें ते दवलत जमा करीत असत. त्यांचे जुलुमानें, ज्या ज्या दैवहीन लोकांचा नाश होई, त्यांनीं **रूम** शहरांत फिर्यादी केल्या असतां त्यांची दाद लागत नसे; कारण जे लोक त्यांवर जुलूम करीत असत, त्यांकडेच त्यांची चौकशी करण्याचें काम असे. सारांश, ह्या वेळेस **रोमन** लोकांची नीति इतकी बिघडली होती, कीं वडे लोक व मातबर लोक ह्यांस अपराधाबद्दल दोष लावण्यास कोणी धजत नसे. वसूल जमा करण्याचें काम **नैत** लोकांकडे होतें, आणि त्यांकडेच न्याय बघण्याचें काम आलें होतें, ह्यामुळें लोकांस फार अपकार झाला; पण राज्याचीं राज्यें लुटून **रूम** शहरांत परत आलेले, व पैसा खाणारे असे ज्या सभेंत सर्व सभासद होते, त्या सभेकडे न्याय करण्याचें काम आल्यानें, लोकांस अपरमितच उपद्रव होऊं लागला. ह्याकरितां **पांपीनें** एक उत्कृष्ट कायदा चालू केला; त्याच्या योगानें इनसाफ करण्याचा अधिकार सभासद **नैत**, व त्रिब्यून ह्या अधिकाऱ्यांमध्यें वाटला गेला.

आतां आह्मी चांचे लोकांशीं **रोमन** लोकांचें मोठें युद्ध झालें त्याचें वर्णन करितों. ते लोक **एशियामैनर**

देशांत भूमध्य समुद्राचे उत्तर किनाऱ्यावर **सिलिसिया** ह्मणून प्रांत आहे, तेथील राहणारे होत. **एशियामैनर** देशांत धामधूम झाली, व **रूमचे** सुभेदार हे जुलूम करूं लागले, ह्यामुळें ते समुद्रांत चांचेपणा करूं लागले. त्या लोकांच्या हातीं जे लोक सांपडत, त्यांस ते **दिलास** बेटांत नेऊन **इतली** देशचे मातवर लोकांचे गुमास्त्यांस शेतकीचें काम करण्याकरितां विकून टाकीत; तेणेंकरून तें बेट गुलाम लोक विकण्याची मोठी पेट झाली. ते लोक प्रथमतः **एशियामैनर** देशाचेच किनाऱ्यानें लुटालूट करीत होते. पुढें दुरदूरचे देशीं लूट करण्यास धजूं लागले. शेवटीं त्यांनीं लढाऊ जहाजें तयार करून ज्या शहरांत बंदोबस्त नसे, त्यांवर छापे घालून ते तीं लुटूं लागले. आजपर्यंत **रूमचे** जे जे सरदार ह्यावर गेले, त्यांचा त्यांनीं पराभव केला. ह्यामुळें त्यांनीं **सिलिसिया** प्रांताची कड खडकामुळें गलबतें जवळ येण्यास फारच बिकट होती, तेथें एक प्रकारचें राज्य स्थापून लुटीचा माल ठेवण्यास त्या कडेनें कोठ्या तयार केल्या, व जहाजें नीट करण्याकरितां सिलहखानें बांधिले. ह्या वेळेस त्या लोकांचें सामर्थ्य इतकें वाढलें होतें, कीं त्यांपाशीं लढाईचीं जहाजें चांगल्या फौजेनिशीं १००० होतीं, व त्यांवरील सरदार हे हरएक प्रकारचा ऐशआराम करीत असत. ह्याशिवाय त्यांनीं ४०० गांव घेऊन १२ अत्यंत धनाढ्य देवळें लुटलीं. त्यांनीं **रोमन** लोकांस पुष्कळ उपद्रव दिला; पण त्यांनीं **रूम** शहरांत धान्याचा तोटा पाडला, ही गोष्ट जशी **रोमन** लोकांस कडकडून लागली, अशी दुसरी कोणतीही लागली नाहीं. **रूम** शहरचे

लोकांची उपजीविका, परदेशांतून **रूम** शहरास धान्य येई तेव्हां होई, ह्याकरितां हे चांचे तें वाटेंत मारूं लागले, ह्यामुळें पृथ्वीचे राजधानींतील लोकांस उपासमार होण्याची संधि आली; तेव्हां **रोमन** लोकांस त्या लुटारू लोकांचा दंगा मोडण्याकरितां लवकर तजवीज करणें प्राप्त झालें. **गाबिन्यस** ह्यानें **क्रिस्ताचे** पूर्वी ६६ वे वर्षी लुटारू लोकांस नाहींसे करण्याकरितां कुल अधिकाराचीं वस्त्रें **पांपी** ह्यास द्यावीं ह्मणून सामान्य लोकांस मसलत दिली. हा मनुष्य **पांपी** ह्यानें वाढविलेला होता. तेव्हां सभासद लोक व **रूम** शहरचे मुख्य मुख्य लोक ह्यांनीं **सिलास** कुल अधिकार मिळाल्यावर त्यानें **इतली** देशांत जो काय प्रलय केला होता, तो मनांत आणून ते **गाबिन्यसाचे** बोलण्यास पुष्कळ आडवे आले; परंतु **पांपी** हा सामान्य लोकांचा मोठा आवडता होता, सबब त्यांनीं वडे लोकांची तक्रार न ऐकतां त्या मोहिमेकरितां **पांपी** ह्याबरोबर १२५००० फौज व ५०० लढाऊ जहाजांचा समुदाय देण्याचें ठरवून, स्वारीखर्चाकरितां सरकारी जामदारखान्यांतून ६००० तालेंत ह्मणजे एका कोटीहून कांहीं जास्त रुपये घेण्याची त्यास परवानगी दिली. नंतर **पांपीनें** त्या चांचे लोकांशीं इतकें नेटानें व कौशल्यानें युद्ध चालविलें, कीं **इतली** देशाचा किनारा सोडल्यापासून ४० दिवसांचे आंत त्यानें चांचे लोक **रूमचे** राज्याचे हद्दींत अगदीं नाहींसे केले. ही मोहीम त्यानें जलदी संपवून तींत यश मिळविलें, व **रूम** शहरांतील लोकांस दुष्काळाचे संकटापासून मुक्त केलें, ह्यामुळें त्याची मोठी चलती झाली, तेणेंकरून त्याचे मनांत **मिथ्रिदेतस** राजा-

शीं युद्ध करण्याचा अधिकार मिळविण्याविषयीं मोठा हेतु होता, तो सिद्धीस नेण्यास त्र्यास वाट झाली. **सरतोर्यस स्पार्तेकस**, व समुद्रांतील लुटारू लोक ह्यांचा पराभव झाल्यावर **मिथ्रिदेतस** राजाशिवाय दुसरा कोणीही शत्रु जिंकावयाचा राहिला नव्हता.

**सिला** व **मिथ्रिदेतस** ह्यांच्यामध्यें **क्रिस्ताचे** पूर्वी ८९ वे वर्षी तह झाला, त्या दिवसापासून आजपर्यंत **एशिया** खंडांत जें काय वर्तमान घडलें, तें आतां लिहितों. **मिथ्रिदेतस** राजाचें दैव चांगलें नव्हतें, ह्मणून तो तह कागदोपत्रीं लिहिला गेला नव्हता; सबब **सिलाचे** मागून त्या लढाईचे कामावर **मुरेना** नामें सरदार झाला, त्यास पुढें एक दोन वर्षांनीं त्या राजावर हल्ला करण्यास निमित्त सांपडलें; परंतु **मिथ्रिदेतस** राजानें **रूम** शहरास फिर्याद केली, तेव्हां **सिलानें मुरेना** ह्यास तें काम न करण्याविषयीं निक्षून हुकूम पाठविल्यावरून त्यास ती मोहीम सोडून देणें प्राप्त झालें. कारण ह्या वेळेस **सिलाच्या** सारखी चलती **रूम** शहरांत दुसरी कोणाची नव्हती. सहरहू मोहिमीस **मिथ्रिदेतस** राजाचें दुसरें युद्ध असें ह्मटलें आहे. **क्रिस्ताचे** पूर्वी ह्मणजे **सिला** मृत्यु पावल्यावर दोन वर्षांनीं **मिथिनिया** देशचा राजा मृत्यु पावला. त्यानें मरते वेळेस आपला देश **रोमन** लोकांस दिला. हा देश एके अंगास **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याचे हद्दीस भिडला होता; आणि दुसरे अंगास **मिथ्रिदेतस** राजाचे राज्यास लागला होता. **मिथ्रिदेतस** राजाचे मनांत तो देश घेण्याचें फार दिवस होतें, ह्मणून त्या राजानें आपला देश **रोमन** लोकांस दिला, ही गोष्ट त्यानें मान्य न करून पुष्कळ फौज व

लढाऊ जहाजें तयार करून त्या देशावर तरीनें व खुषकीनें हल्ला केला. **लुकलस** हा त्या वर्षी कान्सल होता, तो सरदारीचे कामांत चांगला होता; पण अत्यंत उधळ्या होता. त्यानें अयोग्य उपाय योजून युद्धाचा अधिकार आपणाकडे करून घेतला; कारण त्या युद्धांत पुष्कळ पैसा मिळण्याची आशा होती. त्याच्या फौजेपेक्षां **मिथ्रिदेतस** राजाची फौज फारच जास्त होती; परंतु बहुत दिवसपर्यंत तो **मिथ्रिदेतस** राजाचा एकसारखा मोडच करीत गेला. **मिथ्रिदेतस** राजानें **एशिया** खंडांत **सिझिकं** नांवाच्या एका मोठ्या प्रख्यात शहरास वेढा घातला; परंतु **लुकलसानें** त्या राजाची फौज सुमारें ३०००० मारून त्यास त्या शहराचा वेढा काढणें प्राप्त केलें. नंतर कांहीं दिवसांनीं त्या राजाचे गलबतांचा पराभव करून त्यास **बिथिनिया** देशांतून हाकून लाविलें. मग तो **मिथ्रिदेतस** राजाचे पाठीस त्याचे मुलुखांतून लागला, आणि जरी **मिथ्रिदेतसानें तार्तरी** देशाचे रानांतून **रोमन** लोकांशीं लढाई करण्याकरितां पुष्कळ फौज जमा केली होती तरी **लुकलस** ह्यानें त्याचा पराभव करून त्यास त्याचा जावई **तिग्रेनस** ह्मणून **आर्मिनिया** देशचा राजा होता, त्याचे दरबाराचा आश्रय करणें प्राप्त पाडलें. ही गोष्ट **क्रिस्ताचे** पूर्वी ७१ वे वर्षी झाली.

**तिग्रेनस** राजाला काडीचेंही ज्ञान नव्हतें; परंतु तो त्या वेळेस **एशिया** खंडांत मोठा जबरदस्त राजा होऊन राहिला होता; त्यास वारसदारीनें **आर्मिनिया** देशचें लहानसें राज्य प्राप्त झाल्यावर त्यानें तें वाढविण्याचें मनांत आणून **मिसापोतेमिया** देश सर केला. आणि **अरबस्थान**

आपले ताब्यांत आणून **पाम** देशचे लोकांस आश्रय दिला. हे मुलूख त्या राजानें फारशा आपल्या बाहुबलेंकरून जिंकिले असें नाहीं, तर ह्या मुलखांचे लोकच भितरे होते. हे मुलूख **तिग्रेनसा** सारख्या राजाचे अंकित झाले, तेव्हां त्या मुलखांमध्यें किती दुर्बलता होती, हें वाचणाऱ्यांच्या सहज ध्यानांत येईल. ह्या जयेंकरून **तिग्रेनस** हा अत्यंत गर्वानें फुगून तो आपणास राजाधिराजा असें ह्मणवूं लागला. ह्यास्तव जेव्हां **रोमन** लोकांचे सरदारानें **मिथ्रिदेतस** राजास आमचे स्वाधीन करून द्या, ह्मणून **तिग्रेनस** राजास खडसून निरोप पाठविला; तेव्हां तो, निरोप ऐकून फार क्षुब्ध झाला. कारण २५ वर्षांत असें अभिमानाचें भाषण त्याच्या कानीं कधीं पडलें नव्हतें. मग तो शांतता धरून बोलला, कीं मी आपले सासऱ्यास कधींही अंतर देणार नाहीं, आणि लागलाच त्यानें लढाईचे तयारीस आरंभ केला. नंतर **रोमन** लोकांची व **आर्मेनियन** लोकांची **तिग्रेनोसर्ता** शहराजवळ लढाई झाली. हें शहर **तिग्रेन** ह्यानें आपले राज्याची नवी राजधानी केलें होतें, आणि त्या शहरास विस्तृत करण्यास व सुशोभित करण्यास त्यानें पुष्कळ परिश्रम केले होते. त्या लढाईंत **रोमन** लोकांचा सरदार **लुकलस** ह्याची फौज फक्त १३००० होती; व **तिग्रेनस** राजाची २६०००० होती. इतका सैन्याचा फरक असतां शत्रूंशीं लढाई केली, ही गोष्ट फार अविचाराची केली ह्मणून **लुकलस** ह्यास **रोमन** लोकांनीं दोष लाविला; परंतु त्यास शत्रूची दुर्बलता व भितरेपणा माहीत होता, व लढाया मारून मारून घटलेल्या आपल्या शिपायांचे सामर्थ्याची खातरजमा होती, सबब त्यानें त्या

खोगिर गणतीचे फौजेशीं निर्भयपणें लढाई केली; त्या लढाईंत **लुकलस** ह्याचा जय झाला. तींत शत्रूकडील एक लाख पायदळ पडलें, व अश्वदल सर्व मेलें. हा जय **रोमन** लोकांनीं इतक्या सुलभतेनें मिळविला, कीं अशा फुसक्या शत्रूंवर तरवारी उपसल्या बद्दल **रोमन** लोकांस लाज वाटली. ही गोष्ट **क्रिस्ताचे** पूर्वी ६९ वे वर्षी झाली. दुसऱ्या वर्षी **लुकलस** ह्यानें **आर्तेजाता** शहराजवळ त्या फुशारखोर राजाचा पुनः पराजय केला, तेणेंकरून त्याचे गर्वाचा पुर्तेपणीं परिहार झाला.

पण जयाचें पारडें लवकरच फिरलें. **लुकलसानें** आजपर्यंत ज्या ज्या स्वाऱ्या केल्या, त्या सर्वांत त्याचा जयच झाला. ह्यापुढें त्याचा रणभूमींत पराजय झाला नाहीं खरा, परंतु पाऊल मागें मागें पडत चाललें. त्याची फौज त्यावर नाखुष होऊन, तिनें वारंवार बैदे केले. **मिथ्रिदेतस** राजा हा सर्वकाळ उद्योगी व सावध असे. त्यानें ही संधि साधून जितका त्याचा मुलूख **लुकलसानें** घेतला होता, त्यांपैकीं बहुतकरून सर्व त्यानें परत घेतला. **लुकलसाची** फौज त्याशीं बदललेली होती, ह्यामुळें त्याच्यानें **मिथ्रिदेतस** राजास हरकत करण्यास कांहीं उपाय करवला नाहीं. इकडे **रूम** शहरांत, **लुकलस** ह्याच्या विरुद्ध पक्षाचे लोकांचें प्राबल्य होऊन त्यांनीं त्याकडून लढाईचा अधिकार काढून **पांपी** ह्यास द्यावा असा सामान्य लोकांकडून ठराव करून घेतला. तेव्हां **पांपी** हा **क्रिस्ताचे** पूर्वी ६७ वे वर्षी **लुकलस** ह्याचे फौजेचा सरदार झाला. नंतर त्यानें एके वर्षानें **मिथ्रिदेतस** राजाचा एका रात्रीस **युफ्रेतीस** नदीचे काठीं पराभव करून त्यास फक्त ८०० मनुष्यांनिशीं

पळून जाणें प्राप्त केलें. ह्या संकटसमयीं, त्या राजानें आपला जावई **तिग्रेनस** ह्यापाशीं आश्रय मागितला; परंतु त्यानीच राजानें **रोमन** लोकांचे भयामुळें आपले सासऱ्यास आश्रय न देतां उलटें, जो मनुष्य त्याचें डोकें कापून आणील त्यास बक्षीस मिळेल, असें प्रसिद्ध केलें. ह्याप्रमाणें **मिथ्रिदेतस** राजास संकटसमयीं त्याच्या जावयानें दगा दिला, व जरी त्याचें वय ७० वर्षांहूनही अधिक होतें, तरी त्यानें धैर्य न सोडितां **तारस** डोंगरापासून **आल्प्स** पर्वतापर्यंत जे प्रदेश होते त्यांतील पाहाडी लोकांस जमा करण्याचा व पूर्वी **कार्थेजिनियन** लोकांचा सरदार **हानिबल** ह्यानें ज्याप्रमाणें केलें होतें त्याप्रमाणेंच **इतली** देशाचे मैदानांत अकस्मात् उतरून **रूम** शहराचे दरवाज्यापर्यंत मुलूख उद्ध्वस्त करण्याचा निश्चय केला; परंतु त्याचा पुत्र **फ्रातीरज** हा त्यास सोडून **रोमन** लोकांस जाऊन मिळाला, ह्यामुळें त्याचे सर्व बेत विसकळीत होऊन त्याची निराशा झाली; आणि तो **रोमन** लोकांचे हातांत पडण्यापेक्षां मरणें बेहेत्तर, असें मनांत आणून **क्रिस्ता** शकाचे पूर्वी ६३ वे वर्षी विष खाऊन मेला. तो नेहेमीं आपणाजवळ विष बाळगीत असे. ह्याप्रमाणें **मिथ्रिदेतस** राजाचा परिणाम वाईट झाला. ह्या राजासारखा भयंकर शत्रु **रोमन** लोकांस सुमारें दीडशें वर्षांमध्यें कोणीही भेटला नव्हता. त्याचें बुद्धिकौशल्य व हिम्मत हीं विलक्षण होतीं. ह्याविषयीं असें एक प्रमाण आहे, कीं तो आपले भरभरींत २० देशांवर अमल करीत असतां त्या देशांतील लोकांशीं त्यांच्या त्यांच्या भाषेनें भाषण करीत असे; परंतु त्याचे क्रूर कर्मांनीं त्याच्या लौकिकाची हानि झाली होती.

ह्याप्रमाणें **पांपीनें** **मिथ्रिदेतस** राजास जिंकून **एशिया** खंडांतील मुलखांची व्यवस्था लाविली. ती अशी, कीं **आर्मिनिया बुजुर्ग** देश **तिग्रेनस** राजाकडे दिला, **क्यापादोशिया** देश **आर्योबारजेनिस** राजाचे माथीं मारला, **बास्परस** हा देश **फरनासेस** राजास दिला, **जुदिशिया** देश जिंकून **हिरक्यानस** ह्यास दिला, आणि **षाम** व **फिनिशिया पांपस** व **पाफ्लेगोनिया** व **सिलिसिया** व **पांफिलिया** ह्या देशांचे सुभे करून **रूमचे** राज्यास जोडिले. **रूमचें** लोकसत्तात्मक राज्य ह्या प्रसंगीं विजातीय वाढलें. सातशें वर्षांपूर्वी **राम्युलसानें** कांहीं लुटारू लोक जमवून **तैबर** नदीचे कांठीं आबडधोबड झोंपड्या बांधून एक गांव वसविलें, आणि त्याचें **रूम** असें नांव ठेविलें. तें गांव वाढत वाढत कालक्रमेंकरून बलाढ्य शहर होऊन त्याचें स्वामित्व बहुतकरून पृथ्वीवर पसरलें.

ह्याप्रमाणें **पांपीनें** वर लिहिलेले मुलखांची व्यवस्था करून **इतली** देशास परत येण्याची तयारी केली. **सिला** ह्यानें **मिथ्रिदेतस** राजापासून जय मिळविल्यावर **इतली** देशांत आपले फौजेनिशीं उतरून **रूम** शहरचे लोकांची जी दुर्दशा केली होती तिचा सभासद लोकांस विसर पडला नव्हता, ह्यामुळें **पांपीचीही** स्थिति **सिलासारिखीच** आहे, तेव्हां नजाणो तोही त्याप्रमाणेंच वागेल असा त्यांस अंदेशा आला, पण **पांपी** ह्यानें **इतलींत** पाऊल ठेवतांच आपली सर्व फौज दूर करून सभासद लोकांच्या भयाचें निवारण केलें. नंतर सर्व लोकांनीं त्यास शहरांतून मिरवत नेऊन त्याची मोठी प्रतिष्ठा केली. त्यानें २००००

तालेन्त ह्मणजे चार कोट रुपये सरकारी जामदारखान्यांत दिले.

सदरीं लिहिल्याप्रमाणें **पांपी** हा पूर्व दिशेस गुंतला असतां **रूम** शहरांत, **क्यातेलैनानें रूमचे** राज्याची मालकी मिळविण्यासाठीं मसलत केली होती, ती बाहेर फुटली. तो मनुष्य उत्तम कुळांतला होता; पण फारच बदफैली होता, आणि त्यानें आपला सर्व पैसा उधळून टाकला होता. त्यानें **सिला** सरदाराचा कित्ता पाहून त्याप्रमाणें आपणही जबरदस्तीनें **रूमचे** राज्याचे मालक व्हावें, असें मनांत आणिलें; परंतु **रूमचे** दरबारांत **सिसरो** ह्मणून एक उत्कृष्ट वक्ता होता. तो त्या वर्षीं कान्सल होता, त्यानें **क्यातेलैन** व त्याचे मसलतींतील दुसरे लोक ह्यांचे बेताचा शोध लाविला. तेव्हां त्या लोकांची निराशा होऊन, त्यांनीं **सीसरो** ह्यास मारून टाकण्याचा व **रूम** शहरास आग लावण्याचा बेत केला. परंतु **सिसरोनें** चमत्कारिक हिकमत लढविल्यामुळें **क्यातेलैनास** त्यानें **रूम** शहरापासून थोडक्याच अंतरावर फौज जमा केली होती, तिला जाऊन मिळावें लागलें. नंतर त्याचे मसलतदार धरले जाऊन त्यांस देहांत शिक्षा मिळाली, व **क्यातेलैन** ह्यावर जी फौज पाठविली होती, तिशीं त्याची लढाई होऊन तींत तो पडला.

ह्या वेळेस ह्मणजे **क्रिस्ताचे** पूर्वीं ६३ वे वर्षीं **रूमचे** राज्यरचनेचें मूलस्वरूप तसेंच राहिलेलें होतें खरें; परंतु त्यांत कांहीं जीव राहिला नव्हता. कारण **रूमचे** राज्याचा संपूर्ण अधिकार, **रूमचे** कांहीं मुख्य मुख्य लोकांनीं आपसांत वांटून घेतला होता. ह्या वेळेस **रूम** शहरांत नामांकित असे पांच जण होते, त्यांचीं नावें बितपशील.

१ **पांपी** २ **क्रासस** ३ **सिसरो** ४ **सीजर** आणि ५ **केटो.** **पांपी** हा नेहमीं जय मिळवून व सामान्य लोकांचें आर्जव राखून **रूमचे** लोकसत्तात्मक राज्यांत मुख्य होऊन राहिला होता. **सीजर** हा नामांकित कुळांत उत्पन्न झाला होता. त्या वेळेस त्यासारखा योद्धा असा दुसरा सरदार नव्हता; त्याची बुद्धि सर्वोत्कृष्ट होती, आणि तो सर्व गोष्टींत मोठा चतुर व हुशार होता. तो अमर्याद महत्वाकांक्षेनें वारंवार असें ह्मणत असे, कीं मला खेडेगांवांत मुख्य असणें पुरवेल; पण **रूम** शहरांत कडेलोट असणें पुरवणार नाहीं. **क्रासस** हा कितीएक स्वाऱ्यांमध्यें जय मिळवून नांवलौकिकास आला होता; पण त्या वेळेस त्यासारखा धनाढ्य व धनलोभी असा कोणी नव्हता, ह्यामुळें तो विशेष प्रसिद्धीस आला, व ज्या लोकांस आपले पदरचा पैशाचा खर्च करून फौज ठेवण्याचें सामर्थ्य आहे तेच मातबर होत, असें तो मानीत असे. **केटो** हा स्वभावानें मोठा कडक होता. **रूम** शहरच्या पूर्वावस्थेमध्यें बलाढ्य लोकांपैकीं एक दोन मनुष्यांचे इच्छेप्रमाणें राज्यकारभार चालत नसे, तर सामान्य लोक व **सिनेट** सभा ह्यांच्या विचारानें चालत असे; त्यास त्या अवस्थेस **रूम** शहरास आणावयाचें त्याच्या मनांत होतें; पण त्याचा मनोरथ सिद्धीस गेला नाहीं. **सिसरो** हा पुरा वक्ता होता व राज्य कारणामध्यें फारच कुशल होता; पण त्याचे अंगीं धैर्य अगदीं नव्हतें. सदरहू पांच मनुष्यांवर **रूमचे** संपूर्ण राज्यांतील लोकांचे डोळे लागले होते, व राज्याचें बरें वाईट होणें त्यांच्या वर्तणुकेवर होतें.

ह्या पांच पुरुषांमध्यें **सीजर** हा मोठा अक्कलवान हो-

ता. त्याचीं नेमणूक **लुसितेनियाचे** सुभ्यावर झाली, तेव्हां तेथें त्यानें पुष्कळ पैसा मिळवून आपलें कर्ज वारलें. तो **रूम** शहर सोडून **लुसितेनिया** येथें गेला त्या वेळेस त्याला इतकें कर्ज होतें, कीं लाखों रुपये त्या वेळेस त्याजवळ असते, तरी त्यांनीं त्याचे कर्जाचें कांहीं झालें नसतें. त्यानें **रूम** शहरांत परत आल्यावर कान्सलाचा अधिकार मिळविला, आणि **पांपी** व **क्रासस** ह्या उभयतांशीं परस्परांनीं एकमेकांचें हित साधावें, ह्मणून गुप्त कट करून आपले अधिकाराचा पाया घालूं लागला. ह्या जुटास पहिलें त्रिकूट असें ह्मटलें आहे. त्या त्रिवर्गांमध्यें वर लिहिल्याप्रमाणें ठराव झाल्यावर **सीजर** ह्याची पांच वर्षेंपर्यंत **गाल** देशाचे सुभ्यावर नेमणूक झाली. त्या सुभ्यांत सांप्रत काळचे **स्वित्जर्लंद** व **फ्रान्स** हे दोन्ही देश होते, व त्यांपैकीं थोडा मुलूख त्या वेळेपर्यंत **रोमन** लोकांनीं जिंकिला होता. ह्या सुभेदारीचे कामावर आण्याचे पूर्वीं तो व त्याचे सोबती ह्यांनीं **क्लाद्यस** ह्याशीं मिळून **सिसरो** व **केटो** ह्या दोघांस **रूम** शहरांतून काढून दिलें. **क्लाद्यसाचें** राज्यामध्यें मोठें वजन होतें; पण तो वाईट चालीचा मनुष्य होता. **केटो** ह्यास **सैप्रस** बेट काबीज करण्याकरितां पाठविलें, व **सिसरो** ह्यास हद्दीपार केलें; परंतु **क्लाद्यस** ह्यानें जुलूम मांडल्यामुळें शहरांत गडबड होऊन गेली. तेव्हां **पांपी** ह्यास एके वर्षानंतर **सिसरो** ह्याचे परत येण्याविषयीं ठराव करणें प्राप्त झालें. **सिसरो क्रिस्ताचे** पूर्वीं ५७ वे वर्षीं परत आला.

**सीजर** ह्यानें **क्रिस्ताचे** पूर्वीं ५८ वे वर्षापासून ५० वे वर्षापर्यंत ह्मणजे सुमारें ८,९ वर्षें **गाल** देशांत युद्ध चाल-

वून तो संपूर्ण देश सर होई तोंपर्यंत तो परत आला नाहीं. त्यानें ज्या स्वाऱ्या केल्या, त्यांचा त्यानें आपणच वृत्तांत लिहून ठेविला आहे. त्याची धाटी प्रौढ असून सुलभ आहे; तेणेंकरून त्या स्वाऱ्यांचें वर्णन फारच मनोरंजक झालें आहे. हल्लीं ज्या देशास **स्वित्झर्लंद** असें ह्मणतात, त्या देशांतील मुळचे रहाणाऱ्या लोकांशीं प्रथमतः **सीजर** ह्यानें लढाई केली आणि त्यांस अगदीं जिंकून टाकिलें. ह्यानंतर तो **गाल** देश जिंकीत चालला, आणि जातां जातां शेवटीं तो पश्चिमसमुद्रास जाऊन पोहोंचला. सदरहू समुद्राचे कांठावर पूर्वी **रूमचा** कोणीही सरदार गेला नव्हता. **क्रिस्ताचे** पूर्वी ५७ वे वर्षी **सीजर** ह्यानें **बेल्गी** लोकांपासून मोठा जय मिळवून दुसऱ्या वर्षी **अक्किटानी** लोकांचा पराभव केला; आणि तिसरे वर्षी ह्मणजे **क्रिस्ताचे** पूर्वी ५५ वे वर्षी तेथून थोडक्याच कोसांचे अंतरावर एक बेट आहे असें वर्तमान ऐकून तो त्यास गेला. त्या बेटातील लोक अज्ञानावस्थेंत होते; त्यांस नांगर कसा चालवावा हें माहीत नव्हतें; व लिहिण्याचेंही ज्ञान नव्हतें; पण ते लोक फारच शूर होते. सदरहू बेट **ब्रितन** होय. हें बेट **रोमन** लोकांस, तेथें **सीजरानें** स्वारी करण्याच्या पूर्वी ऐकून सुद्धां माहीत नव्हतें. ह्या बेटांत पहिले वर्षी **सीजरानें** नुसता हल्ला मात्र केला. दुसरे वर्षी ह्मणजे **क्रिस्ताचे** पूर्वी ५४ वे वर्षी तो मागल्यापेक्षां अधिक फौज घेऊन त्या बेटांत उतरून **लंडन** शहरपर्यंत जिंकीत गेला; परंतु त्या बेटांत त्यानें जो थोडासा मुलूख घेतला होता त्याच्या रक्षणार्थ कांहीं फौज न ठेवितां **गाल** देशास परत आला. **क्रिस्ताचे** पूर्वी ५४,५३ वे वर्षी तो आपली विजयी फौज

घेऊन **जर्मनी** देशांत गेला. तो देश त्यानें बहुधा सर केलाच असता, परंतु त्याच्या पाठीमागें **गाल** लोकांनीं पुनः पुनः दंगे केले, ह्यामुळें तो तसाच राहिला. विद्या व कला ह्यांचा मुख्यत्वेंकरून ज्या देशामध्यें हल्लीं प्रसार झाला आहे; व ज्या देशांतील लोक पृथ्वीवरील इतर देशचे लोकांवर हल्लीं अम्मल करीत आहेत, त्या देशांमध्यें **रोमन** लोकांची फौज **सीजरच** प्रथम घेऊन गेला, हें वाचणाऱ्यांच्या लक्षांत येईलच. आतां कसे दिवस बदले आहेत हें बघा! **सीजराचे** वेळेस **इतली** देशाप्रमाणें विद्याचारसंपन्न असा पृथ्वीवर दुसरा देश नव्हता. त्यांतील लोक पृथ्वीचें एकछत्र राज्य करीत होते, आणि **गाल**, **जर्मनी** व **ब्रितन**, हे देश त्या काळीं अज्ञान अवस्थेंत होते. त्यांतील लोकांस कोणतीही कला माहीत नव्हती व विद्या अगदीं नव्हती; पण १८०० शें वर्षांत ह्या देशाचे लोकांनीं अज्ञान समुद्रांतून बाहेर निघून **युरोप** खंडाचा वरिष्ठपणा भूगोलाचे इतर भागांत स्थापिला; आणि त्यांनीं शास्त्रें व कला अशा उत्कृष्ट अवस्थेस आणिल्या आहेत, कीं **सीजराचे** वेळेस **रोमन** लोक ज्ञानानें त्या लोकांपेक्षां जितके वरिष्ठ होते, तितके वरिष्ठ हल्लीं ते लोक **सीजराच्या** वेळच्या **रोमन** लोकांपेक्षां होऊन राहिले आहेत. हल्लीं **रूमचें** पूर्वीचें ऐश्वर्य नाहीसें होऊन गेलें आहे; आणि **युरोपामध्यें** दुसऱ्या प्रतीचीं जीं राज्यें आहेत, त्यांमध्यें **इतलीची** गणना होत आहे.

ह्याप्रमाणें **सीजर गाल** देशांत गुंतला असतां त्यानें आपलें वजन **रूम** शहरांत आपले पक्षाच्या लोकांचे योगानें राखण्यास उपेक्षा केली नाहीं, व हा **गाल** देशामध्यें

जयावर जय मिळवीत चालला, ह्यामुळें रूमचे नागरिक अगदीं चकीत होऊन गेले, आणि ह्या गोष्टीनें त्याचें वजन शहरांत पुष्कळच वाढलें; ह्मणून क्रासस व पांपी ह्यांच्या मनामध्यें, सिजराविषयीं थोडासा मत्सर उत्पन्न झाला; पण इतक्यांत देशांत लुका शहरीं क्रासस, पांपी व सीजर हे तिघे एकत्र जमले होते, त्यामुळें तो मत्सर कांहीं वर्षेंपर्यंत दबून राहिला होता; परंतु अगदीं नाहींसा झाला नाहीं. त्यांनीं त्या वेळेस नवी व्यवस्था केली. ती अशी, कीं सीजर ह्यानें आणखी पांच वर्षेंपर्यंत गाल देशचा सुभा संभाळावा; व पांपी व क्रासस ह्या उभयतांनीं कान्सलांचे कामावर राहून, पांपी ह्यानें स्पेन व आफ्रिका हे सुभे संभाळावे, व क्रासस ह्यानें एशिया संभाळावी, आणि पार्थियन लोकांवर स्वारी करावी. तिकडे पुष्कळ पैसा मिळेल, असें क्राससास वाटत होतें. फार वाढलेल्या अशा एक दोन नागरिकांच्या हातीं राज्य कारभार निरंतर राहूं नये, ह्मणून केटो ह्याच्या मनांत फार असे, तेव्हां त्यानें पांपी व क्रासस ह्यांस कान्सलांचीं कामें मिळूं नये ह्मणून पुष्कळ अडथळा केला; पण त्यांस तीं कामें मिळालीं. नंतर कांहीं दिवसांनीं क्रासस ह्यानें पदरच्या पैशाचा खर्च करून पार्थियन लोकांवर स्वारी केली; परंतु युफ्रेतिस नदी उतरल्यावर कान्हीं शहराजवळ पार्थियन लोकांचा सेनापति सुरेना हा त्यास भेटला. सुरेनानें क्राससाचा पराभव करून त्याचें डोकें कापून क्राससाच्या अतिशय लोभाची निर्भत्सना करण्याकरितां त्या डोक्यांत शिसें ओतलें. ही गोष्ट किस्ताचे पूर्वीं ५३ वे वर्षीं झाली.

पांपी हा रूम शहरांत राहिला होता. त्यानें आपले

सुभ्याचा अमल आपले नायबाकडून चालविला होता. **क्रासस** ह्याचे मरणानें त्याचा एक प्रतिस्पर्धी नाहींसा झाला. त्याचे मनांत आपणास सर्वांनीं **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याचा व **सिनेट** सभेचा मुख्य ह्मणावें असें होतें; ह्मणून **पांपीनें**, कान्सलाच्या दोन जागांपैकीं एक जागा बुडवून टाकण्याविषयीं व एक राहील तीवर आपणास नेमून घेण्याविषयीं प्रयत्न चालविला. नंतर आठ महिने पर्यंत मोठमोठे तंटेबखेडे होऊन शेवटीं **पांपीचा** उद्देश सिद्धीस गेला. **पांपी** व **सीजर** ह्यांच्यामध्यें पुढें मागें बिघाड झाला असता; पण **पांपीनें** मुख्य अधिकार मिळविण्याविषयीं अशा तजवीजी चालविल्यामुळें त्यांच्यामध्यें लवकर बिघाड झाला. **पांपी** ह्यास प्रतिस्पर्ध्याचें सहन होत नव्हतें, व **सीजर** ह्यास आपणापेक्षां वरिष्ठाचें सहन होत नव्हतें. ह्यामुळें **गाल** देशाचा जिंकणारा जो **सीजर**, ज्याचे आज्ञेंत लढाईमध्यें पुरें वाकबगार असें सैन्य होतें, तो ह्मणजे **पांपीस** लढाया केल्यावांचून **रूमचे** राज्याचा मुख्य होऊं देईल, असें नव्हतेंच; ह्मणून **पांपी** व **सीजर** ह्यांच्यामध्यें युद्ध खचितच होणार, असें एव्हांपासून दिसूं लागलें. **पांपीकडे** बहुतकरून सर्व सभासद लोक व **रूम** शहरांतील थोर थोर लोक होते; ह्मणून त्यानें आपला जय होईलच होईल, असा भरवसा बाळगून **सीजरासारखे** जबरदस्त शत्रूशीं लढाई करावयाची होती ह्मणून जी त्यानें पूर्वीं सावधगिरी ठेवावयाची ती ठेवण्याविषयीं उपेक्षा केली.

मी **रूम** शहरांत नसतांही कान्सलाचे अधिकाराविषयीं अर्ज करण्यास मला परवानगी द्यावी, ह्मणून **सीजरानें** **सिनेट** सभेस विनंती केली; तेव्हां त्यास परवानगी

देणें ही गोष्ट कायद्याविरुद्ध होती, तथापि सभेनें परवानगी दिली असती; पण तिनें त्यास जमीनदोस्त करण्याचा निश्चय केला होता, ह्मणून त्याची विनंती मान्य न करितां, त्याला आपली सर्व फौज दूर करून **रूम** शहरास परत येण्याविषयीं हुकूम पाठविला. तो हुकूम **सीजर** ह्यानें मानिला असता, तर तो **पांपीचे** हातीं पडता; परंतु त्यानें असा जबाब पाठविला, कीं **पांपी** ह्यानें आपली फौज दूर केल्याशिवाय मी आपली फौज दूर करणार नाहीं. **सीजर** व **पांपी** ह्यांचा सला व्हावा ह्मणून कोणीं कोणीं मध्यस्थी केली; पण ती सिद्धीस गेली नाहीं. कारण त्या उभयतांचें मन एकमेकाविषयीं तिळमात्र शुद्ध नव्हतें. इतक्यांत **सीजर** हा आपले फौजेनिशीं मुळच्या **इतली** देशाचे सर हद्दीवर **आर्मिनिया** शहर होतें, तेथें येऊन ठेपला; परंतु तो पुढे आला नाहीं; कारण ती हद्द फौजेनिशीं उल्लंघून यावयास **रूमचे** हरएक सरदारास **सिनेट** सभेची परवानगी लागत असे. इकडे सभासद लोकांनीं **पांपी** ह्याचे भरीवर असा ठराव केला, कीं **सीजरानें** अमुक मुदतीचे आंत आपली फौज बरतरफ न केली, तर तो सरकारचा शत्रु मानला जाईल. सदरहू ठरावानें उभयपक्षांमध्यें तोडजोड होण्याची अगदीं आशा राहिली नाहीं; आणि **सीजर** ह्यास तें ठरावपत्र पोहंचतांच तो **रूबिकान** ह्मणून एक लहानसा ओढा होता तो उतरून आलीकडे आला, आणि आपसांतील युद्ध सुरू झालें.

**सीजर** हा आपल्या फौजेनिशीं जवळ येऊन पोहोंचला हें वर्तमान **रूम** शहरांत समजतांच, **पांपी** व सभासद लोकांपैकीं बहुतेक लोक इतक्यां त्वरेनें दक्षिण दिशेस निघून

गेले, कीं सरकारी सर्व पैसा जामदारखान्यांत तसाच राहिला. तो पुढें **सीजराचे** हातीं लागून त्याचे मोठे कामास आला. **पांपी** अशी बढाई मारीत असे, कीं जमिनीवर पाय मात्र मारला पुरे, ह्मणजे तात्काल माझ्या रक्षणाकरितां **इतलीमध्यें** सैन्य उभें राहील. ह्यापैकीं कांहींच न घडतां, **सीजरानें** एका दिवसामध्यें संपूर्ण **इतली** देश आपल्या अमलांत आणिला. इकडे **पांपी** ह्यास एका ठाण्याहून दुसऱ्या ठाण्यास हटत जाणें प्राप्त पडून शेवटीं जहाजांत बसून **ग्रीस** देशास जाणें प्राप्त पडलें. **पांपी** ह्याच्या स्वारींत **केटो** व **सीसरो** हे होते. **पांपी** ह्यांचा काय तो जोर त्याच्या **स्पेन** देशांतील फौजेवर आहे, असें **सीजर** ह्याच्या मनांत पक्कें येऊन **पांपी** ह्याचा पाठलाग करण्यापेक्षां त्या फौजेचा पराभव करणें हें काम विशेष जरूरीचें आहे; असें जाणून तो लागलाच **स्पेन** देशास गेला, आणि त्यानें, तो देश जाण्या दुर्घट होता, तथापि लढाईपर्यंत मजल न येऊं देतां **पांपी** ह्याचे **नायब** सरदारांस फौज सोडून देणें प्राप्त केलें. नंतर तो तेथून कूच करून विजातीय त्वरेनें **गाल** देशामधून जाऊन **आल्प्स** पर्वत वलांडून **इतली** देशांतून **ब्रंदूसियं** बंदरास आला; नंतर तेथें जाहाजांत बसून **ग्रीस** देशास तो गेला; तेथें **पांपीनें एशियें**तील सर्व देशांतील पुष्कळ फौज जमा केली होती. **सीजराचे** फौजेपेक्षां **पांपीची** फौज पुष्कळ असतांही **पांपीनें** आपल्या ज्या आकलेनें व चपलतेनें आजपर्यंत मोठमोठ्या प्रसंगीं जय मिळविले, ती त्याची अकल व चपलता हीं ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं गेलीं असें दिसतें. **सीजर** ह्याची फौज कमी होती खरी, पण तींतील लोक, **पांपीच्या** सैन्यांतील

लोकांपेक्षां अधिक शूर होते, व तो जातीनें त्या फौजेचा जीवच होता. **क्रिस्ताचे** पूर्वी ४८वे वर्षी जुलै महिन्याचे २० वे तारिखेस **थेसली** देशचे मैदानांत **फर्सालिया** शहराजवळ उभयतां प्रतिस्पर्धी सरदारांची लढाई सुरू झाली. तिचे अंतीं **पांपीचा** अगदीं पराभव होऊन त्यास पळून जाणें प्राप्त पडलें. त्यानें आपलें उदय काळीं **मिश्र** देशचे राजाचे घराण्याचीं मोठमोठालीं कामें केलीं होतीं, सबब तेथें आश्रय मिळेल, अशी आशा धरून, तो एक दोन चाकरांनीशीं त्या देशास गेला; परंतु **मिश्र** देशचे प्रधानानें विजयी सरदाराची कृपा मिळेल, ह्या आशेनें, पाजीपणानें **पांपीस** मारवून त्याचें प्रेत समुद्राचे कांठीं उघडें टाकून देवविलें. तेथें त्यास **रूमचे** एका वृद्ध शिपायानें मुठमाती दिली. **सीझरानें** त्वरेनें **पांपीचा** पाठलाग केला; पण तो, **पांपीचा** वध झाल्यावर, तीन दिवसांनीं **मिश्र** देशास पोहोंचला. त्याचा मोठा प्रतिस्पर्धी जो **पांपी** ह्याचें डोकें त्यापुढें आणिलें, तेव्हां तें पाहून त्या उदार विजयी पुरुषास रडें कोसळलें. **फर्सालियाचे** लढाइनें **पांपीचे** तर्फेचे लोक अगदीं नाहींसे झाले नाहींत; परंतु **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याचे भाग्याचा निर्णय होऊन **रोमन** लोकांचा स्वतंत्रपणा नष्ट झाला, तो त्यांस पुढें कधींही प्राप्त झाला नाहीं.

**सीझर** हा ९ महिनेपर्यंत **मिश्र** देशांत राहिला, ह्याचें कारण असें झालें, कीं त्या देशाची राणी **क्लिपोपेत्रा** हिचे सौंदर्यानें तो भुलला होता, व तिच्या भावाशीं युद्ध करण्यांत गुंतला होता; **क्लिपोपेत्रेचा** भाऊ लवकरच लढाईंत मेला गेला, तेव्हां **सीझरानें** **मिश्र** देशाचें संपूर्ण राज्य

त्याचे बापानें समुद्रांतील ज्या लुटारू लोकांस जिंकलें ते जसे **रूम** शहरास जें धान्य येई तें मारीत असत त्याप्रमाणें त्यानें मांडलें, आणि समुद्रकिनारा अगदीं वेढून टाकिला. ह्यामुळें **रूम** शहरांत धान्याचा दुष्काळ पडला. तेव्हां **आक्तेव्यस** वगैरे सरदार हे **सेक्तस** ह्याशीं तह करण्यास राजी होते; परंतु **सेक्तस** ह्याचे ध्यानांत लवकरच आलें, कीं आपण त्या जबरदस्त त्रिकुटांशीं तह केला तर शेवटीं आपला नाश होईल. त्यावरून त्यानें लढाई करण्याचा निश्चय केला. तें ऐकून **अंतनी** ह्यानें आपल्या वाल्याचीं लढाऊ जहाजें पाठवून दिलीं. त्याप्रमाणेंच **लेपिदस** ह्यानेंही पाठवून दिलीं. ह्यां एकत्र जमलेले फौजेनें **सेक्तस** ह्यावर चोहोंकडून एकदम हल्ला करून त्याचा पराभव केला. तेव्हां तो **एशाया** खंडांत पळून जाऊन तेथेंच मरण पावला.

**सेक्तस** हा मरण पावल्यानें **सिसिली** बेटास कोणी मालिक नाहींसा झाला. सबब तें बेट स्वाधीन करून घेण्याविषयीं **लेपिदस** ह्यास इच्छा प्राप्त झाली; परंतु **आक्तेव्यस** ह्यानें त्याची फौज आपणाकडे फितवून त्यास फिकें पाडिलें. ह्याप्रमाणें त्रिकूटांतील एक सरदार नाहींसा होतांच राज्याधिकार **अंतनी** व **आक्तेव्यस** ह्यांनीं आपसांत वांटून घेतला. ते उभयतां सरदार एकमेकांशीं लवकरच बिघडतील असें पूर्वीच दिसून आलें होतें. **अंतनी** ह्यानें **आक्तेव्यस** ह्याची बहीण सद्गुणी **आक्तेविया** हिशीं विवाह केला होता; परंतु तो एशिया खंडांतून परत आल्यावर **मिश्र** देशास **गेक्रस्ताचे** पूर्वी देशची राणी **क्लियोपेत्रा** हिचे सौंदर्यानें **सीजरास** तहा

र्ते ज्यास्त झालीं आणि आगस्तसाकडील सरदारांपेक्षां ब्रूतसकडचे सरदारही विशेष युद्धकुशल होते. आक्तेव्यस व त्याचे सोबती हे आपआपल्या फौजांनिशीं जहाजांत बसून ग्रीस देशांत गेल्यावर त्याशीं व ब्रुतस वगैरे सरदारांशीं मासिदोनीया देशांत फिलिपि शहराजवळ एक लढाई झाली, तींत आक्तेव्यस वगैरे सरदारांची फौज त्यांचे शत्रूंचे फौजेपेक्षां कमी होती, तथापि त्यांनीं शत्रूंचा अगदीं पराभव केला. ब्रूतस व केशस हे रूमचे दैवाविषयीं निराश होऊन त्यांनीं आपल्याच हातांनीं आपला वध करून घेतला. तें पाहून त्यांबरोबर बहुत उत्तम कुळांतील व लौकिकवान् लोक होते, त्यांनींही आपले सरदारांचे पाठीमागें जीव ठेवणें हें धिःकारास्पद आहे असें समजून आपल्याच हातांनीं आपला वध करून घेतला. ही लढाई क्रिस्ताचे पूर्वीं ४२ व्या वर्षीं झाली; आणि ही लढाई रूमचें राज्य पुनः लोकसत्तात्मक करण्याबद्दल ज्या ज्या लढाया झाल्या त्यांतील शेवटची होय.

फिलिपिची लढाई झाल्यापासून अकशंची लढाई होई तोंपर्यंत बारा वर्षें गुजरलीं. हीं वर्षें ज्या सरदारांनीं रूमचे राज्याचा मुख्य अधिकार आपणांकडेसच करून घेतला होता त्यांचे कलहामध्यें गेलीं. त्या सरदारांमध्यें आक्तेव्यस हा मोठा शाहाणा होता, ह्मणून शेवटीं त्यानें अंतनी ह्यास जिंकिलें. ह्या काळचे इतिहासांत [illegible] हासल नाहीं. ब्रूतस ह्याचा सोबती सेक्सस
चे सौंदय।
ह्या त्रिकूटाशीं टकर देऊन आपला बचाव
ण्यांत गुंतला होता. त्याचा अमल समुद्रावर होता.
ईस मेला गेला,

त्या राणीस दिलें. नंतर तो तेथून कूच करून, **एशिया मैनरांत मिथ्रिदतस** राजाचे एका पुत्रानें बंड केलें होतें, त्यावर गेला. तेव्हां **मिथ्रिदतसचे** मुलाचा पराजय होऊन तो रणांत पडला. ह्या प्रसंगीं **सीजरास** जय इतक्या सुलभतेनें प्राप्त झाला, कीं त्यानें ह्या स्वारीचें वर्तमान **सिनेट** सभेस लिहून पाठविलें, त्यांत **विनि, विडि, विसि,** ह्मणजे आलों, पाहिलें, जिंकिलें हे तीन शब्द मात्र लिहिले होते. **सीजर रूम** शहरास परत आला; परंतु **पांपी** ह्याचे तर्फेचे राहिलेले सरदार **आफ्रिका** खंडांत फौजा जमा करीत होते, सबब **सीजर** ह्यास त्या सरदारांवर स्वारी करणें प्राप्त पडलें. त्या स्वारींत त्याचा नेहमीं प्रमाणेंच जय झाला. ह्या प्रसंगीं **पांपीकडच्या** लोकांच्या सैन्याचा अधिपति **केटो** होता, त्याची आपल्या पक्षाविषयीं निराशा होऊन त्यानें **अतिका** शहरांत आपल्याच हातानें आपला वध करून घेतला. नंतर दुसरे सरदार **सिपियो, जूबा,** व **पित्र्यस** ह्यांनींही त्याप्रमाणेंच केलें. **सीजर** हा विजयी होऊन **रूम** शहरास परत आल्यावर त्यास फक्त चारच महिने विश्रांती सांपडली. **पांपीचे** दोघां पुत्रांनीं आपल्या पक्षाचे लोकांचा पराजय झाल्यामुळें, त्यांचें सैन्य चोहोंकडे पसरलें होतें, तें **स्पेन** देशांत जमा केलें. तेव्हां **सिजरास** त्यांचें भय वाटून तो तिळमात्र विलंब न लावितां **स्पेन** देशास गेला. नंतर **मंडा** शहराजवळ एक मोठी लढाई होऊन उभयतां भावांपैकीं एक भाऊ पडला, व त्यांच्या फौजेचा अगदीं मोड झाला. नंतर विजयी सरदार **रूमचे** राज्याचा कुलमालिक होऊन **क्रिस्ताचे** पूर्वी ४५ वे वर्षी **रूम शहरास** आला. नंतर **सीजरास** तहा

यात दिकेतर नेमिलें. **रूमचे** राज्याचा सर्व अमल हल्लीं **सीजराकडे** आला होता, आणि त्याचा स्वभाव **सिला** सारखा असता, तर त्याला ही संधि आपल्या शत्रूंचा सूड उगविण्यास चांगली होती, पण तो स्वभावानें शांत व कृपाळू होता, आणि त्यानें आपले शत्रूंपैकीं कोणा एकास न छळितां आपले अंतकालपर्यंत हरएक प्रसंगीं मनाचा अतिशय थोरपणाच दाखविला. त्यास अधिकार मिळाला होता तो त्यानें **इतर्ली** देशास बहुत दिवसपर्यंत आपसांत लढाई चालल्यानें ज्या विपत्ति प्राप्त झाल्या, त्या दूर करण्याकडे लावला. त्यानें लोकोपयोगी असे फारच मोठमोठाले बेत मनांत आणिले होते; पण त्यांपैकीं पंचांग सुधारण्याचा बेत मात्र त्याच्या देखतां सिद्धीस गेला. ह्या काळीं **रूमचे** राज्यांत लोकसत्तात्मक राज्याच्या सर्व व्यवस्था नष्ट होऊन गेल्या होत्या, व त्या राखण्याविषयीं आवश्यक जे सद्गुण त्यांचा मागमूस सुद्धां राहिला नव्हता. ह्याकरितां अशा स्थितींत **सीजरा** सारख्या पराक्रमी व योग्य अशा एका मनुष्याचे हातांत राज्याचा कारभार पडला ही गोष्ट मोठ्या भाग्याचीच झाली; परंतु तो **रूम** शहरांत पुरता एक वर्षभर सुद्धां राहिला नाहीं, तोंच ज्या मनुष्यांचे जीव ह्याचे दयेकरून वांचले होते, व ज्यांस दवलती त्याचेच मेहरबानगीनें मिळाल्या होत्या, त्याच मनुष्यांनीं त्याचा प्राण घेण्याविषयीं मसलत करून **क्रिस्ताचे** पूर्वीं ४४ वे वर्षीं त्यास **सिनेट** सभेंत कटारीनें मारून टाकिलें. ह्या मसलतींतील मुख्य **ब्रूतस** व **केशस** हे होते. ह्यांचे देशाभिमानास आह्मास मान देणें प्राप्त आहे; पण **रूमचें** राज्य चालविण्याजोगा असा हा एकटाच सर-

**दार** होता, तो नाहींसा झाला त्याबद्दल आह्मास हळहळ वाटते.

**सीज़र** मृत्यु पावल्यावर **रूमचे** राज्यकारभारांत फारच घोटाळा पडला. त्या संधीस **सीज़र** ह्याचा मित्र **मार्क अंतनी** ह्यानें मुख्य राज्याधिकार मिळविण्यास रस्ता खुला आहे, असें •बघून तो मिळविण्याविषयीं यत्न केला. हा मनुष्य **सीज़रा** सारखा दक्ष व सद्गुणी नव्हता. **अंतनीचा** हाडवैरी जो **सीसरो** ह्यानें सभासद लोकांकडे मिळून **सीज़र** ह्याचा पुतण्या **आक्तेव्यस** हा त्या वेळेस २२ वर्षांचे वयाचा होता त्यास, **अंतोनीच्या** विरुद्ध उभें केलें. तेव्हां **अंतनीला आल्प्स** पर्वताच्या पार निघून जाणें प्राप्त झालें; परंतु त्यानें लवकरच **आक्तव्यसास** सभासद लोकांचे पक्षांतून फोडलें. आणि **लेपिदस** ह्यास आपले मिलाफास घेऊन जसें पूर्वीं **सीज़र, पांपी** व **क्रासस** ह्या त्रिवर्गांनीं त्रिकूट केलें होतें त्याप्रमाणेंच त्रिकूट करण्याची तजवीज केली. **बालोग्ना** शहराजवळ एक नदी वाहात होती, तिचे दोन ओघ झाल्यामुळें मध्यें एक लहानसें बेट झालें होतें, त्यांत त्रिवर्गांनीं जमून आपले शत्रूंस मारून टाकण्याविषयीं व आपला अधिकार दृढ करण्याविषयीं कट केला, आणि सभासद लोक व सामान्य लोक ह्यांपैकीं कोणाचेंही संमत न घेतां त्यांनीं आपणांस **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याचे पांच वर्षेपर्यंत मुख्य अधिकारी असें प्रगट करून राज्याचे सुभे आप्सांत वाटून घेतलें, व लोकसत्तात्मक राज्यास पूर्वस्थितीवर आणण्याच्या इच्छेनें ज्यांनीं **सीज़रास** मारलें असे जे **ब्रूतस, केशस,** व दुसरे अणखी लोक त्यांस मारण्याचा ठराव

केला. शेवटीं ते आपले खासगत शत्रू निवडावयास लागले. त्यानीं ३०० सभासद २००० नैट व शहरांतील मोठमोठाले नामांकित असे हजारों लोक ह्यांस मारण्याविषयीं ठराव केला. ह्या प्रसंगीं आक्टेव्यस ह्यानें आपला मित्र जो प्रख्यात वक्ता व राज्यकारभारी सिसरो ह्यास सोडिलें. कारण अंतनी ह्यास त्यावर आपला सूड उगवावयाचा होता. मग त्यानें सिसरोचे मागें मारेकरी लाविले. त्या मारेकऱ्यांनीं त्याचें शीर कापून अंतनीची बायको फलविया हिला आणून दिलें, तेव्हां त्या निसवलेले स्त्रीला, तें बघून फार आनंद झाला. सिसरोनें तिच्या दुराचरणाचें वर्णन करून तिची विटंबना केली होती, ह्याकरितां तिनें त्याचे जिभेस दाभणानें टोंचून त्याचें शीर रूमचे न्यायसभेंतील वक्त्याचे स्थानावर लावण्याविषयीं हुकूम दिला. ह्या वेळेस शिलाचे दिवस पुनः प्राप्त होऊन इतली देशांत रूम शहरांतील मोठमोठ्या लोकांच्या रक्ताच्या नद्या वाहिल्या.

सदरहू त्रिकुटांतील सरदारांनीं आपले खासगत शत्रूंपैकीं जे जे त्यांचे हातीं लागले त्या सर्वांस मारून ब्रूतस व केशस व त्यांचे मिलाफी ह्यांचा पिच्छा पुरविण्याचा निश्चय केला. त्या लोकांचे स्वाधीन पूर्वेकडील मुलूख होता, त्यामुळें त्यांतील उत्पन्नावर त्यांनीं पुष्कळ फौज ठेविली. पांपी ह्याचा एक पुत्र मंडाचे लढाईंत जीवंत सुटला होता, त्यानें आजपर्यंत स्पेन देश सिसली व सार्डीनिया हीं आपले ताब्यांत आणलीं. तोही ब्रूतस व केशस ह्यांकडे येऊन मिळाला, त्यामुळें आगला, तेथें त्या सोबती ह्यांच्यापेक्षां ब्रूतस व केशस ह्यांस मोहित होऊन

तिजबरोबर अतिशय विलास करूं लागला आणि त्याच वेळेस त्यानें आपले लग्नाची स्त्री **आक्तेविया** हिचा घटस्फोट केला. तेणेंकरून त्याचा मेहवणा **आक्तेव्यस** ह्यास संताप प्राप्त होऊन त्याची व **अंतनीची** लढाई लवकरच उपस्थित झाली. **आक्तेव्यस** हा आपल्या हिताकरितां **अंतनी** ह्याशीं लढाई करीत असतां त्यानें **सिनेट** सभा व सामान्य लोक ह्यांचे मनांत असें आणून दिलें, कीं **रूमचें** राज्य **मिश्र** देशाचे राणीचे आधीन होऊं देऊं नये ह्मणून मी तुमचे तर्फेनें **अंतनी** ह्याशीं लढाई करीत आहें. त्याचीं व **अंतनी** ह्याचीं लढाऊ जहाजें **ग्रीस** देशांत **अकशं** शहराजवळ लढाईस आलीं. **अंतनी** ह्याचीं जहाजें फारच होतीं, ह्मणून त्यानें आपले मनांत आपलाच जय होईल, असें मानिलें असावें; परंतु लढाई होत असतां **क्लियोपेत्रा** ही आपले जहाजांनिशीं पळून गेली. नंतर **अंतनी** हाही त्याप्रमाणेंच पळून गेला, तेव्हां त्याचीं सर्व जहाजें पळूं लागलीं. **अंतनी** हा **मिश्र** देशास पळून गेला, तेथें **आक्तेव्यस** ह्यानें त्याचा पाठलाग केला. नंतर **अंतनी** ह्यानें **क्लियोपेत्रा** ही मारली गेली, अशी कंडी ऐकतांच आपले तरवारीनें आपलाच वध करून घेतला. **मिश्र** देशची राणी **क्लियोपेत्रा** हिनें **आक्तेव्यस** ह्याचा चुलता **सीजर** व **अंतनी** ह्या उभयतांस आपले सौंदर्यानें मोहीत केलें होतें, त्याप्रमाणें **आक्तेव्यस** ह्यास मोहित करण्याकरितां तिनें युक्तिप्रयुक्ति केल्या; पण तीस **आक्तेव्यस** बधला नाहीं. तिला जिवंत राखून **रूम** शहरांत आपल्या विजयसमारंभाचे वेळेस लोकांस दाखवावी, असें त्याचे मनांत होतें; पण हें तिला कळलें, तेव्हां **टालमी** घरा-

ण्यांतील काय ती मी राहिली आहे, त्यास ह्याप्रमाणें आपली बेआब्रू करून घेणें हें बराबर नाहीं असें तिनें मनांत आणून ती वीष खाऊन मेली. ह्याप्रमाणें शिकंदर बादशाहा मृत्यु पावल्यावर २७५ वर्षांनीं **मिश्र** देशचें राज्य **रूमचे** राज्याचा एक सुभा झालें.

**क्रिस्ताचे** पूर्वीं २९ वे वर्षीं ह्मणजे **रूम** शहर बांधल्यापासून ७२४ वर्षांनीं आजपर्यंत त्रिब्यून व कान्सल ह्यांकडे जो अधिकार होता तो सर्व **आगस्तस** त्यास मिळाला, आणि त्यानें "**आगस्तस सीजर**" ह्या नांवाचें धारण केलें. त्या वर्षापासून **रूमचें** राज्य अगदीं नष्ट होई तोंपर्यंत तें एकेकाच पुरुषाचे हातीं होतें. त्यास बादशाहा असें ह्मणत. **आगस्तस** ह्यानें ४४ वर्षें राज्य केलें.

**आगस्तस सीजर** ह्याचे राज्याचे २९ वे वर्षी **जेनसचे** देवालयाचीं कपाटें दुसऱ्या वेळेस बंद झालीं. ह्या वेळेस पृथ्वीवरील विज्ञात देशांपैकीं बहुतेक देश **रूमचे** राज्याखालीं आले होते, आणि त्या सर्वांमध्यें स्वास्थ्य होऊन गेलें होतें. ह्या वेळेस **जीजस क्रैस्त** जन्मला. **रूमचे** राज्याची ह्यापुढील हकीगत पुढले भागांत लिहूं.

**समाप्त.**

## कार्थेज व सिसिली यांविषयीं.

साइरेक्युज ह्मणजे सिसिलि बेटाची राजधानी, इचा पाया—जिलो नामें राजा—कार्थेजिनिअन् लोकांची सिसिली बेटावरील स्वारी—त्याचा पराभव—सिसिली बेटांतील लोक सत्तात्मक राज्याची स्थापना—साइरेक्यूज शहरचा वरिष्ठपणा—कार्थेजिनिअन् लोकांचो सिसिली बेटावरील दुसरी स्वारी—डाइओनिसिअस नामें जुलमी राजा—कार्थेजिनिअन् लोकांचा पराभव—आफ्रिका खंडांतील गुलाम लोकांचो लढाई—कार्थेजिनिअन् लोकांचो सिसिली बेटावरील तिसरी स्वारी—कारिंथ देशाची साइरेक्यूज शहरचे लोकास कुमक—टिमोलियन् नामें सिसिली बेटचे राजाचा मुख्य अधिकारी—या सर्वांविषयींचें वर्णन पुढें लिहितों.

**कार्थेज** शहरची उत्पत्ति व वृद्धि याविषयींचा वृत्तांत मागील काळांत लिहिला आहे. हल्लीं ज्या काळाचें वर्णन करावयाचें त्यांतील इतिहास हाच आहे कीं, त्या लोकांनीं **सिसिली** बेट जिंकण्याकरितां सक्त मेहनत चालविली होती व ह्याप्रमाणेंच **साइरेक्यूज** नामें **सिसिली** बेटांतील मुख्य शहर याचा उत्कर्ष होऊन त्यांतील राहाणाऱ्यांनींही तोच विचार केला होता. यामुळें उभयतां राष्ट्रांमध्यें द्वेषयुक्त लढाई उत्पन्न झाली तींत अनुक्रमानें उभयतांचा कितीक वेळां जय पराजय होऊन शेवटीं दोन्ही राज्यें **रूमचे** जबरदस्त राज्यांत मिळालीं. यास्तव ह्या काळाचे इतिहासांत **कार्थेजिनिअन्** व **सिसिलियन्** लोकांचे लढाईचे एक मोठें आख्यान आहे ह्मणून उभयतां राजांचा इतिहास नीट रीतीनें एकांत एक मिळालेला याप्रमाणें वर्णिला जाईल.

**साइरेक्यूज** शहराचा पाया क्रिस्ताचे पूर्वी ७३५ वे वर्षी **कारिंथ** देशचे लोकांनीं घातला. आणि त्यांत लोकसत्तात्मक राज्याधिकार स्थापून ते लोक दिवसानुदिवस अधिकार व लौकिक यांचे संपादन करूं लागले.

याप्रमाणें त्यांचा त्या शहरांत अर्डीचशें वर्षेंपर्यंत अम्मल राहिला. परंतु क्रिस्ताचे पूर्वी ४८४ वे वर्षी त्या शहरचे राज्यांत आपसांत तंटे होऊन जे लोक पराभव पावले होते त्यांणीं त्या शहराजवळ **जिलोन** नामें दुसरें शहर होतें त्यांतील **जिलो** नामें राजास कुमकेविषयीं अर्जी पाठविली. (ती मान्य करून) त्याणें बरोबर जबरदस्त फौज घेऊन **साइरेक्यूज** शहरास जाऊन जे लोक त्यांतून काढून दिले होते त्यांची स्थापना केली, परंतु राज्याधिकार आपलेच हातांत ठेविला. हा राजा फार थोर होता, व जरी त्याणें सातच वर्षें राज्य केलें तरी त्या अवकाशांत बाहेरून नवे लोक बोलावून शहरची वस्ति वाढविली, आणि परोपकारानें लोकांचीं अंतःकरणें जिंकून नंतर आपले पराक्रमानें तें शहर **सिसिली** बेटांतील इतर शहरांपेक्षां जोरावार केलें. यास्तव तो राजा **साइरेक्यूज** शहरचें महत्व वाढविणारा असें ह्मणावयास योग्य आहे.

पूर्वी आह्मी एका भागांत लिहिलें आहे त्याप्रमाणें जेव्हां **जरक्शीज** नामें **पारस** देशचा राजा याणें **ग्रीक** लोकांस निर्मूळ करण्याचा विचार केला, त्यावेळेस त्याणें **कार्थेजिनिअन्** लोकांस **ग्रीक** लोकांचा **सिसिली** बेट व **इटली** देश यांतील मुलुख जिंकण्याविषयीं लिहून पाठविलें होतें. हा बेत त्या राष्ट्राचे बेताप्रमाणेंच होता ह्मणून त्यांणीं कबूल करून दोन हजार लढाऊ जाहाजांचा समुदाय तयार करून दुसरे तीन हजार उतारू जाहाजांवर तीन लाख फौज बसवून तिवर **हिमिल्को** नामें सरदार नेमून तीं सर्व जाहाजें **सिसिली** बेटांस पाठवून दिलीं. तीं

तेथें दाखल होतांच **हिमिल्को** याणें सर्व फौजेनशीं खुष-कीवर उतरून **हिमेरा** नामक शहरास वेढा घातला. हें वर्तमान **जिलो** नामक राजास समजतांच तो पन्नास हजार पायदळ व पांच हजार स्वार इतक्या फौजेनिशीं त्या शहराचें रक्षण करावयास गेला. त्या संधीस वाटेनें एक जासूद **सिलिनस** शहराहून **कार्थेजिनिअन** लोकांचे लष्करांत जात होता, त्यास **जिलो** याणें धरून आणवून त्याजपाशीं जे कागद होते ते पाहिले. त्यांत असें लिहिलें होतें कीं, अमुक दिवशीं या शहरांतून **कार्थेजिअन** लोकांचे कुमकेस अमुक स्वार पाठविले जातील. त्याप्रमाणें **जिलो** याणें त्या नेमलेले दिवशीं तितकेच स्वार आपले फौजेंतून काढून आपले शत्रु ह्मणजे **कार्थेजिनिअन** लोक यांचे लष्करांत पाठविलें. त्या लोकांस दग्याविषयीं कांहीं अंदेशा न येतां त्यांणीं त्या स्वारांस मित्रांचे स्वार ह्मणून लष्करांत येण्यास परवानगी दिली. त्या स्वारांचा आंत प्रवेश होतांच त्यांणीं **हिमिल्को** यावर हल्ला करून त्यास मारून टाकून त्याचे जाहाजांस आग लावून दिली. ह्या संधीस **जिलो** याणें आपले मुख्य फौजेनिशीं जाऊन **कार्थेजिनिअन** लोकांचे फौजेवर एकदम हल्ला केला. तथापि त्यांणीं हिम्मत धरून कांहीं वेळपर्यंत मोठें दुर्घट युद्ध केलें. परंतु त्यांचा सरदार मारला गेला व जाहाजांस आग लागली हें पाहून ते हवलदिल होऊन पळून गेले. ह्या लढाईंत **साइरेक्युजन्** लोकांनीं शत्रुची बहुत फौज मारिली. तिची संख्या इतकी सांगितली आहे कीं, दीड लाख मनुष्य रणभूमींत पडलीं, बाकी राहिलेले लोक अशा ठिकाणीं पळून गेले

कीं, तेथें अन्नपाणी मिळणें कठीण होतें यास्तव त्यांस शेवटीं **जिलो** याचे स्वाधीन होणें प्राप्त झालें. ज्या दिवशीं तिकडे **थर्मापिली** नामक घाटींत **ग्रीक** लोक व व **पारसी** लोक यांमध्यें नामांकित लढाई झाली, त्याच दिवशीं इकडेही लढाई झाली, व येणेंकरून कांहीं वर्षेंपर्यंत **कार्थेजिनिअन्** लोकांस **सिसिली** बेट जिंकण्याविषयीं अगदीं उमेद नाहींशी झाली.

ह्या थोर पराभवाचें व नाशाचें वर्तमान **कार्थेजिनिअन्** लोकांस समजतांच त्या लोकांनीं निराश होऊन ज्या रीतीनें तहनामा होईल त्या रीतीनें करावा ह्मणून वकिलांस हुकूम देऊन **जिलो** याजकडे पाठविलें. तो राजा जसा लढाईंत शूर त्याप्रमाणेंच यश प्राप्तीनें तृप्त राहत असे ह्मणून त्याणें त्या वकिलांचें बोलणें कबूल करून फक्त त्याजपासून चाळीस लाख रुपये दंड घेऊन तहनाम्यांत आपले तर्फेनें इतकेंच ज्यास्ती कलम लिहून ठरवून घेतलें कीं **कार्थेजिनिअन्** लोकांनीं आज दिवसापासून शनीस मुलाचा बळी देऊं नये.

ह्या मोहिमेंत **कार्थेजिनिअन** लोकांस यश प्राप्त झालें नाहीं यामुळें त्यांणीं सत्तर वर्षेंपर्यंत **सिसिली** बेटावर पुनः स्वारी करण्याविषयीं अगदीं उद्योग केला नाहीं. सदरहु सत्तर वर्षांमध्यें **साइरेक्यूज** शहरांत ज्या ज्या विशेष गोष्टी झाल्या त्या पुढें सांगतों. **कार्थेजिनिअन** लोकांचा पराभव झाल्यावर **साइरेक्युजचे** राहाणाऱ्यांनीं **जिलो** यास राज्याभिषेक केला. नंतर त्याणें राज्याधिकार अनुक्रमानें आपले दोन भावांस दिला, परंतु त्यांतून धाकट्यास लोकांनीं जुलमी ठरवून क्रिस्ताचे पूर्वीं ४६६ वे

वर्षी मुलुखांतून काढून दिलें. नंतर त्या बेटांतील सर्व शहरामध्यें पहिलेप्रमाणें लोकसत्तात्मक राज्याधिकाराची स्थापना झाली. त्यामुळें लोक जोरावर झाले, परंतु त्यांचे मनांत थोर पदवी मिळविण्याविषयीं अशी ईर्षा प्राप्त झाली कीं, त्यांतील सर्व शहरें **सिसिली** बेटाचें प्रभुत्व मिळविण्याबद्दल आपसांत लढाया करूं लागलीं. त्या लढाया बहुत दिवसपर्यंत चालल्या. नंतर शेवटीं **साइरेक्यूज** शहरचे लोक **अग्रिजेन्टम्** शहर जिंकून संपूर्ण **सिसिली** बेटाचे निष्कंटक अधिकारी होऊन इतर शहरावर जुलूम करूं लागले. यास्तव **लिओन्टाईन्स** लोक त्याशीं उलटून पडून लढाई करावयास प्रवृत्त झाले. त्या लोकांचे कुमकेकरितां **आथेन्स** शहरचे लोकांनीं **ग्रीस** देशांतून **साइरेक्यूज** शहरावर एक स्वारी केली, ती फार प्रसिद्ध होती. परंतु तींत **आथेन्स** शहरचे लोकांचा पराभव होऊन त्यांचा **ग्रीस** देशांतील अधिकार नष्ट झाला. याप्रमाणें **साइरेक्यूज** शहरचा क्रिस्ताचे पूर्वी ४१३ वे वर्षी अति उत्कर्ष झाला, नंतर त्या बेटांतील दुसरे दोन शहरांमध्यें कलह उत्पन्न होऊन त्यांपेकीं एका शहरचे लोकांनीं **कार्थेज** शहरास कुमक मागावयास पाठविलें. त्या शहरचे दरबारांत **सिसली** बेटावर पुनः स्वारी करावी किंवा न करावी याविषयीं वादविवाद होऊन, एकपक्षीं तें संपन्न बेट काबीज करण्याची **कार्थेजिनिअन** लोकांस बहुत दिवसापासून फिकिर होती, यास्तव स्वारी करावी असें ठरलें. परंतु **साइरेक्यूज** शहरचे लोकांनीं नुकतीच **आथेन्स** शहरची फौज मारून टाकून आपला अधिकार वाढविला होता, त्या-

गुन दुसरेपक्षीं असें ठरलें कीं स्वारी करूं नये. शेवटीं उभयपक्षीं स्वारी करण्याचा बेत ठरून लोकांनीं हिमिल्को नामें जो सरदार जिलो राजा याचे हातून मारला गेला होता, त्याचाच नातू हानिबल् याजबरोबर पुष्कळ फौज देऊन व मोठा जाहाजांचा समुदाय देऊन सिसली बेटावर पाठविला. त्याणें लिलिबियम् नामें बंदरांत उतरून हिमेरा व सिलिनस या नांवाचे बंदरास वेढे घालून तीं हस्तगत करून घेतलीं. नंतर त्यांत मोठमोठालीं अनुचित कर्मे करून तो आफ्रिका खंडांत परत गेला. •ह्या लढाईत त्या सरदारास यश प्राप्त झाल्यामुळें कार्थेजिनिअन लोक जयमत्त होऊन त्यांणीं तीन वर्षांनीं त्यापेक्षां अणखी मोठे स्वारीची तयारी करून तिजवर हिमिल्को नामें सरदार नेमिला. त्याणें सिसिली बेटांत उतरून अग्रिजेंटम् नामें जें शहर त्या बेटांत दुसरे प्रतीचें असून दवलत व वस्ती व मोठमोठ्या इमारती यांमुळें प्रख्यात होतें त्यास वेढा घातला. परंतु आठ महिनेपर्यंत त्या शहरास धका लागला नाहीं कारण कीं सिसिलियन लोकांनीं शत्रूशीं संग्राम करण्याकरितां त्या जाग्यांत आपली संपूर्ण फौज जमा केली होती. तथापि त्या शहरांत दाणापाणी नाहींसें झाल्यावर त्या लोकांनीं मोठी विपत्ति भोगून शेवटीं एका रात्रीं शहर सोडलें, आणि वृद्ध व जखमी यांस तेथें तसेंच टाकून आपण निघून गेले. दुसरे दिवशीं हिमिल्को याणें शहरांत प्रवेश करून ज्या दैवहीन लोकांस आपले जातभावांबरोबर बाहेर निघून जावयास सामर्थ्य नव्हतें त्या बिचाऱ्यांस मारून टाकून तें शहर लुटून फस्त करण्याकरितां आपले जंगी

लोकांस परवानगी दिली. त्या शहराच्या नाश झाल्यानें संपूर्ण सिसिली बेटांतील लोक भयाभीत होऊन कार्थेजिनिअन लोकांशीं संग्राम करावयास फौज जमा होणें अशक्य झालें, तेव्हां डाईओनिसिअस नामें नांवाच्या ज्या पुरुषानें नुकताच लोकसत्तात्मक राज्याधिकार नष्ट करून आपण आपले मर्जीप्रमाणें या बेटांत राज्यकारभार चालविला होता, त्याणें कार्थेजिनिअन् लोकांशीं तहनामा करून जितका मुलुख त्यांणीं जिंकिला होता तितका त्यांस सोडून दिला. नंतर हिमिल्को हा आनंद करीत स्वदेशास परत गेला. परंतु तेथें पाहतो तों जरीमरी उठून इतकी हानि झाली होती कीं, बाहेरचे यशःप्राप्तीपासून जो लाभ झाला होता तो त्या हानीपेक्षां फारच कमी होता.

इकडे सिसिली बेटांत असें वर्तमान झालें कीं डाइओनिसिअस राजा साइरेक्यूज शहरचा कुल अखत्यार झाला असतां त्याणें संपूर्ण सिसिली बेट जिंकण्याची उमेद धरून फक्त आपणास कार्थेजिनिअन लोकांशीं शेवटचे लढाईची तयारी करावयास फुरसत मिळावी ह्मणून त्याणें हा तहनामा केला होता. त्याणें हात्यारें घडविण्याकरितां इटली व ग्रीस ह्या दोन्हीं देशांतून कारागीर बोलावून आणून साइरेक्यूज शहरांत मोठा कारखाना चालू केला. त्यांत रात्रंदिवस घणाचे ठोक्यांचा आवाज होत असे. तो राजा स्वतांच तेथें हजर राहून त्यांकडून काम करवून त्यांस इनामें देत असे. लढाईची सर्व तयारी होतांच त्याणें संपूर्ण राष्ट्राची सभा करून कार्थेजिनिअन लोक ह्मणजे ग्रीक लोकांचे चिरकाळचे शत्रू

यांविषयीं त्यांचे मनांत वैमनस्य उत्पन्न करून शत्रूंस मारण्याविषयीं सर्व लोकांस उपदेश केला. त्याप्रमाणें साइरेक्यूजचे लोकांनीं जे जे कार्थेजिनिअन् लोक तहनामा झाल्यामुळें मनांत कांहीं अंदेशा न बाळगतां बिनधोक त्या देशांत घरें बांधून राहिले होते, त्यांजवर दौड करून त्या सर्वांस मारून टाकिलें. हें वर्तमान ऐकून इतर शहरचें लोकांनींही त्याप्रमाणेंच केलें. याप्रमाणें डाईओनिसिअस याणें जे जे कार्थेजिनिअन् लोक दैवयोगानें त्या प्रसंगास सिसिली बेटांत होते त्या सर्वांस दगाबाजीनें मारून सिसिली बेटांतील शहरांच्या सोडचिठ्या मागण्याकरितां कार्थेज शहरास वकील पाठविले. परंतु उत्तराची वाट पाहाणें हें त्यास योग्य न वाटून त्याणें मोटिया नामक शत्रूचा सर्वांहून मोठा शिलेहखाना ज्यांत लढाईचें सर्व सामान होतें, त्यास वेढा घालून हस्तगत करून त्यांतील राहाणारे लोकांस मारून टाकिलें. दुसरे वर्षी कार्थेजिनिअन् लोकांनीं अणखी तीन लाख फौज उभी करून तीवर हिमिल्को या सरदारास नेमून तो सिसिली बेटावर पाठविला. त्याणें केवळ आपला शिलेहखानाच शत्रूपासून परत घेतला असें नाहीं, परंतु त्या बेटांतील सर्व शहरेंही घेऊन खुद्द साइरेक्यूज शहरास वेढा घातला. आणि त्यास शेवटचे यशःप्राप्तीविषयीं असा भरंवसा होता कीं, त्याणें तीस दिवसांत आसपासचे मुलखाची धुळधाणी करून ज्या जुन्या इमारती शहराच्या बाहेर बांधिल्या होत्या व ज्यांहींकरून शहरास शोभा होती, त्या सर्व जमीनदोस्त करून टाकिल्या. परंतु ही मनांत योजिलेली आनंददायक गोष्ट घडून न येतां अशा विपरीत

गोष्टी घडल्या कीं, त्याचे लष्करांत मरीमरी आली व उन्हाळ्याचा ऊष्माही तिला सामील झाला, यामुळें त्या लष्करांतील बहुत लोक नाश पावून शेवटीं असें झालें कीं, मरीचे भयानें दुखणेकरी याजवळ जावयास कोणासही धैर्य होईना, यास्तव मुर्द्यास मूठमाती न मिळतां ते तसेच जमीनीवर पडूं लागले. याप्रमाणें **कार्थेजिनियन्** लोकांची दुर्दशा झाली. तों इतक्यांत **डाईओनिसिअस** याणें त्याजवर हल्ला केला. त्याजबरोबर शत्रूचा नाश करण्याकरितां **साइरेक्यूज** शहरचे सर्व लोक आले होते. परंतु संग्राम करावयास **कार्थेजिनिअन** लोकांचा सेनापति **हिमिल्को** यास अगदीं सामर्थ्य राहिलें नव्हतें. ह्मणून त्याणें परत जाण्याविषयीं परवानगी मागितली. परंतु **डाइओनिसिअस** याणें फक्त आपले स्वजातीय लोकांस घेऊन परत जाण्यास रुकार दिला. त्याप्रमाणें **हिमिल्को** याणें रात्रीस कोणास न कळवितां निघून जाऊन **आफ्रिका** खंडांतील मदतगार लोकांस तेथेंच सोडून दिल्हें. त्या लोकांविषयीं **साइरेक्यूज़चे** लोकांनीं मनांत अगदीं दया न आणितां त्यांस मारून टाकिलें. इकडे **हिमिल्को** हा **कार्थेज** शहरास सुखरूप पोहोंचला, परंतु त्याचे हातून स्वदेशाचा दुर्लौकिक झाला होता, त्यामुळें त्याचे मनास पश्चात्ताप होऊन त्याणें आपणास घरांत कोंडून घेऊन स्वहस्तें आपला नाश केला.

तथापि **कार्थेजिनिअन** लोकांचीं संकटें इतक्यांतच संपलीं असें नाहीं. **आफ्रिका** खंडांतील ज्या लोकांस त्यांणीं जिंकिलें होतें ते लोक त्यांचे ताबेदारीपासन मक्त

होण्यास फार दिवसांपासून उतावळे झाले होते. हल्लीं त्यांचे जातभावांस हिमिल्को याणें सिसिली बेटांत निराश्रित सोडून दिल्यामुळें त्या संतापाचें त्यांस सहन न होऊन दोन लक्ष लोक कार्थेज शहरावर चढून जाऊन त्यांणीं त्या शहरास जमीनदोस्त करण्याचा निश्चय केला. परंतु कार्थेजिनिअन् लोकांचें नशीब चांगलें होतें ह्मणून त्यांस कांहीं तोशीस लागली नाहीं. कारण कीं ह्या दोन लाख फौजेस कोणी सरदार नव्हता व त्या समुदायांत दुष्काळ पडून ते लोक आपोआप नाहींसे झाले. ह्या संकटापासून पार पडल्यावर कार्थेजिनिअन् लोकांनीं पुनः सिसिली बेट घेण्याचा इरादा करून मागो नामें सरदार यास मोठे फौजेनिशीं त्या बेटावर पाठविलें. परंतु त्याचा तेथें पराभव होऊन तो मारला गेला. त्याचे मागून जो सरदार झाला त्याणें बेटांतून निघून जातों व लढाईचा खर्च भरून देतों असा करार करून तहनामा केला, परंतु त्याजवर सही करावयाचे वेळेस त्याणें असा उजुर केला कीं, मालकाचा हुकूम थोडेच दिवसांत यावयाचा आहे तो आल्याखेरीज आह्मास शहरें सोडून देतां येत नाहीं. याप्रमाणें निमित्त सांगून जी मुदत त्यास मिळाली होती ती तहनाम्याचा विचार करण्यांतच केवळ घालविली असें नाहीं. परंतु लढाईची तयारीही झाली. कार्थेज शहरांतून धाकटा मागो या नामें एक सरदार फौजेनिशीं त्या बेटास मोठ्या शिताबीनें मदतीकरितां येऊन पोहोंचला. त्याणें पूर्वीचें झालेलें बोलणें नाकबूल करून साइरक्यूजचे लोकांचा एके नेमलेले लढाईत पराभव करून आपले मर्जीप्रमाणें त्या लोकांस

तहनामा करणें प्राप्त केलें. तो तहनामा त्याचे स्वदेशीय लोकांस इतका हितकारक झाला कीं जो मुलुख त्याणें सर केला होता त्यांत त्याचा अम्मल निर्वैर राहिला.

थोरला डाइओनिसिअस हा क्रिस्ताचे पूर्वीं ३६८वे वर्षीं विषाचे योगानें मृत्यु पावला. त्याचा पुत्र त्याच नांवाचा राज्याधिकारी झाला. तो फार जुलमी होता ह्मणून लोकांनीं त्यास सिसिली बेटांतून कांढून दिलें. परंतु त्याणें कांहीं युक्तीनें परत येऊन त्या बेटांतील राहणाऱ्या लोकांचा सुड उगविला. नंतर साइरेक्यूज शहरचे कांहीं लोकांनीं आयसेटा नामक मनुष्यास आपले कुमकेस बोलाविलें तेणेंकरून त्या शहरांत निरनिराळ्या फळ्या झाल्या. इतक्यांत कार्थेजिनिअन् लोक एक मोठा जाहाजांचा समुदाय घेऊन आले ते बंदरापासून दिसूं लागले, तेव्हां लोकांच्या उमेदी खचून त्यांणीं कारिंथ ह्मणजे त्यांची मूळभूमी तींतील राहाणारे लोकांस कुमकेविषयीं अर्जी पाठविली. ती त्या लोकांनीं कबूल करून त्या देशांतील टिमोलिअन् नामें एक मोठा गुणी मनुष्य होता त्यास फक्त हजार फौजेनिशीं साइरेक्यूज शहरास पाठविलें. त्याणें मोठ्या धैर्यानें त्या शहरास येऊन डाइओनिसिअस याची अशी दशा केली कीं त्यास यशःप्राप्तीची निराशा झाल्यावरून त्याणें किल्ला सोडून देऊन कारिंथ शहरास जाऊन तेथें शाळा घातली. टिमोलियन् याजपाशीं फौज फार कमी होती, ही न्यूनता दुसऱ्यास न दाखवावी ह्मणून आपले शाहणपणानें त्याणें भेद जाणणारे लोकांचे मार्फत कार्थेजिनिअन् लोकांचे मनांत असा अंदेशा उत्पन्न केला कीं, त्या लोकांचा मागो नामें सरदार या-

स, दगाबाजीविषयीं भय प्राप्त होऊन त्याणें ती मोहिम प्रस्तुतकाळीं असाध्य आहे असें निमित्त करून सोडून दिली, आणि तो आपले जाहाजांचे समुदायानिशीं स्वदेशास परत गेला, तो समुद्राचे कांठीं पोहोंचतो आहे तोंच त्यास लोकांनीं दगाबाज ठरवून तेथें सुळीं दिलें. इकडे सिसिली बेटांत असें वर्तमान झालें कीं आयसेटा हा टिमोलियन् याचे हस्तगत होऊन साइरेक्यूज शहर बखेड्यापासून मुक्त झालें. तथापि कार्थेजिनिअन् लोकांनीं पुनः त्या बेटावर स्वारी केली, परंतु टिमोलियन् याचे हातून त्यांचा अगदीं पराभव होऊन त्यांणीं जो मुलूख जिंकिला होता त्यापैकीं बहुत मुलूख सोडून देऊन त्यांस तहनामा करणें प्राप्त झालें. याप्रमाणें टिमोलियन् याणें तें बेट बाहेरील शत्रूचे हातून मुक्त करून त्याचे दुरुस्तीकरितां बहुत बेत केले, परंतु त्यापैकीं बहुतेक पुरे न होतां तो क्रिस्ताचे पूर्वीं ३३७ सावे वर्षीं मृत्यु पावला. परंतु त्याचे मागें प्राचीन काळचे सर्व सेनापतींमध्यें त्याची मोठी कीर्ति राहिली.

सिसिली बेटाचे इतिहासांत दुसऱ्या विशेष गोष्टी अगाथोक्लस नामें धनगर याचे अद्भुत कृत्याविषयीं आहेत, परंतु त्याचीं जोखिमेचीं कामें त्याविषयींचा व कार्थेज शहर व सिसिली बेट यांत रोमन लोकांनीं अम्मल केला त्याविषयींचा इतिहास पुढील काळांत लिहूं.

आह्मी आपले मुळचे संकेताप्रमाणें जें रूमचें राज्य शिकंदराचे अंतकाळाचे पूर्वीं सुमारें चार साडेचारशें वर्षें चाललें होतें त्याचे मूलोत्पत्तीचा वृत्तांत न सांगतां वाचणारांस असें सुचवितों कीं, रूमची उत्पत्ति, वृद्धि,

पूर्णता, व शेवटीं संपूर्ण पृथ्वींतील राज्यें, त्यांत मिळालीं त्याविषयीं वृत्तांत निराळा लिहूं.

---

# भाग ६.

## काळ चवथा.

## शिकंदर बादशाहाचे अंतकाळापासून ख्रिस्ताचे जन्मापर्यंत.

शिकंदर याचे मागून त्याचा पुत्र राज्याधिकारी झाला—शिकंदराचे राज्याची पहिली वांटणी—त्याचें उत्तरकार्य—त्याचे सेनापतीचे आपसांतील कलह—त्याचें राज्य शेवटीं चार सेनापतींनीं आपसांत वांटून घेतलें—त्या सेनापतीचीं निरनिराळीं राज्यें—या सर्वांविषयींचें पुढें वर्णन लिहितों.

ह्या काळांत ज्या ज्या मुख्य गोष्टी झाल्या त्या सर्व रूमवाले यांचा अम्मल संपूर्ण जगांत प्रसिद्ध झाला त्या संबंधीच आहेत.–शिकंदराचे मरणानंतर त्याच्या सेनापतींनीं त्याचे संपादलेलें राज्य आपसांत वांटून घेतल्यावर जीं राज्यें त्यापासून उत्पन्न झालीं तीं कांहीं वर्षेंपर्यंत स्वतंत्र राहून शेवटीं एकामागून एक याप्रमाणें सर्व रूमचे बादशाहींत मिळालीं. यास्तव जोंपर्यंत तीं राज्यें स्वतंत्र राहिलीं होतीं तोंपर्यंतचा संक्षिप्त इतिहास सांगून नंतर त्यांचा रूमवाले यांशीं संबंध झाला त्याविषयींचा वृत्तांत रूमचे इतिहासांत सांगूं. त्या इतिहा-

सांत **कार्थेज**, **सिसिली**, **स्पेन**, आणि **इटली** ह्या देशांत जीं जीं विशेष वर्तमानें झालीं तींही सांगितलीं जातील.

**शिकंदर** बादशाहाचा अंतकाळ झाला त्या वेळेस त्याणें आपले बादशाहीचा कोणीही वारस नेमला नव्हता, ह्मणून त्याचे पदरचे सर्व सरदार लोक एकत्र होऊन राज्यसंबंधीं पुढें काय व्यवस्था करावी याचा विचार करूं लागले. त्या वेळेस प्रत्येक सरदाराचा मनोदय असा दिसून आला कीं, नवें राज्य चालविण्याकरितां एकच जोरावर मनुष्य गादीवर न बसवितां आपणच थोर पदवी मिळवावी. शेवटीं त्यांणीं **शिकंदर** बादशाहाचा कमसल भाऊ व बालक पुत्र या उभयतांस राज्याचे मालक करून राज्यकारभार चालवावयास **पर्डिकस** नामें सरदारास नेमून राज्याचे निरनिराळे सुभे आपसांत वांटून घेतले; त्याचा तपशील;– **टालमी** यास **मिसरदेश** दिला; **लिओनेटस** यास **माइसिया** दिला; **आन्टाइगोनस** यास **फ्रिजिया**, **लाइसिया** व **पांफिलिया** हे दिले; **लाइसिमेकस** यास **थ्रेस** दिला; **आन्टिपेटर** आणि **क्रेटरस** या उभयतांमिळोन **मासिडोनिया** दिला; आणि **क्यापाडोसि** याचे सुभ्यापैकीं कांहीं मुलूख सर झाला होता व कांहीं व्हावयाचा होता ह्मणून तो सुभा **युमिनीस** नामें सर्वांहून शूर सरदार यास लावून दिला. याप्रमाणें वांटण्या झाल्या, परंतु त्या अनिवार सरदारांस आंवरावयास **शिकंदरासारिखे** जबरदस्त पुरुषाचे तेज नाहींसें होतांच त्यांणीं आपआपले हिश्शाचे मुलखांतून स्वतंत्रपणें राहावें अशा उमेदी धरून एकमेकांचे विभागावरही डोळे ठेविले. राज्याची वांटणी झाल्याव

ज्या ग्रीक लोकांस शिकंदरानें ग्रीस देशांत निरनिराळीं शहरें वांटून दिलीं होतीं, त्यांणीं प्रथम दंगा केला, तो पाइथो नामक सरदारानें लौकरच मोडून टाकिला. शिकंदर मृत्यु पावल्यावर दोन वर्षेपर्यंत त्याचें उत्तरकार्य व्हावयाचें राहिलें होतें, तें अशा समारंभानें झालें कीं, तसा समारंभ त्याचे ऐन भरभरीचे दिवसांतही झाला नव्हता. त्याचे प्रेताबरोबर त्याचे सर्व इष्टमैत्र हत्यारबंद चालून त्यांनीं ते बाबिलन शहरापासून मोठ्या समारंभानें मिसर देशास नेऊन शिकंदराबाद येथें पुरलें. जें शहर त्या शूर पुरुषानें आपले पराक्रमाची आठवण निरंतर राहावी ह्मणून बांधिलें होतें, व ज्या शहराशिवाय त्याचे समाधीस दुसरी कोणतीही उत्कृष्ट जागा पसंत व्हावयाजोगी नव्हती, त्याणें आपले अंतकाळासमयीं असें भविष्य केलें होतें कीं माझे उत्तरकार्याचे निमित्तानें रक्तस्राव व्हावयाजोगे तमाशे होतील, त्याप्रमाणेंच गोष्टी घडून आल्या. तो मृत्यु पावल्यावर त्याचे सेनापतीचे राज्यतृष्णेमुळें वीस वर्षेपर्यंत असे बखेडे व रक्तस्राव झाले कीं, तसे पूर्वीं इतके थोडके काळांत कधींही झाले नव्हते.

प्रथम लढाई पर्डिकस ह्मणजे शिकंदर याचा नायब याणें युमिनिस नामक सेनापतीस क्यापाडोसियाचे दंगेखोर सुभ्यांत बाहाल करावयास दुसरे अन्टाइगोनस नांवाच्या सरदारास हुकूम दिला, त्यावरून उपस्थित झाली. आन्टाईगोनस याणें तो हुकूम न मानितां आन्टिपेटर, टालमी, व क्रेटेरस या त्रिवर्ग सरदारांशीं मिळून सर्वांनीं युमिनिस व पर्डिकस याचा नाश करण्याविषयीं

कद केला. यास्तव पर्डिकस यास तो सुभा स्वतांच जाऊन सर करणें प्राप्त झालें. त्या कामांत त्यास यश प्राप्त झाल्यावर त्याणें एशियामैनर देश युमिनिस याचे स्वाधीन करून आपण फौजेनिशीं मिसरदेशावर घ-हून गेला. परंतु नाइल नदी उतरण्याविषयीं त्याणें तीन वेळां यत्न केला तथापि सिद्धीस गेला नाहीं ह्मणून त्याचे फौजेनेंच त्यास मारून टाकिलें. या प्रकारें युमिनिस यास एशियामैनर देशाचें वर लिहिलेले एके जुटाचे सरदारापासून रक्षण करावयास कोणीही मदतगार राहिला नाहीं—ह्मणून आन्टाइगोनस, व क्रेटेरस या उभयतांनीं त्या देशावर स्वारी केली, परंतु युमिनिस याणें त्यांचा अगदीं पराभव केला. त्या लढाईंत क्रेटेरस ह्मणजे शिकंदराचा जुना सरदार व ज्यास शिकंदर मनापासून मानीत असे तो मारला गेला.

पर्डिकस हा मृत्यु पावल्यावर आन्टिपेटर ह्मणजे मासिडोनचा अंमलदार हा त्याचे अधिकारावर मुकरर झाला. परंतु त्याचे मनांत भीति होती व चोंहोंकडे बंडें उठलीं होतीं. मुलुखाची नवीन व्यवस्थाही झाली तींत बाबिलन सुभ्याचे आसपासचे परगणे सेल्युकस नामें शिकंदराचा दुसरा सरदार यास लावून दिले. इकडे आन्टाइगोनस याणें युमिनिस याशीं मोठ्या जोरानें लढाई चालवून दगाबाजीनें त्याचा पराभव करून संपूर्ण एशियामैनर देश त्यापासून हिरावून घेतला. इकडे टालमी याणेंही सुमारें त्याच वेळेस शाम व यहूदिस्थान हे दोन्ही सुभे घेऊन आपलें राज्य विस्तीर्ण केलें. सदरहू सुभ्यांचा अम्मल मिसर देशचें हित व

बचाव होण्यास फारच जरूरीचा होता. इतक्यांत **आन्टिपेटर** हा मृत्यु पावला, त्या वेळेस त्याचा पुत्र **क्यासांडर** हा त्याचे फौजेंत शिपायाचे हुद्यावर होता, त्यास आपला अधिकार न देतां त्याणें **पोलिस्पर्चन** नामक मनुष्यास दिला. इकडे **युमिनिस** हा **शिकंदराचे** कुळाचे हक्क राखून **पोलिस्पर्चन** नामें नायब यासही पुस्तपन्हा करीत होता, परंतु **आन्टाइगोनस** याणें या वेळेपर्यंत त्याचा पिच्छा न सोडून एके जाहाजांचे लढाईंत त्याचा पराभव केला, तथापि **युमिनिस** याणें अकस्मात् **एशिया** खंडांत उतरून **सेल्युकस्** याणें त्याचा शत्रू **आन्टाइगोनस** याशीं मिलाफ केला होता सबब जे जे लोक त्याशीं वैर मानीत होते ते ते आपले झेंड्याखालीं जमा केले. **आन्टाइगोनस** याणें त्याचे पाठोपाठ जाऊन ऐन हिवाळ्यांत त्यास गांठून त्याचा पराभव केला. **युमिनिस** हा **शिकंदराचे** सर्व सेनापतींमध्यें जवानमर्द व प्रमाणिक होता, परंतु त्याची फौज कांहीं कारणावरून त्याशीं नाराजी झाली होती, यामुळें त्याचा पराभव होऊन त्याच फौजेनें त्यास धरून **आन्टाइगोनस** याचे हावालीं केलें. त्याणें त्याचे फार हाल करून त्यास मारून टाकिलें.

**युमिनिस** याचा नाश होतांच **आन्टाइगोनस** हा प्रतिस्पर्धी यांजपासून मुक्त झाला, परंतु त्याचे शत्रू नाहींसे झाले नव्हते, व जरी त्याचें वय ऐशीं वर्षांवर होतें तथापि जी उमेद ज्वान सरदारामध्यें असते ती त्यास असून त्याणें आपले मालिकाबरोबरच राज्यसंपादनाची उमेद धरिली होती, व त्याचा पुत्र **डेमिट्रिअस** हा रानटी स्वभावाचा असून मोठा पराक्रमी मनुष्य होता; यास्तव त्या उभयतां-

च्या उमेदी तोडण्याकरितां इतर सरदारांस एका करणें प्राप्त झालें. **टालमी** याणें **गाजा** शहराजवळ **डेमिट्रिअस** याचा पराभव करून लढाई सुरू केली. परंतु त्या जयाचे मोबादला **शाम** व **यहुदिस्थान** ह्या दोन्ही सुभ्यांत **आन्टाइगोनस** याणें दौडधूम करून नंतर **टायर** शहरास वेढा घातला, तें शहर चवदा महिन्यांनीं त्याचे हातास आलें. याप्रमाणें चार वर्षे लढाया होऊन नंतर **आन्टाइगोनस** व त्याचे सर्व शत्रू (**सेल्युकस** खेरीजकरून) यांमध्यें तहनामा झाला. त्यांत असा ठराव झाला कीं हरएक सरदारानें ज्या मुलखांत ज्याचा वास्तविक अम्मल असेल तितका संभाळावा, व **ग्रीस** देशांतील शहरें स्वतंत्र राखून **शिकंदराचा** पुत्र त्याच नांवाचा यास बहुत लोकांचीं संमतें घेऊन बादशाही तख्तावर बसवावा. (याप्रमाणें ठराव झाला) परंतु तो तहनामा **शिकंदराचे** पुत्रास नाशकारक झाला, कारण कीं दुसरे वर्षीं **क्यासांडर** याणें त्यास व त्याचे आईस मारून टाकिलें, व त्याच वेळेस **क्लीओपेट्रा** ह्मणजे **शिकंदराची** बहीण, हिलाही **आन्टाइगोनस** याणें आपले बेत पुरे करण्याबद्दल मारून टाकिलें. याप्रमाणें **शिकंदर** ह्मणजे प्राचीन काळचा सर्वांहून मोठा योद्धा हा मृत्यु पावल्यावर विसा वर्षांत त्याचे कुळांतील सर्व मनुष्यें निर्दयपणानें मारलीं गेलीं.

**टालमी** याचा अधिकार समुद्रांत वाढूं लागला व त्याणें **साइप्रस** नामें बेट घेतलें. यास्तव त्यास अणखी पुढें वाढूं देऊं नये ह्मणून **आन्टाइगोनस** यास त्याशीं पुनः लढाई करणें प्राप्त झालें. तेव्हां **डिमिट्रिअस** याणें **टालमी** याशीं **साइप्रस** बेटांत लढाई करून मोठा जय मि-

ळविला, आणि **शिकंदर** बादशाहाचे कुळांत कोणीही राहिला नाहीं हें जाणून राज्यपदवी आपण भोगूं लागला. हें वर्तमान इतर सुभेदारांस समजल्यावर तेही आपआपले सुभ्याचे राजे झाले. नंतर **आन्टाइगोनस** व त्याचा पुत्र **डिमिट्रिअस** या उभयतांनीं खुद्द **मिसर** देशावर चढाई केली, परंतु तींत त्यांस यश आलें नाहीं, ह्मणून **ऱ्होड्स** नामें एक शहर ह्मणजे ज्यांतील राहाणाऱ्यांनीं **टालमी** यास कुमक केली होती, त्यास वेढा घातला. तें शहर संपूर्ण **ग्रीस** देशांत मोठें प्रसिद्ध व त्यांतील राहणारे लोक सौदागरी करून मोठें मातबर व पराक्रमी झाले होते, सबब त्यांणीं मोठी लढाई करून **डेमिट्रिअस** याचा इलाज चालेनासा केला. तेव्हां त्यास यशःप्राप्तीची आशा न राहून **आथेन्स** शहरचे लोकांकडून त्यास बोलावणें आलें होतें तें वेढा काढण्यास योग्य कारण आहे असें समजून तो स्वसंतोषानें चालता झाला. तेथें गेल्यावर **ग्रीक** लोकांनीं त्यास मित्राप्रमाणें किल्ल्यांत हत्यारांसुद्धां येऊं दिलें, आणि **मासिडोन**चें राज्य काबीज करण्याकरितां तो आपले सैन्याचा मुख्य सेनापती नेमिला. तेव्हां त्याणें **ग्रीस** देशांतील **क्यासांडर** ह्मणजे **मासिडोनचा** सुभेदार याचीं ठाणीं उठवून देऊन **मासिडोन** शहरावर जावयास निघाला तों इतक्यांत त्याचे बापास शत्रूंनीं दबाविलें ह्मणून त्याणें त्यास आपले कुमकेकरितां बोलावूं पाठविलें, सबब तो परत गेला. या उभयतांस मारून टाकण्याकरितां **सेल्युकस** व **लाईसिमेकस** हे **टालमी क्यासांडर** व यांकडे मिळून होते ह्मणून त्यांशीं व या उभयतां पितापुत्रांशीं **फ्रिजिया** देशांत **इप्सस** नाम-

क गांवाजवळ क्रिस्ताचे पूर्वी ३०१ या वर्षी एक मोठी शेवटची लढाई झाली तींत **अन्टाइगोनस** हा मारला गेला आणि त्याचें राज्य नष्ट झालें. त्याचा पुत्र **डेमिट्रिअस** मोठे शिताबीनें आपले जाहाजांवर चढून **ग्रीस** देशास परत गेला. तेथें त्याणें एक मोठी युक्ति चालविली ती आह्मी **मासिडोन** व **ग्रीस** ह्या दोन्ही देशांचे इतिहासांत सांगूं. ही लढाई झाल्यावर दोन्ही यशस्वी सरदार ह्मणजे **लाइसिमेकस** व **सेल्युकस** यांणीं आपले जुटांतील दोघ सरदार हजर नव्हते, त्यांचा कांहींच विचार मनांत न आणून जिंकिलेलें राज्य आपसांत वांटून घेतलें. त्याचा तपशील **एशियामैनर मौन्ट टारस** नामक डोंगरापर्यंत **लाइसिमेकस** याणें घेतला, व त्याच डोंगराचे पूर्वेकडील मुलूख **सेल्युकस** यास दिला.

यांप्रमाणें वीस वर्षेपर्यंत सतत लढाया झाल्या नंतर **शिकंदर** याचे पदरचे सरदारांपैकीं चार सरदार काईम राहिले होते, त्यांणीं त्याचें राज्य आपसांत वांटून घेतलें. त्याचा तपशील **टालमी** याणें **मिसर** देश व **क्यासांडर** याणें **मासिडोनिया**; व **सेल्युकस** याणें **टारस** डोंगराचे पूर्वेकडील **एशिया** खंडांतील मुलूख; व **लाइसिमेकस** याणें त्याच डोंगराचे पश्चिमेकडील **एशिया** खंडांतील मुलूख व **थ्रेस** देश; याप्रमाणें घेतले. सदरहू वीस वर्षांमध्यें ज्या ज्या देशांतून लढाया झाल्या होत्या त्याची त्याची पायमल्ली होऊन कुळंबी यांची मेहनत निर्फळ झाली. आणि पुढें जरी ह्या राज्याचे चार विभागांत कांहीं दिवसपर्यंत स्वस्थता झाली, तथापि चारी राजे आपले मनांत कांहीं दर्द न आणितां एकमेकांशीं

लढाया करीत होते; परंतु तीं राज्यें एकामागून एक, याप्रमाणें **रूमचे** बादशाहींत मिळाल्यावर त्यांचीं नांवें मागें पडून त्यांत स्वस्थता झाली. आह्मी आतां हीं राज्यें **रूमचे** बादशाहींत मिळत तोंपर्यंतचा इतिहास निराळा सांगावयास आरंभ करितों.

---

## सेल्युकस याचे राज्याविषयीं.

सेल्युकस याचे राज्याची स्थापना—त्याची हिंदुस्थानावरील स्वारी—त्याचा चंद्रगुप्त नामक राजाशीं तहनामा—त्याणें मुळची राजधानी सोडून आन्टाइओकस नामें शहर राजधानी केली—त्याचा मारेकरी याचे हातून नाश—आन्टाईओकस पहिला—आन्टाइओकस दुसरा—पर्थिया व ब्याक्ट्रिया ह्या दोन्ही देशांतील दंगे—दुसरा सेल्युकस—तिसरा सेल्युकस—थोरला आन्टाईओकस—त्याच्या मोठमोठाल्या स्वाऱ्या—एशियामैनर देश रूमवाले यांचे हातीं गेला—एपिफेनस—त्याचा स्वधर्माभिमान—यहुदी लोकांचा दंगा—तें राज्य रूमचे बादशाहींत मिळालें—या सर्वांविषयींचें वर्णन पुढें लिहितों.

**सेल्युसिडीचें** राज्य **सेल्युकस** याणें वरच्या **एशिया** खंडांत क्रिस्ताचे पूर्वी ३१२ वे वर्षी ह्मणजे **शिकंदर** बादशाहाचा अंतकाळ झाल्यावर आठ वर्षांनीं स्थापिलें. ह्या राज्यांतील मुलुख **शिकंदर** याणें केवळ आपले कबज्यांत आणिला होता असें नाहीं, परंतु त्यांत दौडधुम केली होती, यास्तव तें राज्य चालवावयास मोठा पराक्रमी व गुणी, मनुष्य पाहिजे होता. तसाच गुणी **सेल्युकस** हा होता, व ही आश्चर्याची गोष्ट आहे कीं, त्याप्रमाणें त्याचे कुळांत दुसरा कोणीही झाला नाहीं. त्याणें **अटक**, व **युफ्रेटिज**, याच्यामधील व **जिहून** नदी, व **फारस** देशचा अखात यांमधील संपूर्ण मुलुख पांच वर्षांत कबजांत आणिला. नंतर क्रिस्ताचे पूर्वी ३०५ वे वर्षी त्याणें **हि**-

**दुस्थानांतील चंद्रगुप्त** नामें एक मोठा पराक्रमी राजा यावर मोठे फौजेनिशीं स्वारी केली. परंतु **गंगा** नदीपर्यंत गेल्यावर त्याणें त्या राजाशीं तहनामा केला. त्यांत त्या राजापासून पांचशें हत्ती घेऊन जो मुलुख **हिंदुस्थानांत** त्याणें **मासिडोन** देशचे शिपायांचे बाहादुरीनें सर केला होता तो सर्व सोडून द्यावा आणि आपले राज्याची **अटक** नदी हद्द करावी असा ठराव केला. आणि **इप्सस्चे** लढाईंत **आन्टाइगोनस** मृत्यु पावल्यामुळें त्याणें आपलें राज्य बहुतकरून दुप्पट वाढविलें. नंतर त्याणें मुळचे राजधानीची जागा सोडून **भूमध्य** समुद्राचे कांठावर **आन्टाइओकस** नामें शहर हें राजधानी केली. परंतु ही गोष्ट त्यास नाशकारक झाली, कारण कीं **युफ्रेटीज** व **अटक** ह्या दोन्ही नद्यांचे मधील मुलखांत त्यास राहाणें जरूर होतें, तसें न झाल्यामुळें त्यांत त्याची सत्ता कमी होऊन त्याचा पश्चिमदेशचे इतर राजाशीं कलह उत्पन्न झाला. अठरा वर्षेंपर्यंत त्याचे राज्यांत लढाई न होतां स्वस्थता राहिली, यामुळें त्याचे रयतेचा मोठा फायदा झाला. त्याणें बहुत शहरें बांधून मुख्यत्वेंकरून पूर्वेस **अक्सस** नदीचे कांठांनीं व्यापार चालू केला. याप्रमाणें तीस वर्षें राज्य करून तो **मासिडोन**चें राज्य घेण्याचा उपाय करीत असतां मारेकरी यांचे हातून मारला गेला. तो मरतांच त्याचे राज्यांतील ऐश्वर्य नाहींसें झालें.

त्याचा पुत्र **आन्टाइओकस** याणे १९ वर्षें मोठे जोरानें राज्य केलें, त्याचा कांहीं लौकिक झाला नाहीं कारण कीं त्याणें **बाथिनिया देश** घेण्याविषयीं प्रयत्न केला असतां त्या देशचे राजानें **गाल्स** लोक ह्मणजे ज्यांस सांप्रत काळीं

"**फरासिस**" असें ह्मणतात त्यांस बोलावून **गालेशिया** ह्मणजे **एशियामैनर** देशचे मध्यभागीं एक प्रांत आहे त्यांत राहावयास त्यास जागा दिली. त्या लोकांचा **आन्टाइ-ओकस** याणें लढाईंत पराभव केला तथापि त्यास मुलखां-तून काढून देणें त्यास अशक्य झालें. **सेल्युकसाचे** राज्याचा मोडता पाया आल्यामुळें **परगेमस** देशांतील नूतन वाढलेलीं राज्यें हीं आपला अधिकार वाढवूं लागलीं. **आन्टाइओकस** मृत्यु पावल्यावर त्याचा पुत्र त्याच नांवां-च्या गादीवर बसला. त्याचे राज्यांत स्त्रियांचें आधिपत्य फारच वाढलें, व राजदरबारांत ऐषअरामी बहुत होऊन सरकारचा अमल कमी झाला. यामुळें **पार्थिया** व **ब्याक्-ट्रिया** ह्या दोन्ही देशांत दंगे होऊन ते त्यापासून स्वतंत्र झाले. ह्याशिवाय त्याचे १५ वर्षांचे राज्यांत कोणती-ही विशेष गोष्ट झाली नाहीं. त्याचे मागून दुसरा **से-ल्युकस** हा राजा झाला, त्याणें २० वर्षें राज्य केलें, परंतु त्यांत निरंतर लढाया होत राहून राज्य अगदीं डबघाईस आलें. **पार्थिया** देश त्याचे राज्यापासून वेगळा झाला होता, तो पुनः जिंकण्याविषयीं त्यानें प्रयत्न केला, परंतु त्या मोहिमेंत त्याचा पराभव होऊन त्यांतील बदललेले लो-कांनीं त्यास धरून जन्मभर कैदेंत ठेविलें. त्याचा जेष्ट पुत्र **तिसरा सेकस** हा कांहीं लौकिक संपादन न करितां तीन वर्षें राज्य करून विषाचे योगानें मारला गेला. त्या-चे मागून त्याचा धाकटा भाऊ, ज्यास **थोरला आन्टाइ-ओकस** असें ह्मणत होते, तो राज्यावर बसला. त्याणें **मिडिया** व **फारस** देश यांचे सुभेदार बदललेले होते यांस आपले कबज्यांत आणून **मिसर** देशचे राजानें

त्यांपासून **शाम** देश हिसकावून घेतला होता ह्मणून त्यावर स्वारी केली, परंतु **राफियाचे** लढाईंत त्याचा पराभव झाला. त्यानंतर त्याणें **एशिया** खंडाचे उत्तरभागांतील बदललेले सुभे जिंकण्याचा प्रयत्न केला, परंतु तो सिद्धीस न जातां त्यास त्या सुभ्यांचा स्वतंत्रपणा काईम करणें प्राप्त झालें. याप्रमाणें त्याची जागोजाग आशेची निराशा झाली, तथापि त्याणें आपली फौज **हिंदुस्थानांत** नेऊन जरी त्याचा अम्मल त्या देशांत राहिला नाहीं, तथापि ज्या देशाचा स्वतंत्रपणा त्याणें कबूल केला ते खेरीज करून बाकी **एशिया** खंडाचे पूर्वेकडील संपूर्ण भागांत प्रभुत्व स्थापित केलें. नंतर लौकरच त्याणें **मासिडोन** देशचा **फिलिप** नामें राजा याशीं मिलाफ करून **टालमी** ह्मणजे **मिसर** देशचा राजा यास **लाईसिया** व **फिनिशिया** ह्या दोन्ही सुभ्यांतून काढून दिलें. येणेंकरून त्याचा अम्मल **रूमवाले** ह्मणजे जे लोक त्या वेळेस आपला मुलूख पूर्वदिशेस वाढवीत होते त्यांचे हद्दीस येऊन मिळाला. तेव्हां थोरला **हानिबल** ह्मणजे **रूमवाले** यांचा हाडवैरी त्याणें त्याचे दरबारांत आश्रय पावून **रूमवाले** यांस ज्यास्ती वाढूं देऊं नये ह्मणून त्यांशीं **इटली** देशांत युद्ध करण्याचा विचार केला; परंतु त्या विचारापासून काय हासिल होईल हें जाणण्यास **आनटाइओकस** यास सामर्थ्य नव्हतें, ह्मणून त्याणें ती गोष्ट करणें कबूल केलें नाहीं. शेवटीं **रूमवाले** यांणीं त्याचे राज्यावर चढाई करून त्याचा पराभव करून त्यास आपले मर्जीप्रमाणें तहनामा करणें प्राप्त केलें. तो तहनामा त्यास खालीं करण्याजोगा होता. सदरहू तह-

नाम्यांत त्याणें संपूर्ण **एशियामैनर** देश ह्मणजे, जो रुंद मुलूख **मौन्ट टारस** डोंगरापासून समुद्रापर्यंत होता तो सोडून द्यावा व एके वर्षांत एक मोठी रकम दाहा हप्त्यांनीं **रूमवाले** यांस द्यावी व **हानिबल** यास आपले राज्यांतून काढून द्यावें व हप्त्यास तारण आपला पुत्र ओलीस द्यावा, याप्रमाणें ठराव झाला. सदरहू **एशियामैनर** देश **रूमवाले** यांचे स्वाधीन होतांच त्यांणीं **परगेमसचा** राजा ह्मणजे **रूमवाले** यांचा दोस्त व **आनटाईओकस** याचा हाडवैरी याचे स्वाधीन केला. थोरला **आनटाई-ओकस** याणें सदतीस वर्षें राज्य केलें, नंतर तो मारला गेला.

यानंतर त्याचे पुत्रानें अकरा वर्षें राज्य केलें परंतु **रूमवालें** यांचे प्रौढ प्रतापामुळें कोणतेही राष्ट्राचा जोर त्यांजपुढें चालत नव्हता सबब त्याचे राज्यांत विशेष गोष्ट झाली नाहीं. त्याचे मागून त्याचा पुत्र **एपिफेन्स** हा गादीवर बसला. तो **रूमवाले** यांचे दरबारांत शाहाणा झाला होता. त्याणें **मिसर** देशचे राजाशीं लढाई केली, परंतु त्यांत **रूमवाले** यांणीं दखलगिरी ठेविली यामुळें तो देश त्याच्यानें सर झाला नाहीं. तो आपले धर्माविषयीं मोठा अभिमानी होता ह्मणून त्याणें **ग्रीस** देशांतील ढोंगी मतें आपले राज्यांत फैलावण्याचा विचार केला. तेणेंकरून **यहूदी** लोकांचा दंगा होऊन **जुडिया** देश त्याचे राज्यापासून स्वतंत्र झाला. त्या राजाचा अंतकाळ क्रिस्ताचे पूर्वीं १६५ वे वर्षीं झाला.

आतां **सेल्युसिडीचे** राज्याचा अणखी इतिहास सां-

गणें जरूर दिसत नाहीं, कां कीं त्यांत फक्त आपसांतील लढाया, व खानेजंग्या व अशीं भयंकर कामें होतीं कीं, त्यांपासून आपोआप मन फिरावें. सारांश त्या राज्याची मर्यादा दिवसानुदिवस कमी होऊन **सेल्युकस** याचे विस्तीर्ण राज्यापैकीं **शाम** व **फिनिशिया** ह्या दोन्ही सुभ्यांशिवाय अणखी कांहींही राहिलें नाहीं. याप्रमाणें तें राज्य डबघाईस आलें होतें, सबब **रूमवाले** यांस त्याला जिंकावें न लागतां त्यांणीं क्रिस्ताचे पूर्वी सुमारें ६४ वे वर्षी तें राज्य आपले बादशाहींत दाखल करून तिचा तो एक सुभा केला.

---

## मिसर देशाविषयीं.

पहिला टालमी—त्याचें यशस्वी राज्य व नवीन जिंकलेले मुलुख—दुसरा टालमी—मिसर देशाचा व्यापार—त्याचे दरबाराचे ऐषाराम—तिसरा टालमी—त्याच्या स्वाऱ्या—तो मृत्यु पावल्यावर राज्यांतील घालमेल—दीडशें वर्षांचो अंधाधुंदी—रूमवाले यांची तेजोवृद्धि—क्लिओपेट्रा—मिसर देश रूमवाले यांचे बादशाहीचा सुभा झाला—या सर्वांविषयींचें वर्णन लिहितों.

आह्मी पूर्वी सांगितलेंच आहे कीं **शिकंदर** बादशाहाचे राज्याची वांटणी झाली तींत **टालमी** ह्मणून जो **शिकंदर** याचे सरदारांमध्यें श्रेष्ठ सेनापति होता, त्यास **मिसर देश** हा प्राप्त झाला. पूर्वी तो देश दोनशें वर्षेंपर्यंत **पारसी** लोकांचे हातीं राहून त्यांचे जुलमामुळें उजाड झाला होता, तो **टालमी** याचे कबज्यांत आल्यावर चोहींकडील व्यापार त्यांत चालू झाला, व विद्या व लिपिज्ञान यांचाही उत्कर्ष झाला येणेंकरून तें मोठें ब-

ळाढ्य राज्य झालें. पहिला **टालमी** हा **शिकंदर** याचे तालमेंत राहिल्यानें राज्य संपादून त्याचें संरक्षण करण्यास व त्यास उदयास आणण्यास फारच योग्य झाला होता. त्याणें **मिसर** देशांतून सामान जमा करून आपले धन्याचे मनांत होतें त्याप्रमाणें **शिकंदराबाद** नामें नवें वसविलेलें शहर हें आपले राज्याची राजधानी करून तें राष्ट्रांतील व्यापाराचें मुख्य स्थान करावयास मोठा परिश्रम केला. ह्या कामांत त्यास इतकें यश आलें कीं, **शिकंदराबादचें** बंदर चालू झाल्यानें **टायर** शहराचें माहात्म्य कमी होऊन पश्चिमेकडील सर्व व्यापार त्याच शहरांत उत्तरोत्तर होऊं लागला. **टालमी** याजवर **मिसर** देशांत दोन वेळ परचक्र आलें, परंतु त्याणें आपले शत्रूंस केवळ हटविलें इतकेंच नाहीं, परंतु **फिनिशिया** व **यहुदिस्थान** व **साइप्रस** हे तिन्ही मुलुख जिंकून आपले राज्यांत मिळविले. सदरहू तिन्ही मुलखांत जाहाजांचें सामान फारच चांगलें होतें. ते तिन्ही देश **मिसर** देशाचे राज्याचे दीडशें वर्षेपर्यंत सुभे होऊन राहिले. याशिवाय, **टालमी** याणें **आफ्रिका** खंडांत **शिरिज** नामें मुलुख व **लिबियाचें** राज्य, असें जिंकून आपला मुलुख वाढविला. याप्रमाणें, त्याणें मुलुख जिंकून एकूणचाळीस वर्षें राज्य केलें.

त्याचे मरणानंतर त्याची गादी त्याचाच पुत्र दुसरा **टालमी** यास निर्वेधपणें प्राप्त झाली. त्याणें अडतीस वर्षें स्वस्थपणें राज्य केलें. त्या राजाचे वेळेस **मिसर** देशाचा समुद्रांत मोठा हुकूम चालत होता, व जमिनीवरही त्या राज्यापेक्षां दुसरें कोणतेंही जोरावर राज्य न-

व्हतें. त्यांतील ऐश्वर्य व संपत्ति इतकी वाढली होती कीं, तशी पूर्वीं कोठें कधींही वाढली नव्हती. **शिकंदराबाद** शहरचा व्यापार तीन दिशेस चालला होता, तो जगांतील सर्व व्यापाराचे शहरांतून होत होता, व जमीनीवरून **आफ्रिका** व **एशिया** ह्या दोन्ही खंडांत व उत्तरेस **भूमध्यसमुद्राचे** कांठावरील सर्व देशांतून व दक्षिणेस **आर्बस्थानचे** आखातापासून **हिंदुस्थानचे** संपन्न मुलखापर्यंत याप्रमाणें व्यापार होत असे. **मिसर** देशांत नवीन बंदरें चालू झालीं व कालवे खोदले गेले, तेणेंकरून व्यापार इतके सुलभतेनें वाढूं लागले कीं, जकातीचा पैसा दर वर्षास ४०००००० ष्टर्लिंग ह्मणजे चार कोट रुपये जमा होऊन त्यांत राज्याचा सर्व खर्च भागूं लागला. ह्या गोष्टीचा दाखला आह्मास हाल्लीं दोन हजार वर्षांनीं **अमेरिका** खंडांत दृष्टीस पडतो. परंतु व्यवस्थेनें खर्च करून साधेपणानें वागण्याची रीति **टालमी** याणें **शिकंदर** याजपासून घेतली होती ती त्यास राज्य प्राप्त झाल्यावर त्याणें चालविली. ती त्याचे पुत्राचे दरबारांत नाहींशी होऊन तो ऐषआरामांत पैसा खर्च करूं लागला, तेणेंकरून त्याचे राज्याचे मुळांस दिवसानुदिवस खणती लागली. दुसरा **टालमी** मृत्यु पावल्यावर त्याचा पुत्र तिसरा **टालमी** याणें क्रिस्ताचे पूर्वीं २४६ वे वर्षीं गादीवर बसून पंचवीस वर्षें राज्य केलें. त्यांत त्याणें आपले बापाची शांतपणाची चाल सोडून देऊन पूर्वेकडे **ब्याक्ट्रिया** देशापर्यंत मुलुख जिंकून **आफ्रिका** खंडांतही **हाब्स** देशाचे मध्यभागापर्यंत मुलुख काबीज केला. परंतु हा सर्व मुलुख त्याणें व्यापार वृद्धिंगत होण्याचे कामास

लाविला. त्याजवरून असें दिसून येतें कीं, ज्या देशांत राजा पराक्रमी व शाहाणा असतो त्या देशाची स्थिति लवकरच बदलते. शंभर वर्षांचे पूर्वीं **मिसर** देशचे लोकांस व्यापाराचा जितका तिरस्कार होता तितका कशाचाही नव्हता, तथापि त्या देशांत तिन्ही **टालमी** यांचा अम्मल राहिल्यानें तो देश जगांतील सर्व ठिकाणचे व्यापाराचें मुख्य स्थान झाला.

**मिसर** देशांत शंभर वर्षेपर्यंत तीन **टालमी** यांसारिखे पराक्रमी राजांचा अम्मल राहिल्यानें त्या देशाचें फारच कल्याण झालें. परंतु तिसरा **टालमी** याचा अंतकाळ होतांच त्या राज्यांतील तेज कमी होऊन राज्यकारभारांत घालमेल झाली. त्या दरबारांत ऐषअरामी व सोदेगिरी इतकी माजली कीं, त्यांचा कांहींच नेम राहिला नाहीं. यामुळें मोठमोठालीं अनुचित कर्में होऊं लागलीं. तिसरा **टालमी** मृत्यु पावल्यावर दीडशें वर्षेपर्यंत **मिसर** देशचे इतिहासांत व्यभिचार, व राज्यक्रांति, व रक्तस्राव, असेंच लिहिलेलें आहे. तें वाचणाऱ्यांस त्रासदायक आहे. (सबब ह्या संक्षिप्त इतिहासांत त्याजविषयीं तपशील लिहिणें जरूर दिसत नाहीं.) याप्रमाणें तें राज्य दिवसानुदिवस क्षीण होत चाललें होतें, तों इकडे **रूमचे** लोकसत्तात्मक राज्याचा प्रताप वाढून त्या लोकांनीं तें राज्य आपले अटोक्यांत आणून ठेविलें. पुढें त्या लोकांनीं कांहीं दिवसपर्यंत नानाप्रकारचे खेळ खेळून त्या राज्याखालचा परदेशांतील मुलुख हिसकावून घेऊन त्या विशोभित राज्यावर **क्लिओपेट्रा** नामें शेवटची राणी, ही वंशपरंपरेचे अनुक्रमानें राज्याधि-

कारी केली. ती सर्वांहून सुंदर व शाहाणी होती, परंतु जारकर्म करीत असे. तिणें **सिजर** ह्मणजे त्या काळीं **रूम**चे राज्यांत व जगांतही सर्वांहून पराक्रमी सरदार होता त्यास व **आन्टनि** नामें दुसरा सरदार ह्मणजे ज्याणें कांहीं वर्षेंपर्यंत रूमचा कारभार केला होता, त्या उभयतांस मोहित करून ते मरतांच **आगष्टस** नामें **रूमचा** बादशाहा यासही मोह घालण्याचा विचार केला, परंतु त्याशीं तिचा कांहीं उपाय न चालून त्याणें तिला धरण्याचा बेत केला. यास्तव तिणें कैदी राणीप्रमाणें **रूमवाले** यांचे दृष्टीस पडून अब्रू जाणार ती न जावी ह्मणून क्रिस्ताचे पूर्वीं ६ वे वर्षीं विष खाऊन प्राण दिला. नंतर **मिसरदेश रूम**चे बादशाहीचा सुभा झाला. वर लिहिलेले दीडशें वर्षांचे अंधाधुंदींत राज्याधिकाराविषयींचें कलह **शिकंदराबाद** राजधानींतच राहिले होते. यामुळें बाहेरचे मुलखांत स्वस्थता राहिली.

ज्या काळीं **रूमवाले** यांणीं जिकलेले मुलखांतील दौलत स्वदेशास आणिली, त्या काळीं तें शहर ऐषआरामाचें स्थान होऊन **शिकंदराबाद** शहरापासून जो पैसा उत्पन्न होई तो ते लोक नाजुक खर्चास लावून देत होते, यामुळें व जीं बंदरें **रूमचे** स्वाधीन होण्याचे पूर्वीं मुलखांतील लढायांमुळें बहुतकरून बंद झालीं होतीं, त्यांतून **शिकंदराबादचे** बंदराचा व्यापार बिनहरकत चालू होऊन त्या शहराचा अधिकार **भूमध्य** समुद्रांत मुख्य झाला. यामुळें तें शहर केवळ **रूम** शहराचेही दुसरे प्रतीचें शहर झालें.

## मासिडोन व ग्रीस या देशांविषयीं.

आन्टिपेटर—ग्रीक लोकांचा दंगा—डिमास्थिनिस—ग्रीक लोकांचा पराभव—आन्टीपेटर याचें सुखदायक राज्य-क्यासांडर व पोलिसपर्चन—डिमिट्रिअस फेलेरियस—शिकंदर बादशाहाचे कुळाचा वध—आन्टाइगोनस याचा पुत्र डिमिट्रिअस यास मासिडोनचें राज्य प्राप्त झालें—त्याचा मृत्यु—लाइसिमेकस व परस—आन्टाइगोनस गोनेटस नामें मासिडोनचा राजा—एकियन लोकांचा जूट—डिमिट्रिअस दुसरा—आन्टाइगोनस डोसन—फिलिप—त्याची रूमवाले यांशीं लढाई—त्याचा अपमानपूर्वक तहनामा-त्याचा पुत्र डिमिट्रिअस याचें खेददायक मरण—परसिअस—त्याचा रूमवाले यांचे हातून पराभव—मासिडोन रूमचे बादशाहीचा सुभा झाला—या सर्वांविषयींचें वर्णन पुढें लिहितों.

**शिकंदर** बादशाहाचे अंतकाळीं **अन्टिपेटर** हा बदललेल्या **मासिडोनचा** सुभेदार होता, व जो दंगा **ग्रीस** देशांतील लोकसत्तात्मक राज्यांत उपस्थित झाला होता त्याचा जोर तोडण्याविषयींही त्यासच अधिकार दिलेला होता.. **शिकंदराचें** प्राणोत्क्रमण झाल्याचें वर्त्तमान मुलखांत प्रसिद्ध झाल्यावर संपूर्ण **ग्रीक** लोक, परंतु विशेषेंकरून **आथेन्स** शहरचे लोक यांस फारच आनंद झाला, आणि त्यांणीं आपणांस **मासिडोनचे** ताबेदारीपासून मुक्त करण्याचा निश्चय करून **डिमासथिनिस** नामें त्या काळचा सर्वांहून थोर वक्ता व **मासिडोनचे** राजांचे घराण्याचा हाडवैरी यास परत बोलाविलें. नंतर **ग्रीस** देशांतील बहुतकरून सर्व लोकसत्तात्मक राज्यांनीं मोठ्या सितावीनें फौज उभी करून तिजवर अतिसाहसी **लिआसथिनस** नामें सरदार नेमिला. त्याणें तत्क्षणीं **आन्टिपेटर** याचे शोधार्थ निघून त्याचा ठिकाण लागल्यावर त्याशीं लढाई करून त्याचे फौजेची अगदीं दाणादाण करून टाकिली. तेव्हां **आन्टिपेटर** यास **लेमिया** श-

हरांत आश्रय घेणें प्राप्त झालें. परंतु त्याही शहरास **लिआस्थिनस** याणें वेढा घातला. तथापि **आन्टिपेटर** हा कांहीं दिवसांनीं त्या शहरांतून अकस्मात् निघून गेला, त्या वेळेस लढाई होऊन त्यांत **ग्रीक** लोकांचा असा घात झाला कीं, त्यांचा **लिआस्थिनस** नामें सरदार हा मारला गेला. पुढें **लिओनेटस** नामक सरदारानें **आन्टिपेटर** यास कुमक केली. तथापि **ग्रीक** लोकांचे एकत्र जमलेल्या फौजेनें त्याचा पराभव केला. परंतु हा जय त्यास नाशकारक झाला. कारण कीं, त्या फौजेपैकीं वहुत लोक लष्कर सोडून त्या जयाचा डौल मिरवीत आपले घरोघर जाऊन खुशाली भोगावयास लागले, व जे लोक लष्करांत राहिले होते त्यांणीं कवाईत करणें सोडून दिलें. यामुळें ते अगदीं अव्यवस्थित झाले.

इतक्यांत **क्रेटरस** याणें क्रिस्ताचे पूर्वीं ३२२ वे वर्षी **आन्टिपेटर** याचे कुमकेकरितां **एशियाखंडांतून** नवी फौज आणिली. **ग्रीक** लोकांस उभयतां सरदारांचे एकत्र झालेल्या फौजेशीं लढाई करावयास सामर्थ्य नव्हतें, ह्मणून त्यांजला **आन्टिपेटर** यास शरण जाणें प्राप्त झालें. तेव्हां त्या सरदारानें **ग्रीस** देशांत आपला अम्मल पुर्तेपणें स्थापिला. आणि इतर शहरचे लोकांवर कांहींशी दयाकरून **आथेन्स** शहराची इतकी दुर्दशा केली कीं, त्यांतील थोर थोर लोक बाहेर काढून दिले व लोकसत्तात्मक राज्य नष्ट करून शहरांत आपले तर्फेनें बंदोबस्त ठेविला. इतकेंही त्याणें केलें तथापि, ही आश्चर्याची गोष्ट आहे कीं **आथेन्स** शहरांत व इतर शहरांत **आन्टिपेटर** याचे अम्मलदारीमुळें इतकी स्वस्थता झाली कीं, त्यास सर्व लोक

हा **ग्रीस** देशाचा मालक व रक्षण करणारा असें ह्मणूं लागले. फक्त **इटोलियन्** लोकांनीं मात्र काहीं दिवसपर्यंत त्यास इजा दिली, परंतु शेवटीं त्यांचाही त्याणें पराभव केला. याप्रमाणें **ग्रीस** देशाचा बंदोबस्त करून **आन्टिपेटर** याणें **एशिया** खंडावर स्वारी केली. तेथून परत आल्यावर त्याचा अंतकाळ झाला. त्या वेळेस त्याणें आपला पुत्र **क्यासांडर** यास फक्त सेनापतीचीच पदवी देऊन **पोलिस्पर्चन** नामें **शिकंदराचे** पदरचा जुना सरदार त्या वेळेपर्यंत कायम राहिला होता त्यांस राज्य चालविण्याचा अधिकार दिला.

**क्यासांडर** याचे मनांत असें आलें कीं, राज्यांतील मुख्य अधिकारावर माझा जन्मतः हक्क असतां, माझे बापानें माझा वारसा नामंजुर केला. सबब त्याजला संताप प्राप्त होऊन तो **पोलिस्पर्चन** याशीं वैर बांधून लढाई करण्यास उद्युक्त झाला. तेव्हां **पोलिस्पर्चन** याणें **आन्टिपेटर** याची **ग्रीस** देशांतील व्यवस्था रद्द करण्याकरितां त्या देशाचे सर्व लोकसत्तात्मक राज्यांस त्याचे मुलखाच्या सोडचिठ्या दिल्या.. तेव्हां **आथेन्स** शहरचे लोकांस स्वतंत्रपणा प्राप्त झाल्यामुळें त्यांस फारच आनंद झाला, परंतु त्या शहरांत **फोशिअन्** नामें सर्वांहून सन्मार्गी मनुष्य होता, त्यास त्यांणीं मारून टाकिलें. यामुळें त्या स्वतंत्रपणाचा उपभोग घेण्यास त्यांस सामर्थ्य राहिलें नाहीं. इतक्यांत **क्यासांडर** हा **ग्रीस** देशांत दाखल झाला, तेव्हां **पोलिस्पर्चन** याणें त्याशीं लढाई करण्याची तयारी केली, आणि फौजेसुद्धां तो तेथून कुच करून **आटिका** देशांत गेला. त्या मुलखाची त्याचे

फौजेनें युद्धधार्णी केल्यावर त्याणें **क्यासांडर** याचे स्वारीची खबर ठेवण्याकरितां आपला पुत्र **शिकंदर** तेथें ठेविला आणि आपण **पिलोपोनिजस** देशास गेला. तेथें सर्व लोकांनीं त्यास बहुमान दिला, परंतु **मिग्यालोपोलिस** शहरचे लोकांनीं त्याशीं लढाई करून त्याचा पराभव केला. सबब त्यास **मासिडोनिया** देशास परत जाणें प्राप्त झालें. त्यानंतर **क्यासांडर** याणें **ग्रीस** देशांत आपला अम्मल स्थापून आपले तर्फेनें **डिमिट्रिअस-फालेरिअस** नामें त्यां देशांत सर्वांहून सामर्थ्यवान् मनुष्य होता त्यास **आथेन्स** शहरचे बंदोबस्ताचा अधिकार दिला. त्याचे अम्मलदारीमुळें तेथील लोकांस इतकें सुख प्राप्त झालें कीं सर्वांनीं थोर मनानें त्याचा उपकार मानिला.

आह्मी आतां **शिकंदर** बादशाहाचे कुटुंबाचे वधाविषयीं पुढें लिहितों. **शिकंराची** आई **ओलिंपिया** ही उर्मट व अनिवार होती, तिणें **एरेडिअस** नामें **शिकंदराचा** कमसल भाऊ व त्या भावाची राणी या उभयतांस मोठे निर्दयपणानें मारून टाकिलें. नंतर खुद्द तिलाच **क्यासांडर** याणें **पिडना** नामक शहरांत वेढून टाकिलें, तेव्हां तिला घोड्यांचें मास खाऊन जीव जगविणें प्राप्त झालें. परंतु शेवटीं ती त्याच सरदाराचे हातीं गेली, तेव्हां त्याणें तिला जिवें मारून टाकून **रोकसेना** ह्मणून **शिकंदराची** राख व तिचा तरुण पुत्र या उभयतांचीही तीच अवस्था केली, आणि **शिकंदराचा** लेकवळा **हरक्युलिज** याचे डोळे काढून त्यास **पोलिस्पर्चन** याचे हातून मारून टाकविलें. याप्रमाणें **शिकंदर** बादशाहाचा कुलक्षय झाला.

इकडे **क्यासांडर** याच्या आशा व निराशा यांमध्यें नानाप्रकारच्या झटापटी होऊन शेवटीं **इप्सस** नामें गांवाजवळ एक मोठी लढाई झाली. तींत **आन्टाइगोनस** नामें सरदार मारला गेला, व त्याचा पुत्र **डिमिट्रिअस** हा जाहाजांत बसून पळून गेला, याजमुळें चार विजयी सरदारांमध्यें राज्याची वाटणी पुनः होऊन **क्यासांडर** याचा **ग्रीस** देशांत अम्मल झाला, व त्यास प्रतिस्पर्धी कोणीही राहिला नाहीं.

**क्यासांडर** याचा **मासिडोन** व **ग्रीस** या दोन्ही देशांत अम्मल झाल्यावर त्याणें तीन वर्षें राज्य केलें, नंतर तो मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचे राज्यास त्याचे तीन पुत्र वारस होते. पैकीं जेष्ठ पुत्र **फिलिप**, हा लौकरच मृत्यु पावला. बाकी दोन पुत्र राहिले त्यांमध्यें राज्याविषयीं कलह उत्पन्न होऊन धाकटा भाऊ **शिकंदर** याणें **डिमिट्रिअस** नामें **आन्टाईगोनस** याचा पुत्र, ज्याणें **इप्ससचे** लढाईचे अंतीं जाहाजांचे योगानें आपला प्राण वांचविला होता, त्यास आपले कुमकेस बोलाविलें. परंतु त्याणें कांहीं कारणावरून त्यास मारून टाकविण्याचा विचार केला असतां ती खबर **डिमिट्रयस** यास समजून त्याणें उभयतां राजपुत्रास मारेकऱ्यांचे हातून मारविलें आणि आपणास भरसभेमध्यें निर्दोषी ठरवून सर्व लोकांचे रजावंतीनें आपण गादीवर बसला. याप्रमाणें **आन्टिपेटर** याचे कुळाचा शेवट झाला; व **अन्टाइगोनेस** याचे पुत्राची **इप्ससचे** लढाईमुळें निराशा झाली होती. तोच क्रिस्ताचे पूर्वी २९४ वावे वर्षीं **शिकंदर** बादशाहाचे गादीचा मालिक होऊन त्याणें सात वर्षें राज्य केलें. त्याचें राज्य, **मा**-

**सिडोन**, **थेसली**, व **थ्रेसचे** सुभ्यांतील बहुतकरून मुलुख, ह्यांत होते. त्यांत स्वस्थता करून पुर्तेपणें अम्मल करावयाचा तो न करितां आपण नेहेमीं परदेशांतील मोहिमेंत गुंतलेला असे. शेवटीं त्याणें **एशियाखंड** सर करण्याचा इरादा करून त्यावर स्वारी केली, परंतु त्याचा सासरा **सेल्युकस** नामें **बाबिलन**चा राजा याणें त्याचा पराभव करून त्यास धरून जन्मभर कैद केलें.

**मासिडोनचें** तख्त रिकामें झालेंसें पाहून त्यावर बसण्याविषयीं दोन प्रतिस्पर्धी उमेदवार उभे राहिले. त्यांत एक **लाईसिमेकस**, ह्मणजे ज्यास **शिकंदराचे** राज्याचे वांटणींत **थ्रेस** देश मिळाला होता, तो व दुसरा **पिरस** नामें **इपायरस्**चा राजा, याप्रमाणें होते. **पिरस** हा **शिकंदराचा** नातलग होता व त्याजप्रमाणें लौकिक मिळविण्याविषयीं फार उत्कंठित होता, परंतु **शिकंदरामध्यें** जसे थोरपणा, दृढता, इत्यादि गुण होते तसे गुण त्यामध्यें नव्हते. त्या उभयतां प्रतिस्पर्धी राजांची लढाई झाली, तींत **लाइसिमेकस** याचा जय झाला. नंतर त्याणें तख्तावर बसून चार वर्षें राज्य केलें., पुढें त्याचा वैरी **सेल्युकस** नामें **एशिया** खंडाचा राजा याशीं क्रिस्ताचे पूर्वी २८२ वे वर्षीं लढाई होऊन त्यांत त्याचा नाश झाला. नंतर **सेल्युकस** याणें **मासिडोनिया** देशांत आपले नांवानें द्वाही फिरविली, परंतु थोडकेच दिवसांनीं तो **युरोपखंडांत** गेल्यावर त्यास **लाइसिमेकस** याचे एका स्वकीयानें मारून टाकून त्याचा खजीना व फौज आपले स्वाधीन करून घेऊन **मासिडोनची** गादी बळकावली. परंत इतक्यांत **गालस** लोक ह्मणजे

ज्यांस सांप्रत काळीं "**फराशिस**" असें ह्मणतात त्यां-णीं त्याजवर स्वारी करून त्यास मारून त्याचें राज्य हिसकावून घेतलें. नंतर ते लोक मोठ्या आवेशानें **डेल्फी** शहरचे देवळांतील दवलत लुटावयास गेले, परंतु तो पाहाडी मुलुख जात्यांच बिकट होता, याजमुळें त्यां-चा पराभव झाला. तेव्हां अडाणी लोकांस असा वि-श्वास आला कीं, ज्या देवतेचें स्थान त्यांणीं भ्रष्ट करण्या-चा विचार केला होता, त्याच देवतेनें आपल्या सामर्थ्ये-करून त्यांचा पराभव केला.

**मासिडोनची** गादी पुनः रिकामी होतांच **आन्टा-इगोनस गोनेटस** नामें **डिमिट्रिअस** याचा पुत्र, ह्मणजे थोरला **अन्टाईगोनस** याचा नातू, याणें तो अधिकार उचलला. परंतु इतक्यांत वर सांगितलेला **पिरस** नामें **इपायरसचा** राजा ह्याणें **इटली** देशांतून परत येऊन त्यास पदच्युत करून आपले नांवानें द्वाही फिरविली. नंतर थोडकेच दिवसांनीं तो **पिलोपोनिजस** देशास गेला आणि **आर्गास** शहरांत जात असतां त्याचे मस्तका-वर घराचें कौल पडून त्याचा प्राण गेला. नंतर **अन्टा-इगोनस** हा पुन्हा **मासिडोनचे** गादीवर बसला आणि जो त्या देशांतील स्वस्थपणा बहुत दिवसांपासून नाहींसा झाला होता त्याची त्याणें पुनः संस्थापना करून बहुत दिवस **मासिडोनचे** प्रजेस सुख दिलें. **मासिडोन** दे-शचे गादीवर सोळा वर्षांत बारा राजे झाले परंतु शेवटीं त्याचेच वंशांतील राजांनीं **मासिडोन** देश **रूमचे** बा-दशाहींत मिळे तोंपर्यंत तेथें राज्य केलें.

अशीं वर्तमानें **ग्रीस** देशचे उत्तरेकडील मुलखांत होत

होती तों, इकडे **एकियन्** लोकांचे जुटाचें माहात्म्य वाढूं लागलें. **एकिया** देशाचे पहाडी व कंगाल प्रांत यांतील बारा शहरें, ह्मणजे ज्यांचे उत्तरेस **कारिंथ** देशचें अखात होतें, त्यांतील लोकांनीं **ग्रीस** देशचीं लोकसत्तात्मक राज्यें डबघाईस आलीं त्या वेळीं एकमेकांचें संरक्षण करण्याकरितां एक जूट केला होता, तो **शिकंदर** बादशाहाची स्वारी व त्याचा अंतकाळ झाल्यामुळें जी घालमेल झाली तींतही कांहीं दिवस तसाच राहिला होता, तो क्रिस्ताचे पूर्वी ३०१ वर्षीं **इप्सस**ची लढाई झाल्यामुळें मोडला गेला. परंतु क्रिस्ताचे पूर्वी २८१ वे वर्षीं पुनः त्या पैकीं चार शहरचे लोकांनीं आपला प्राचीन स्वतंत्रपणा जाहीर करून पहिल्याप्रमाणें नवा जूट केला. नंतर पुढील पांच वर्षांत त्यांत अणखी इतर शहरचे लोक सामील झाले. याप्रमाणेंही कांहीं दिवस क्रम चालून त्या जुटांत **कारिंथ** व **सिथिअन** व **आरगास** हीं तिन्हीं शहरें सामील झालीं. तेणेंकरून तो जूट इतर लोकांचे मनांत भय प्राप्त करण्यास योग्य झाला. त्या जुटास **आरेटस** व **फिलोपिमेन्** या नांवाचे दोन पुरुषांनीं पुस्तपन्हा देऊन तो प्रसिद्धीस आणिला. तेणेंकरून **ग्रीस** देशाचे विनाशकाळांत त्याचे उत्तम काळाची आठवण होऊं लागली.

क्रिस्ताचे पूर्वी २८४ वे वर्षीं **इटोलिया** नामें एक मुलुख **ग्रीस** देशाचे उत्तरेस आहे, त्यांतील मांडलिक लोकसत्तात्मक राज्यांवर **मासिडोनचे** राजानें जुलुम केल्यामुळें त्यांस त्रास प्राप्त होऊन त्यांणीं आपला स्वतंत्रपणा राखण्याबदल एकियन लोकांप्रमाणेंच एक जूट करून **आन्टाइगोनस** (**मासिडोनचा** राजा) याशीं लढाई करण्या-

चा विचार केला. परंतु त्याचे मनांत **एकियाचे** जुटाचा अधिकार वाढूं द्यावयाचा नव्हता, ह्मणून त्याणें आपले वृद्धापकाळांत त्या कामावर फारच लक्ष देऊन मनांत कांहीं शंका न आणितां जो **इटोलियन्‌चा** जूट त्याशीं युद्ध करण्याकरितां तयार झाला होता त्याशीं त्याणें सलुक केला. त्या राजानें बहुत दिवस राज्य केलें, नंतर तो क्रिस्ताचे पूर्वी २४३ वे वर्षीं मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचें वय ८० वर्षांचें होतें.

तो मृत्यु पावल्यावर त्याचा पुत्र दुसरा **डिमिट्रिअस** हा गादीवर बसला. त्याणें **इटोलियन** लोकांशीं लढाई चालवून **एकियनचे** जुटास पुस्तपन्हा दिल्हा. याशिवाय त्याचे राज्यांत कोणतीही विशेष गोष्ट झाली नाहीं. याप्रमाणें बारा वर्षें राज्य करून तो क्रिस्ताचे पूर्वी २३३ वे वर्षीं मृत्यु पावला. त्याणें अंतकाळसमयीं आपले पुत्रास राज्य न देतां आपला भाऊ **आन्टाईगोनस-डोसन** यास गादीची मालकी दिली. त्याचे राज्यांत **स्पार्टन** लोकांचा कांहींसा ऊर्जितकाळ होऊन त्यांशीं व ह्या राजाशीं लढाई उपस्थित झाली; ती बहुत दिवसपर्यंत चालून शेवटीं त्या लोकांनीं जय मिळविण्याजोगी लढाई करावी ह्मणून **एकियनचे** जुटाशीं मिलाफ केला. याप्रमाणें अकरा वर्षें राज्य करून तो राजा मृत्यु पावला. नंतर त्या गादीवर **फिलिप** नामें त्याचाच पुतण्या राजा झाला तो तरुण १६ वर्षांचे वयाचा होता व जात्यांच त्याजमध्यें बहुत उत्तम गुण होते, परंतु त्यास काळ अनुकूळ नव्हता, यामुळें तो स्वच्छंदी झाला. तो गादीवर बसल्यापासून पांच वर्षेंपर्यंत **एकियन्** व **इटोलियन** या दोन्ही जुटांचे

कलहामुळें जी लढाई उत्पन्न झाली होती तींत गुंतला होता. परंतु त्यांतून मोकळा होतांच त्यास **हानिबल** नामें **कार्थेजिनिअन** लोकांचा सेनापति याणें **रूमवाले** यांशीं युद्ध करण्यास बोलावणें पाठविलें. तें त्याणें कबूल केलें, आणि त्या सरदारानें **रूमचें** राज्य नष्ट करण्याची मसलत केली होती तींत तो सामील झाला.

**रूमवाले** यांस एकदम दोन ठिकाणीं लढाई करण्याचा प्रसंग कधीं पडला तर ते लोक एकीकडील लढाई हर प्रयत्नानें टाळीत असत. त्याप्रमाणेंच ते **हानिबल** यांशीं लडाई करीत असतां त्यांशीं व **फिलिप** राजाशीं पृथक् जागीं लढाई न व्हावी ह्मणून त्यांणीं **ग्रीस** देशांतील बहुतकरून सर्व लोकसत्तात्मक राज्यांशीं दोस्ती करून त्याच देशांत **फिलिप** यास शत्रू उत्पन्न केले. नंतर त्यांणींच क्रिस्ताचे पूर्वीं २०४ वे वर्षीं उभयतां लढणारे राजांचे दर्मियान जाऊन **फिलिप** व **ग्रीस** देशांतील लोकसत्तात्मक राज्यें यांमध्यें आपले तर्फेनें तहनामा करून दिला. परंतु ते लोक एकदां पूर्वेकडील मुलखांचे कारभारांत पडले असतां त्यांस त्या देशांत आपला अम्मल करण्याविषयीं लोभ प्राप्त होऊन ते प्रथमतः त्या देशांत आपली सत्ता वाढवूं लागले. त्याजमुळें त्या देशांतील राज्यामध्यें जी कांहीं व्यवस्था झाली होती तीस व्यत्यय येऊन शेवटीं ती अगदीं नाहींशी झाली. तेणेंकरून **फिलिप** याशीं आपोआप लढाई उपस्थित होऊन ती क्रिस्ताचे पूर्वीं २०० वे वर्षीं चालू झाली. परंतु **रूमवाल्यांस** त्या देशांत जिव्हाळ्याचा साह्यकारी कोणीही नव्हता, ह्मणून ती लढाई प्रथमतः दोन वर्षेंपर्यंत जोरानें चाल-

ली नाहीं. तिसरे वर्षी **रूमवाले** यांणीं **फिलिप** यांशीं अधिक जोरानें लढाई करण्याकरितां **ग्रीक** लोकांचें लोकसत्तात्मक राज्यांस आपले फौजेंत भरती करण्याचे उमेदीनें **ओलिंपिक** नामें तमाशा होत असतां त्या वेळेस अशी दंवडी पिटविली कीं **ग्रीक** लोकांनीं स्वतंत्र राहून **रूमवाल्यास** लढाईंत कुमक करावी. त्या तमाशाचे वेळेस **ग्रीस** देशचे चोंहीकडून लोक येऊन मोठा मेळा जमा झाला होता, त्यांणीं हीं गोष्ट ऐकतांच जयजयकाराचा मोठा शब्द कानटाळे बसावयाजोगा करून **रूमवाले** यांस कुमक करावयास ते तयार झाले. तेणेंकरून **रूमवाले** यांची त्या देशांत मोठी सत्ता होऊन त्यांणीं क्रिस्ताचे पूर्वी १९७ वे वर्षी **फिलिप** राजा याचा **साइनोसिफालीचे** लढाईंत अगदीं पराभव करून टाकिला. तेव्हां त्यास **रूमवाल्यांशीं** तहनामा करणें प्राप्त झालें. सदरहू तहनाम्यामुळें **ग्रीस** देशांतील सर्व मदतगार लोक त्या राजाचे ताब्यांतून निघून गेले आणि त्याची निवडक फौज कमी झाली व जाहाजांचा समुदायही तुटला व त्याचा खजीनाही कमी झाला.

यांप्रमाणें **ग्रीस** देशांत **रूमवाल्यांचा** मुख्य अधिकार झाल्यावर त्यांणीं त्या देशांतील **मांडलिक** राजांचे मनांत स्पर्द्धा उत्पन्न केली, आणि त्यांस **ग्रीक** देशचे कुलमालिक व्हावयास फक्त **एकियन्** लोकांकडूनच हरकत होती, सबब त्या लोकांचा जोर तोडण्याकरितां ते उद्योग करूं लागले. तेणेंकरून **आन्टाइओकस** नामें जो राजा नुकतांच **शाम** (ह्मणजे **सिरिया**) देशचें तखतावर कायम झाला होता त्याचे मनांत द्वेष उत्पन्न होऊन त्याणें

रूमवाल्यांशीं लढाई करण्याकरितां इटोलियन् लोकांशीं मिलाफ केला. .परंतु रूमवाल्यांनीं त्यास काढून देऊन त्या लोकांचा अधिकार अगदीं तोडून टाकिला.

त्याप्रमाणेंच रूमवाल्यांनीं फिलिप राजाचाही अधिकार नष्ट करून टाकावा ह्मणून हरहुंनर केली, त्यांणीं त्याजवर जो विभू रचिला तो त्यास न सोसून त्यांचा सूड घेण्यास तो फारच उतावळा झाला, आणि त्याणें हरएक उपाय (कायद्याप्रमाणें अथवा कायद्यास विरुद्ध याप्रमाणें) केला. त्याजमुळें त्याचे जुलूमाविषयींच्या गोष्टी रूमवाल्यांचे कानावर नेहेमीं येऊं लागल्या, त्या तेही कान देऊन ऐकूं लागले. अणखी दुसरी गोष्ट अशी झाली कीं डिमिट्रिअस नामें त्याचा पुत्र हा रूम शहरांत त्याचेच तर्फेनें ओलीस गेला होता, त्या वेळेस त्याणें तेथें विद्याभ्यास करून व चांगली तर्बियत घेऊन मनुष्यमात्रास प्रिय होऊन रयतेस सूख प्राप्त व्हावयाजोगे गुण संपादिले होते, परंतु पर्सिअस नामें फिलिप याचा लेकवळा याचे मनांत त्याविषयीं मोठा द्वेष होता, सबब त्याणें त्याजवर असें तुफान उठविलें कीं डिमिट्रिअस हा आपले बापास पदच्युत करण्याकरितां रूमवाले यांजकडे मिळाला आहे. असें तुफान उठविण्याचें कारण असें होतें कीं, त्याणें आपले मनांत पक्कें जाणिलें होतें कीं, आमचा बाप डिमिट्रिअस याच्या अशा अपराधाची कधींही क्षमा करणार नाहीं. सारांश, पर्सिअस याच्या मनांत डिमिट्रिअस याविषयीं असा द्वेष वाढूं लागला कीं फिलिप यास उभयतांचे कज्जाचा निवाडा करणें प्राप्त झालें. तेव्हां त्याणें डिमिट्रिअस याजवरील आरोप खरा किंवा

खोटा याची चवकशी करण्याकरितां रूम शहरास जासुदाबरोबर पत्र लिहून पाठविलें. तेव्हां पर्सिअस याणें त्या जासुदास लांच देऊन त्याजकडून खोटींच उत्तरें आपले भावास अपराधी ठरविण्याजोगीं आणविलीं, त्यांजवर फिलिप याणें विश्वास ठेवून डिमिट्रिअस यास अपराधी ठरवून मारून टाकविलें. परंतु कांहीं दिवसांनीं ती मसलत उजेडास आल्यावर फिलिप यास असें समजलें कीं मी आपले निरपराध पुत्रास व्यर्थ मारविलें, त्याजवरून त्याचे मनास अतिशयित खेद प्राप्त होऊन तो वेडा झाला आणि क्रिस्ताचे पूर्वीं १७९ वे वर्षीं त्याचा अंतकाळ त्याच दुःखानें झाला. त्याणें ४२ वर्षें राज्य केलें परंतु त्याजवर नेहेमीं संकटेंच पडत होतीं.

फिलिप याणें आपले अंतकाळसमयीं आपला नातू ह्मणजे डिमिट्रिअस याचा पुत्र, यास गादीवर बसविण्याविषयीं हुकूम देऊन ठेविला होता, परंतु पर्सिअस हा त्यास मान न देतां आपणच गादीवर बसला आणि फिलिप याचे मनांत जसा रूमवाल्यांविषयीं मोठा द्वेष होता. त्याप्रमाणेंच याणेंही बाळगून गादीवर बसल्यापासून सात वर्षेंपर्यंत रूमवाल्यांशीं बाहेरून स्नेह ठेवून त्यांजबरोबर शेवटची लढाई करण्याकरितां आंतून आपले राज्यांतील सर्व सामान जमा करण्याचा उद्योग चालविला, परंतु त्या लढाईचे अंतीं ईश्वरानें त्याचे दैवीं राज्य व जीव हीं गमावणें लिहिलें होतें. शेवटीं उभयतां राज्याचे मनांतील द्वेष लवकरच बाहेर येऊन उघडपणें लढाई होऊं लागली, आणि पर्सिअस याणें चार वर्षेंपर्यंत मोठे जोरानें लढाई चालवून रूमवाल्यांची बहुत

फौज मारून त्याचा बहुतवेळ पराजय केला, परंतु क्रिस्ताचे पूर्वी १६८ वे वर्षी त्या हुद्यावर रूमवाल्यांचे तर्फेनें नवा सरदार येऊन त्याणें पिडना नामक जाग्यांत त्याचा अगदीं पराभव करून टाकून लढाईचे अंतीं, तो त्यांचे हातीं लागल्यावर त्या लोकांनीं मोठे खुशालीनें रूम शहरांस नेऊन कैदेंत ठेविला; तेथेंच त्याचा अंतकाळ झाला. नंतर त्यांणीं मासिडोनचे राज्याचे चार विभाग करून हरएक विभागाचे मालकापासून कर घेण्यास आरंभ केला. त्या वेळेस ग्रीस देशांत स्वतंत्र राज्य असें एकियन् लोकांचें मात्र राहिलें होतें, परंतु रूमचे अधिकाराशीं व त्याशीं मेळ पाहातां तें राज्य रूमापुढें अगदींच तुच्छ होतें, कारण कीं रूमचें राज्य बहुतकरून सार्वभौम झालें होतें.

याप्रमाणें रूमवाल्यांनीं मासिडोनचे राज्याची व्यवस्था करून ग्रीस देशांतील सर्व राज्यांत आपलें तर्फेनें वकील ठेविले. त्यांणीं हरएक राजाचे कारभारांत नेहेमीं हात घालून त्याचे मनांत भय व उदासीनता उत्पन्न करीत असावें. शेवटीं रूमवाल्यांनीं एकिया शहरांतून हजार मोठे नामांकित लोक रूम शहरास धरून नेऊन त्यांस १७ वर्षेपर्यंत कैदेंत ठेविलें. नंतर मासिडोन देशांत दंगा झाला तो त्यांणीं सहज मोडून पुढें दोन वर्षीनीं कारिंथ शहर नष्ट करून ग्रीस व मासिडोन हे दोन्हीं रूमचे बादशाहीचे सुभे केले.

## यहूदिस्थानाविषयीं.

यहुदी लोक बाबिलनचे राजाचे प्रतिबंधांतून सुटून स्वदेशास परत गेले—यहुदिस्थानांत पारसी लोकांचा अम्मल झाल्यावर त्या लोकांची स्थिती—शिकंदर बादशाहा बैतुलमुकद्दस ह्मणजे यरूशलेम येथें गेला—यहुदी लोक बैतलमुकद्दस येथून निघून शिकंदराबाद शहरास राहावयास गेले—सेपत्यु आजिंट ह्मणजे जुन्या धर्मपुस्तकाचा तरजुमा ग्रीक भाषेंत झाला—यहूदी लोक, आन्टाइओकस नामक शाम देशाचे राजाचे स्वाधीन झाले—त्या लोकांवर एपिफेनस नामक त्या देशचे राजानें जुलुम केला—त्या लोकांचा दंगा—माकेबिस नामक पुरूषाचे वंशपरंपरेचें राज्य—हिराड—इसा यांचा जन्म—यांविषयींच्या गोष्टी पुढें लिहितों.

यहूदी लोकांस बाबिलनचे राजानें त्यांचे स्वदेशांपासून काढून सत्तर वर्षेपर्यंत प्रतिबंधांत ठेविलें होतें. परंतु साइरस नामें फारस देशाचा राजा याणें तो देश सर केल्यावर, धर्म पुस्तकांत लिहिल्याप्रमाणें क्रिस्ताचे पूर्वी ५३६ वे वर्षी त्या लोकांस आपले मूळभूमीस परत जाण्याविषयीं परवानगी दिली. तेव्हां त्यांत जे लोक मातबर होते ते तेथून निघून युफ्रेटीज नामक नदीचे पलीकडील देशांत जाऊन राहिले, बाकीचे लोक बहुतकरून आपले पूर्वस्थानास जाऊन ते लागलेच बैतुलमुकद्दस ह्मणजे यरूशलेम येथील देवळाचा जीर्णोद्धार करूं लागले, परंतु त्या कामांत त्यांचे सेजारी ह्मणजे सामेरिआ देशचे लोक यांणीं हरकत केली सबब यहूदी लोकांनीं फारस देशचे राजापाशीं परवानगी मागितली. परंतु ती त्यांस क्रिस्ताचे पूर्वी ५२० वर्षेपर्यंत पुरीपूर्ण मिळाली नव्हती. पुढे यहूदिस्थानचा सुभा हा पारसी लोकांचें राज्य कायम राही तोंपर्यंत शाम देशचे सुभेदाराचे स्वाधीन होता, परंतु यहूदी लोकाचे आंतील बंदोबस्ताचा अधिकार त्यांचे आंतील धर्माधिकारी याज-

कडे होता. पुढें शिकंदर बादशाहा फारसी लोकांचे राज्यावर चढून गेला त्या वेळेस यहूदी लोकांनीं फारस देशचे राजाचा पक्ष धरून शिकंदर यानें प्रमुख अमान्य केलें. यास्तव त्या योद्ध्यानें जसा टायर शहरचे लोंकांचा सूड घेतला होता त्याप्रमाणेंच यहूदी लोकांचाही घ्यावा असा निश्चय करून तो स्वतां बैतुलमुकद्दस याजवर चढून गेला. परंतु त्या पवित्र शहराजवळ दाखल होत आहे तों इतक्यांत त्यांतील मुख्य पाद्री ह्मणजे धर्माधिकारी हा पाद्रीचा पोषाक करून बरोबर दुसरे पाद्रीलोक घेऊन त्याचे सन्मुख आला. त्यास पाहातांच शिकंदर याचा राग शांत होऊन त्याणें त्या पाद्रीचे मुगुटावर ईश्वराचें नांव खोदलेलें होतें त्यास नमन करून त्याजबरोबर शहरांतून चालत जाऊन बैतुलमुकद्दसचे देवळांत त्याणें ईश्वराचे नांवानें बळिदान दिलें. हें पाहून त्याचे पदरचे सरदारांस बहुत आश्चर्य वाटलें. नंतर त्या मुख्य धर्माध्यक्षानें, धर्मपुस्तकांत शिकंदर याचे पराक्रमाविषयीं जें कांहीं भविष्य लिहिलेलें होतें तें त्यास प्रगट केलें. तेणेंकरून त्यास फारच आवेश येऊन पुढें त्याणें मोठा मुलुख काबीज केला.

शिकंदर बादशाहाचा अंतकाळ होऊन त्याचें राज्य विसकळीत झाल्यावर यहूदीस्थान हें बहुतकरून फिनिशिया देशाचे सुभ्याखालींच लागत होतें व ज्या लढाया शाम व मिसर ह्या दोन्हीं देशचे राजांमध्यें झाल्या त्या यहूदिस्थानांतच झाल्या. पुढें पहिला टालमी याणें शिकंदराबाद शहराची वस्ती हरएक प्रयत्नानें वाढविण्याची फारच काळजी धरून ख्रिस्ताचे पूर्वीं ३१२ वे वर्षीं

बैतुलमुकद्दस शहर घेऊन यहूदी लोकांचा समुदाय शिकंदराबाद शहरास नेऊन तें आबाद केलें, यामुळें जुन्या धर्मपुस्तकाचें भाषांतर ग्रीक भाषेंत होऊं लागलें. तें टालमी फिलेडेल्फस ह्मणजे दुसरा टालमी याचे कारकिर्दीत पुरें झालें. तो ग्रंथ तयार करण्यास सात जण लागले होते, सबब त्यास "सेप्चु आजिंट" अशी संज्ञा प्राप्त झाली. सदरहू यहूदी लोक १०० वर्षेपर्यंत तिन्ही टालमी यांचे हाताखालीं सुखरूप राहिले. परंतु क्रिस्ताचे पूर्वी २०३ या वर्षी त्या राज्यांत अंधाधुंदी झाली, व शाम देशांत अन्टाईओकस नामें राजाचा उत्कर्ष होऊन त्याचा अधिकार वृद्धिंगत होऊं लागला, तेव्हां यहूदी लोक स्वेच्छेनें त्याचे ताब्यांत गेले. आणि त्या राजानें त्यांचे सर्व हक्क चालू केले. त्यांचा उपभोग त्यांणीं घेऊन त्याचे राज्यापासून चवथा सेल्युकस याचे राज्यापर्यंत ते सुखरूप राहिले, परंतु क्रिस्ताचे पूर्वी १७६ वे वर्षी, अन्टाइओकस इपिफेनस नामें पुरुष शाम देशचे गादीवर राजा झाला. तो ग्रीस देशाचे चालीप्रमाणें जबरदस्तीनें सर्व प्रजेकडून मूर्तिपुजा करवूं लागला, परंतु यहुदी लोकांनीं ही गोष्ट अगदीं अमान्य केली, सबब त्याणें बैतुलमुकद्दस शहरावर स्वारी करून क्रिस्ताचे पूर्वी १७० वे वर्षी त्यांत अम्मल करून त्यांतील राहाणाऱ्यांस फारच इजा दिली. परंतु त्या गोष्टींचा सुड घेण्याचीही संधी येऊन पोहोंचलीच होती. मकाबिस नामें एक पुरुष योद्ध्यांचे कुळांत उत्पन्न झाला होता त्याणें स्वजातीस लोक धर्मकृत्याचे ओकाळिकाविषयीं लढत होते त्यांची कुमक घेऊन राज्यांतील थोडेसे सामानानें अन्टाइओ-

केलू याशीं लढाई करून त्याचा वारंवार पराभव केला. ही लढाई, प्रथमतः **माटाथिअस्** या नांवाचे पुरुषानें डोंगरांत फौज जमा करून **शाम** देशचे लोकांवर छापे घालून सुरू केली होती. त्याचा पुत्र **मेकाबीस** यास त्या लढाईचा अधिकार मिळाल्यावर त्याणें कितीएक वेळां जय मिळवून शेवटीं मोठे जयजयकारानें **बेतुलमुकद्दस** शहरांत जाऊन स्वदेशीय लोकांचा स्वतंत्रपणा स्थापित केला. ह्या योद्ध्याचे भाऊ **जोनाथन**, व **सिमन**, व सिमन याचा पुत्र **जान् हार्केनस**, या त्रिवर्गांनीं तो लढाईचा क्रम ६० वर्षेपर्यंत चालवून जे जे राजे त्या देशांत बादशाहीसाठीं लढाया करीत होते त्या सर्वांकडून **यहुदी** लोकांस बहुमान देवविला. नंतर **जान हार्केनस** ह्मणजे ह्या योद्ध्यांचे जातीचा शेवटचा पुरुष याणें **यहुदी** लोकांचे राज्याची हद्द इतकी वाढविली कीं, तशी **दाऊद** व **सिलेमान** यांचे वेळेपासून वाढली नव्हती. परंतु **जान् हार्केनस** मरतांच **यहुदी** लोकांची सद्दी कमी झाली. त्या राजाचे मागून **अरिस्टाब्युलस्** नामें राजा झाला; त्यामध्यें पराक्रम नसून तो उगाच रयतेवर जुलुम करीत असे. सबब धर्मसंबंधीं त्या देशांत निरनिराळ्या फळ्या झाल्या. शेवटीं **रूमवाले** व त्यांचा सरदार **पांपि** यांस लोकांनीं बोलावून मुलूख त्यांचे स्वाधीन केला. तो पुढें त्या लोकांचेच हातांत राहिला. पुढें पांपि याणें क्रिस्ताचे पूर्वी ६४ वे वर्षी **अरिस्टाब्युलस** व त्याचा पुत्र या उभयतांस धरून **रूम** शहरास नेलें, व जरी त्याणें गादी व धर्माधिकार **हार्केनस** या मनुष्याचे हवालीं के-

ला तरी त्याणें त्या देशावर रूमवाल्याची सत्ता ठेविली होती.

क्रिस्ताचे पूर्वी ३९ वे वर्षी रूमचे राज्याधिकाऱ्यांनीं हिराड उर्फ इडयुमीन या नांवाचा मनुष्य यहुदिस्थानचे गादीवर बसविला. त्याणें आपला अधिकार दृढ करण्याकरितां मेकाबीस नामें राजाचे वंशांतील मेरिआमनि नामक कन्या हिशीं लग्न केलें, आणि रूमवाले यांची कृपा संपादून दिवसानुदिवस संपूर्ण यहुदिस्थान व इडयुमिया ह्या दोन्ही देशांत आपला अम्मल स्थापिला. जरी तो राजा आंगची चपळता व शाहाणपणा ह्यामुळें मोठा प्रसिद्ध होता तरी अनुचित व क्रूर कर्मांमुळें फारच प्रख्यात झाला. त्याणें अंतकाळीं आपले तीन पुत्रांचे नांवाने राज्याचें व्यवस्थापत्र करून दिलें त्याजवर रूमवाले यांणीं मखलाशी केल्यावरून त्या तीन पुत्रांनीं राज्य आपसांत वांटून घेतलें.

सदरहू राजाचा अंतकाळ व्हावयाचे पूर्वी एक वर्ष जीजस् क्राईस्ट या नांवाचा एक अवतारी पुरुष यहुदिस्थानांत बेथ्लेहेम् नामक नगरांत, मनुष्यांचा पापापासून उद्धार करून जगांत सुधर्म संस्थापना करण्याकरितां उत्पन्न झाला.

पहिला भाग संपूर्ण.